# पुरस्कार

१

या महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात दिल्ली येथें ४३ वे मराठी नाट्य-संमेलन भरत आहे या संमेलनात अनेक प्रकारची अपूर्वाई आहे भारताच्या राजधानीत राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते या संमेलनाचे उद्घाटन होणार आहे राजकारण व औद्योगीकरण याच्याइतकाच नाट्य, साहित्य इत्यादि कलात रस घेणारे महाराष्ट्राचे मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण संमेलना-साठी जमणाऱ्या रसिकांचे स्वागत करणार आहेत. चित्रपट आणि रंगभूमि या दोन्ही क्षेत्रात ज्यांच्या कलेची पावले अविस्मरणीय रीतीने उमटली आहेत अशा श्रीमती दुर्गाबाई खोटे अध्यक्ष या नात्याने संमेलनाला मार्ग-दर्शन करणार आहेत जिथे सरस्वती गुप्त नाही असा हा त्रिवेणी-संगम आहे.

एके काळी मराठ्यांचे घोडे अटकेचे पाणी प्याले होते आता मनु बदलला आहे पराक्रमाची उद्दिष्टें आणि स्वरूपें झपाट्याने पालटत आहेत यापुढे मराठी अस्मितेने कृष्णा-गोदेचा परिसर ओलांडून नव्याने उगवणाऱ्या भारताच्या भाग्यसूर्याला अर्घ्यदान करावयाचे आहे या अर्घ्यात ज्ञान हवे, विज्ञान हवे, कला हवी, साहित्य हवे, सेवा, संस्कृति, संशोधन – सारें सारें काही हवे या

चालविलेल्या चार-दोन नाट्यसंस्था, नवनव्या कल्पना घेऊन पुढे येणारे हौशी नटांचे संच, इत्यादिकांनी १९४३ पासूनच्या पुढच्या तपात आशादायक वातावरण निर्माण केले. गेल्या काही वर्षांत राज्यसरकारने उदार धोरणाचा अवलंब करून रंगभूमि करमुक्त केली. नट, दिग्दर्शक, नाटककार, नाट्यसंस्था इत्यादिकांना पारितोषिके देऊन आणि इतर अनेक मार्गांनी सक्रिय सहानुभूति दर्शवून सरकार आपल्या परीने रंगभूमीच्या प्रगतीला आता चांगला हातभार लावीत आहे.

हे सर्व खरें असले, मोठमोठ्या शहरांतून नाटकांवाचून दिवस सुना जात नसला, मराठी मनाला नाटकाची जी उपजत चटक आहे तिच्यामुळे निरनिराळ्या पातळ्यांवरील नाना नवे नट आणि नाटककार रंगभूमीच्या रंगणात उतरलेले दिसत असले, आणि अभिजात परंपरा व प्रतिभायुक्त प्रयोगशीलता यांचें अधून मधून दर्शन होत असले, तरी मराठी रंगभूमीच्या विकासाच्या मार्गात अजून अनेक अडचणींच डोंगर उभे आहेत. हे डोंगर कसे ओलांडायचे, ते आलांडणे शक्य नसले तर त्यांतून बोगदे काढून पलीकडे कसे जायचें, हा आजचा खरा महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाची गुंतागुंत थोडी तरी सोडविणे हे नाट्यसंमेलनातील विचारविनिमयाचें काम आहे.

३

१९०५ सालापासून नाट्यसंमेलन प्रतिवर्षी भरूं लागले. ही संमेलनें भरत तीं एखाद्या नाटक मंडळीमार्फत अगर भारत नाट्य समाजासारख्या एखाद्या संस्थेमार्फत. अनंत वामन बरव्याच्यासारखे नाट्यभक्त जिवाचा आटापिटा करीत आणि हीं संमेलनें प्रतिवर्षी साजरी होत. पण सबंध वर्षभर नाट्यविषयक काम करणारी, सरकार, समाज आणि नाटकमंडळ्या यांना नाट्यविषयक प्रश्नांच्या बाबतींत प्रातिनिधिक म्हणून उपयोगी पडणारी अशी संस्था त्यावेळी नव्हती. गल्या पाचसहा वर्षांत मराठी नाट्यपरिषदेनें हें काम यथाशक्ति केलें आहे. बेळगाव (१९५५), सोलापूर (१९५६), सातारा (१९५७), हैदराबाद (१९५८) व बडोदें (१९६०) या ठिकाणीं नाट्यसंमेलनें भरलीं तीं नाट्यपरिषदेच्या पुरस्कारानेंच ! या संमेलनामुळे झालेली जागृति ताजी असल्यामुळे परिषदेच्या या कार्याचा आढावा घेण्याची आवश्य-

कला नाही. त्या कार्याचाच एक भाग म्हणून 'नाट्यपरिषद : इतिहास आणि कार्य ' हें पुस्तक आज प्रसिद्ध होत आहे.

४

या पुस्तकांत दिलेला बेचाळीस नाट्यसंमेलनांचा त्रोटक इतिहास आजच्या नाट्यप्रेमी वाचकांना अनेक दृष्टींनी रंजक व उद्बोधक वाटेल. एखाद्या उत्खननांत ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या वस्तु मिळतात ना? इथेंहि तसाच अनुभव येईल. केळकर-खाडिलकरांसारख्या संपादकांनीं या संघटनेचें नेतृत्व केलें असलें तर त्यांत नवल नाही. ते जसे पत्रकार होते तसे नाटककारहि होते. पण पंढरीच्या वारींत आबालवृद्धानी भाग घ्यावा, सुशिक्षित-अशिक्षितानें खांद्याला खांदा भिडवून वाटचाल करावी, त्याप्रमाणे या नाट्यसंमेलनाला महाराष्ट्रांतील विविध विद्वानाचा आणि जातिवंत रसिकाचा हातभार लागलेला आहे. संमेलनाच्या या इतिहासात भास्करराव जाधवांच्या मांडीला मांडी लावून भाऊशास्त्री लेले बसले आहेत. सांगलीचे केशवराव छापखाने आणि नाशिकचे रा. ग. प्रधान यांचीं राजकीय मतें भिन्न असलीं तरी मराठी रंगभूमीच्या एकाच ताटांतून ते प्रसाद ग्रहण करीत आहेत. इथें विविध वृत्तींची आणि व्यवसायांची त्यावेळची नामांकित माणसें नाट्यसंमेलनाशी या नाही त्या नात्याने निगडित झालेलीं आढळतील. अच्युतराव कोल्हटकर, रेव्हरंड टिळक, गोविंद चिमणाजी भाटे, प्रा गो गो.टिपणीस, प्रो. चिं. गं.भानु, बळवंत हरि पंडित, पंडित विष्णु दिगंबर पलुसकर – अशी किती चिरपरिचित नावें सांगावीत? प्रसिद्धीच्या प्रकाशांत नसलेल्या इस्माइल बावाजींसारख्या मुसलमान नाटककाराचा उल्लेख हा इतिहास वाचता वाचता मधेच येतो

ती लेखमाला 'मासिक मनोरंजना' तून यत हानी असी मानी समजून आहे अशी एखादी नजरचूक सोडली तर या पुस्तकातली माहिती आटव पण मनोरंजक आह असे आढळून यइल

## ५

हा इतिहास याचताना वाचवाच मन अधूनमधून थोडा विचारहि करू लागल आज आपण मोठ्या गभीरपणे ज्या समस्यांचा चचा करीत असतो, त्याची वल्पना त्यावळच्या जाणत्या मडळीना होती ह दर्शविणारी अनक स्थळें समेलनाच्या या इतिहासात आहत सगीतान मराठी नाटकाची वाढ खुटविली, मराठी नाटयाला घिरें करून सोडले असे १९६० साली म्हणणाऱ्या मानव मनाहरना १९०६ साली आपल्यासारखेंच मत श्री फाटक नावाच गृहस्थ व्यक्त करून गले आहेत ह पाहून आनद होईल नाशिक येथे १९०६ साली भरलेल्या समेलनात या फाटकाचा निबध वाचण्यात आला त्याचा सारांश असा— 'नाटक हे समाराचे चित्र आहे काव्यमिश्र अशा नाटकानी हा हेतु साध्य होत नाही अभिनयचातुर्य स्वभाववैचित्र्य, रसाविभाव ही जी नाटकाची खरी अगें त्याचा परिपोष गद्य नाटकच करू शकतात'

'मराठीत शोकान्त नाटके का नाहीत?' 'स्त्री भूमिका स्त्रियानी कराव्यात काय?' इत्यादि प्रश्नाचा या समेलनातून पुन्हा पुन्हा ऊहापोह झालेला आहे या प्रश्नाचे स्वरूप आज बाह्यत बदलले आहे तथापि त्याच्या मुळाशी असणाऱ्या व रगभूमीच्या विकासाला वळत नकळत अडथळा करणाऱ्या कलात्मक सामाजिक व अन्य प्रकारच्या अडचणी अजून पुष्कळ अशी कायमच आहेत

छापखान्याच्यासारख्या एखाद्या अध्यक्षाच्या भाषणातील सूत्ररूप वाक्यें आजहि चिंतनीय वाटतील छापखाने कलेची व्याख्या अशी करतात— 'सृष्टि निर्माण करणाराचा अश आपल्यात असल्यामुळे आपल्याला सृष्टीच्या सौंदर्यात मजा वाटते प्रत्येक मनुष्याचा जीव सृष्टीतील जीवाला भेटतो व या एक्यातच आनंदाची उत्पत्ति होत या आनंदाची माणसाने केलेली प्रतिकृति तीच कला होय नाटकाच्या हेतूविषयी छापखाने म्हणतात— नाटकाचे उद्देश दोन आहेत एक अंजन व दुसरा रजन पण कलेत अंजन व रंजन

असले तरी ते गुप्त असावे त्यात व्यंजन असले पाहिजे सत्या व्याख्यान-वक्तृत्व-व्यंग हे मुख्य आहे '

६

नाट्यसमेलनाचा हा इतिहास असा रीतीन रजक आहे पण तो वाचताना अनेक गोष्टी मन अस्वस्थ करून सोडतात ही समेलन प्रतिवर्षी भरत होती खरी पण त्यात मंजूर झालेले व्यावहारिक स्वरूपाचे ठरावमुद्धा अमलात आल्याचे आढळत नाही कुलदेवतेचा सण जसा वर्षातून एकदा साजरा करायचा तशी ही समेलन भरविली जात प्रत्येक नाटकमंडळीने आपल्या एका प्रयोगाचे उत्पन्न देऊन एक मध्यवर्ति सस्था समर्थ करावी, ही कल्पना त्यावेळी कुणाला सुचली नव्हती असे नाही पण उपदेश जसा न पाळण्याकरताच लोक ऐकतात, तसे ठराव अमलात न आणण्याकरताच समेलने ते मंजूर करतात ही केवळ नाट्यसमेलनाचीच स्थिति नाही आपल्या देशातील विविध संघटनांची दुर्बलता याच ठिकाणी आहे इंग्रजी राज्य व संस्कृति यांच्यामुळे अनेक नवीन गोष्टींचा आणि जीवनमार्गांचा आपल्याला परिचय झाला पण इंग्रजांच्या जीवननिष्ठेने आपण ते मार्ग चोखाळले नाहीत इंग्रज येण्यापूर्वी आम्ही स्वदेशी पोपट होतो मग परदेशी काकाकुवा झालो ! स्वातंत्र्य मिळून वर्तुळाला नवी नवी क्षेत्रे उपलब्ध झाली तरीहि अजून संघटना, सहकार, संशोधन यांच्या सांगाड्याच्या परिचयापलीकडे आपल्या-

घेऊन, नाट्यपरिषदेसारखी संघटना समर्थ व सर्वस्पर्शी होईल असा प्रयत्न करून आणि कला व व्यवसाय यांची सांगड घातल्याशिवाय रंगभूमि कायम स्वरूपाची प्रगति करू शकणार नाही हे लक्षात घेऊन आता मराठी नटांनी नाटककारांनी दिग्दर्शकांनी आणि नाट्यप्रेमी जनतेने पुढील स्वप्न पाहिली पाहिजेत ती स्वप्ने सत्यसृष्टीत कशी उतरतील याची काळजी केली पाहिजे

७

नाटक हा रंगभूमीचा मुख्य आधार पण ती प्रतिभेच्या विलासाचा विषय असल्यामुळे सध्या निर्माण होणारी नाटके कलागुणाच्या दृष्टीने कशी आहेत याची चर्चा करविण्याकडे नाट्यपरिषदेला या बाबतीत अधिक काही करता येण्यासारखे नाही ही चर्चेची क्रिया बाह्यत साधी दिसत पाहिलेल्या किंवा वाचलेल्या नाटकासंबंधी खाजगी रीतीने कळत न कळत आपण करीत असताच पण आजचा प्रश्न पूर्वीच्यापेक्षा अधिक चिकित्सक झाला आहे असे वाटत नाही भुकेच्या वेळी मनुष्य हॉटेलात मिळेल तसली पावमिसळ खाऊन राहतो शहरातल्या खुराड्यात राहणारी, यंत्रयुगाचा वेग अजून अंगवळणी न पडल्यामुळे उबून गेलेली आणि करमणूक व तिच्या द्वारें चार घटका होणारी दैनंदिन तापदायक जीवनाची विस्मृति यांच्याकरता आसुसलेली हजारो माणसे हल्ली नाट्यगृहाकडे धाव घेत असतात काही विशिष्ट वर्गांच्या हातात गेल्या दहा वर्षांत अधिक पैसा खुळखुळू लागला आहे कुठलेहि नाटक असो त्याला ही मंडळी सहकुटुंब सहपरिवार जातातच 'अमक्या नाटकात तमकी फलाणी सिनेमा नटी काम करणार आहे ना? मग काढा महा रुपयांची तेवीस तिकिटें! घरातल्या चिमुरड्या पोरापासून म्हाताऱ्या आजोबापर्यंत जाऊ देत सगळी नाटकाला!' असा विचार करणारी आणि रंगभूमीला आश्रय देणारी मंडळी आज दुर्मिळ नाहात

अवाढव्य शहराच्या करमणुकीच्या वाढत्या भुकेमुळे चित्रपट व नाटक यांचा आश्रयदाता वर्ग फार मोठ्या प्रमाणात वाढला आहे त्यामुळे मोठ्या शहरी नाट्यप्रयोगाचे पेव फुटल्यासारखे वाटते पण नाट्यकलेच्या प्रगतीच्या दृष्टीने या विपुलतेचा फारसा उपयोग होत नाही नाट्यविषयक बाबतीत मराठी रसिकतेच डोळसपणाने पाऊल करण्याचे काय १९३० पूर्वी जसें घडले

तसें आता घडत नाही. वर्तमानपत्रांतली नाटकांची परीक्षणे अथवा नाट्यप्रयोगांची समीक्षणे अगदी जुजबी असतात. चिकित्सक बुद्धि दूर राहिली, साधा चाणाक्षपणासुद्धा असा अभिप्रायात असत नाही. गेल्या काही वर्षांत 'करायला गेलो एक', 'दुरिताचे तिमिर जावो' व 'सुखें आहे तुजपाशी' ही तिन्ही नाटकें रंगभूमीवर फार लोकप्रिय ठरली. पण या तिन्ही नाटकांच्या पातळ्या किती निराळ्या आहेत याचा प्रेक्षकांनी फारसा विचार केला नाही! केळकर-वालावलकरांसारख्या रसिक पंडितांची नाट्यपरीक्षणें ही तर आता ऐतिहासिक गोष्ट झाली आहे. पुण्या-मुंबईच्या परिसरात नव्या नाट्यतंत्राची नि नाट्यमूल्यांची गुणगुण ऐकू येते. पण ती त्या परिघापलीकडे ऐकू जात नाही. त्यामुळे सर्वसामान्य मराठी प्रेक्षकांची रसिकता काळाच्या जोडीने धावत राहिलेली दिसत नाही. उलट ती अधिक स्थूल स्वरूपाची झाली आहे. 'नाट्य' सारखें एखादें छोटें मासिक सोडल्यास रंगभूमीचे प्रश्न हाताळणारें आणि प्रेक्षकांच्या अभिरुचीला वळण लावण्याचा प्रयत्न करणारें नियतकालिक मराठीत नाही. हें कार्य नाट्यपरिषदेने जरूर हाती घेतलें पाहिजे. कारण प्रेक्षकांच्या अभिरुचीची सूक्ष्मता व संपन्नता ही उच्च दर्जाच्या नाटकाच्या निर्मितीला नि [illegible] पोषक होणारी गोष्ट आहे. या पुढचा काळ मूठभर लोकांच्या परंपरागत संस्कृतीचा नाही, जनगणांच्या नव्या संस्कृतीचा

नाटयसमेलन सुरू झाल्यापासून आजपर्यंत रगभूमीच्या प्रगतीची चळवळ नाटयव्यवसायातील मडळींपेक्षा बाहेरच्या नाटयप्रेमी लोकांनीच अधिक केली असूनहि या परिस्थितीत म्हणण्यासारखा फरक पडलेला नाही ही स्थिति कोणत्याहि दृष्टीने इष्ट नाही आज ज्याचा ज्याचा नाटयाशी निकटचा सबध येत आहे—मग तो कलावत हौशी असो वा व्यावसायिक असो—त्या त्या नटाने, नाटककाराने आणि दिग्दर्शकाने प्रगतीची स्वप्ने केवळ अनुकूल कालाच्या प्रवाहावर सोडून भागणार नाही जिथे द्रष्टेपण नसते, तिथे विनाश अटळ असतो ( Where there is no vision, the people perish ) हे मॅझिनीने सागितलेले कटुसत्य राष्ट्राच्या स्वातत्र्याइतकेच त्याच्या कलेच्या बाबतीतहि खरे आहे परवा मुबईत झालेल्या सत्कारप्रसगी दिल्ली समेलनाच्या नियोजित अध्यक्ष श्रीमती दुर्गाबाई खोटे म्हणाल्या, 'मराठी रगभूमीच्या द्वारे भारतीय रगभूमीला उज्ज्वल काल आणून देण्याची सुवर्णसधि आपल्याला लाभली आहे तेव्हा आपल्यातील सर्व मतभेद बाजूला ठेवून पुन्हा एकदा महाराष्ट्राने दिल्ली काबीज करावी ' ही आकाक्षा ठीक आहे पण ती सफल होण्यासाठी मराठी रगभूमीचे स्वरूप अधिक सुदर, समर्थ आणि सुव्यवस्थित झाले पाहिजे हौसेच्या पोटी लिहिली किंवा केली जाणारी विपुल नाटके, धूमकेतूसारखी प्रगट होणारी प्रयोगशीलता, नाटयशिक्षणाचा आणि नाटयगुणाच्या पोषणाला आवश्यक असलेल्या व्यावसायिक रगभूमीचा अभाव इत्यादि गोष्टी आहेत तशाच ठेवून मराठी रगभूमि हे काम करू शकणार नाही

९

एखाद्या मोठ्या आजारात माणसाचा स्वत च्या प्रकृतीविषयीचा विश्वास नाहीसा होतो मग शरिराबरोबरच त्याचे मनहि दुर्बळ बनते मधल्या पडत्या काळात मराठी रगभूमीची अशीच स्थिति झाली होती सुदैवाने ती स्थिति आता उरलेली नाही पण प्रगतीच्या दिशेने वेगाने जायचे असेल तर सध्याच्या विस्कळित रगभूमीचे ओझे पाठीवर घेऊन आपली पावले जलद पडणार नाहीत त्या दृष्टीने मराठी नाटयपरिषद अधिक व्यापक, सुदृढ व सर्वस्पर्शी कशी होईल याचा आपण सर्वांनी विचार केला पाहिजे माझ्या मते निकडीचा म्हणून पुढील कार्यक्रम आपण हाती घेणे आवश्यक आहे—

(१) महाराष्ट्राच्या प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी मराठी नाट्यपरिषदेची शाखा असायला हवी ही शाखा सतत सक्रिय राहिली पाहिजे (२) मराठी नाट्यव्यवसायाची पाळेमुळे मधल्या काळात खणली गेली आहेत संयुक्त प्रयोग करून लहानमोठे नट आपापला चरितार्थ चालवीत आहेत पण एखाद् दुसरा अपवाद सोडला तर जिला नाटकमंडळी म्हणता येईल अशी संस्था आज अस्तित्वात नाही अपवाद म्हणून जी व्यावसायिक धडपड सुरू आहे तिची स्थिति फारशी स्पृहणीय नाही ठिकठिकाणी नाट्यगृह झाल्याशिवाय स्थिर स्वरूपाच्या नाटकमंडळ्या निर्माण होणार नाहीत तेव्हा नाट्यपरिषदेने नाट्यगृहाची चळवळ महत्त्वाची मानून हाती घेतली पाहिजे (३) प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी किंवा सामान्यतः नमरू मैलाच्या अंतरावर असलेल्या मोठ्या शहरी चांगले नाट्यगृह हवे नाट्यगृहाची आवश्यकता सरकारला सुद्धा आता पटली आहे त्या दृष्टीने काही हालचाल होत आहे असे वर्तमानपत्रावरून दिसते पण सरकारी काम हे स्वाभाविकच हत्तीच्या गतीने चालते मराठी रंगभूमि तर हरिणाच्या गतीने पुढे जायला उत्सुक झाली आहे नाट्यपरिषदेच्या शाखा जिल्हावार निघाल्या म्हणजे प्रत्येक ठिकाणी नाट्यगृह बांधण्याच्या दृष्टीने काय करणे शक्य आहे ते पाहणे सोपे जाईल जनता, सरकार, नगरपालिका या सर्वांच्या सहानुभूतीने आणि

या सर्व गोष्टी झाल्या तरी अव्वल दर्जाची नाटके त्यामुळे निर्माण होतीलच असे नाही. त्याकरिता सरस्वतीचा वरदहस्त असलेल्या आणि नाट्यगुणांनी युक्त असलेली प्रतिभा लाभलेल्या लेखकाचीहि जरुरी आहे. अशा लेखकाची परंपरा मराठीत कधीच खंडित झाली नव्हती. आज ज्याच्या अंगी श्रेष्ठ प्रकारची नाट्यप्रतिभा आहे असे हाताच्या बोटांवर मोजता येण्याजोगे लेखक आपल्यात आहेत. पण यातले बहुतेक लेखक अजून समाजमनापर्यंत जाऊन पोचू शकलेले नाहीत. असे होण्याची कारणे अनेक आहेत. त्यांची मीमांसा करण्याची ही जागा नव्हे. पण एका गोष्टीचा उल्लेख करतो. केवळ नवे तंत्र, केवळ विषयाचे नावीन्य हे नाटक जनमनात रुजण्याच्या दृष्टीने अपुरे पडते. ज्याला नाटककार म्हणून यशस्वी व्हायचे असेल त्याने पुडव्हो-किनचा पुढील उपदेश क्षणभरहि विसरता कामा नये. तो म्हणतो,

'Follow your own vision, your own people, your own landscape'

वि. स. खांडेकर

# नांदी

भारताच्या राजधानीत — दिल्ली यथे–मराठी नाटयपरिपदेच ४३ वे अधिवशन आज भरत आहे श्री दुर्गाबाई खोट याच्या अध्यक्षतेखाली भरत असलेले व राष्ट्रपति डा राजेंद्रप्रसाद यानी उदघाटन केलेले अस हे अपूव समेलन आहे प्रयागला गगा व यमुना याचा मनोहर सगम दृष्टीस पडतो आज दिल्ली यथे मराठी नाटयव्यावसायिक व इतर भाषातील नाटयप्रेमी याचा सुरख सगम होत आहे १९१२ साली कै माधवराव पाटणकर यानी दिल्लीच्या रगभूमीवर जिद्दीने आपला नाटयप्रयोग सादर करून मराठी नाटयाची पताका दिल्ली यथे नेऊन पोहोचविली होती त्याच मराठी रगदेवतेला आज राष्ट्रपतीकडून आशीर्वाद मिळत असल्याचे पाहून कै पाटणकर याच्या आत्म्याला खचित समाधान लाभले असेल

अशा या प्रसगी मराठी नाटयपरिषदेचा समग्र इतिहास प्रसिद्ध झाला तर तो उचित होईल असे परिषदेच्या कार्यकर्त्यांना वाटू लागले हा इतिहास प्रसिद्ध करण्याचा मान चाळकानी आम्हाला दिला याबद्दल आम्ही त्याचे आभारी आहो

प्रारभिक बोलणी होऊन कार्याला तर सुरवात झाली प्रश्न अध्यक्षाच

व्यक्तिमत्त्व डोळ्यांसमोर उभें राहावं म्हणून त्यांची छोटी रेखाचित्रें या ग्रंथात अंतर्भूत करावीत असे आमच्या मनानें घेतलें हा प्रयोग वाचकांना रुचेल अशी आशा आहे श्री सुधाकर खाजगीवाले यांनी अत्यंत थोड्या अवधीत हीं सर्व चित्रें परिश्रमपूर्वक तयार केली व बहिरंग सजविलें आम्ही त्यांचे आभारी आहो मे व्ही जोशी यांनी आतील ठसे केले व मे बालोद्यान प्रेस, पुणे यांनी बहिरंग छापलें ही कामें अत्यंत तत्परतेनं केल्याबद्दल, तसेंच पुणे येथील सोशल क्लबनें त्यांच्या संग्रहीं असलेल्या सर्व चित्रांचा आम्हांस उपयोग करून दिला त्याबद्दल आम्ही त्यांचे मन पूर्वक आभार मानतो

या ग्रंथातील मूळ मजकूर डॉ न अ करवे यांनी लिहिलेला होताच तो पुन्हा लिहिण्याचे काम डॉ कानडे यांनी हौसेन व चिकाटीनं केले श्री वसंतराव देसाई व प्रा गो म वाटवे यांनी वेळोवेळी बहुमोल मार्गदर्शन केल संगम प्रेस प्रा लि पुणे यांनी 'राक्षसी' वेगानं छपाईचे काम अगदी थोड्या काळात उरकलं या सर्वांचे आम्ही ऋणी आहो प्रयोगाची सिद्धता झाली आहे, रसिक गोळा होऊन बसले आहेत, तेव्हा आभाराची, ऋणाची व कृतज्ञतेची नांदी येथेंच आटोपणं बरं नाही का!

२६ मार्च १९६१

सुलोचना लिमये

# अनुक्रम



## परिशिष्टे

# चिटणीसांचें निवेदन

कै. अनंत वामन बर्वे यांनी १९०४ मध्यें स्थापन केलेल्या आणि अनेक स्थित्यंतरें होऊन आतापर्यंत बेचाळीस नाट्य-संमेलनांची वाटचाल पुरी केलेल्या या मराठी रंगभूमीच्या मध्यवर्ती संघटनेचें आतापर्यंतचें कार्य ग्रंथ-निविष्ट व्हावें याची तीव्र जाणीव दोनतीन वर्षांपासून म. ना. परिषदेस झाली आहे. त्याला एक तात्कालिक कारण घडलें तें असें. १९४३ मध्यें सांगली येथें महाराष्ट्र रंगभूमि शतसांवत्सरिक उत्सव झाला. त्या वेळीं महाराष्ट्र नाट्य संमेलनानें 'महाराष्ट्र रंगभूमि शतसांवत्सरिक उत्सव सर्वाधिकार-समिति' नियुक्त केली. या समितीचे प्रमुख सदस्य महामहोपाध्याय श्री. दत्तो वामन पोतदार यांनी १९५७ मध्यें या समितीची वाढ केली. त्या वेळीं या

म म पोतदार यानी लेग्य अर्थात या सघटनेशी माझा नव्यानेच सबध आला असल्याने मला पूर्वेतिहास अपरिचित होता त्यामुळें मी निमूटपणें निघून आलो आणि म ना परिपदच्या कार्याची ओळख देणारें प्रकाशन शक्यतो लवकर प्रकाशित करावयाचें असा सकल्पहि मनाशी केला माननीय पोतदार यानी जो प्रश्न केला तोच प्रश्न इतर काही मडळीनीहि केला त्यामुळें या कामास पर्यायानें चालना मिळाली आतापर्यंतच्या नाटच सम्मेलनातील बहुसख्य सम्मेलनें ज्या पुणें शहरात भरली तेथें जर या सघटनच्या कामाची फारशी माहिती नाही तर इतरत्र ती कुठून असणार ? तेव्हा म ना परिपदेचे कार्य पुढील काळात प्रगत होत जावे आणि महाराष्ट्र राज्यातील मराठी नाटच अकादमीचें स्थान या सघटनेस प्राप्त व्हावे यासाठी पूर्वेतिहास प्रकाशित करणें अत्यावश्यक आहे असा निश्चय म ना परिपदने केला

अशा स्वरूपाचे काही लेखन डॉ न ध बरवे यानी कर अमल्याचे कळले तव्हा डॉ बरवे याच हस्तलिखित परिपदनें मागवून घेतल त्या लिखाणाचा सक्षेप करणें आवश्यक आहे असा अभिप्राय श्री वि स खाडकर यानीं व्यक्त केल्यानें त्या कामासाठी परिपद कार्याची धुरा एव तप साभाळणारे प्रा श्री ना बनहट्टी याच्याकडे हस्तलिखित पाठविण्यात आले त्या हस्तलिखिताचा सक्षेप करण्यात चालणार नाही, पुनर्लेखनच करायला हव अशा आशयाची सूचना प्रा बनहट्टी यानी केल्यानं पुनश्च अडचण उभी राहिली तव्हा मराठी नाटचवाङ्मय याचे एक अभ्यासक माझ स्नेही डॉ मुकुद श्रीनिवास कानडे याना पुनर्लेखन करण्याची विनती केली परिपदकार्याविपयी वाटत असलेल्या अवस्थेमुळें डॉ कानडे यानी माझी विनती मान्य केली आणि अत्यत अल्प अवधीत पुनर्लेखनाचे कार्य केले, इतकेच नव्हे तर उपसहाराचे प्रकरण त्यानी नव्यानेंच लिहून दिल तसच आवश्यक ती परिशिष्टेंहि तयार केली आणि या

संशोधनमंदिराचे कार्यवाह इत्यादींच्या महत्कार्याने आता दिल्ली अधिवेशन-प्रसंगी हा ग्रंथ प्रकाशनास तयार झाला आहे. म. ना. परिषदेचे पूर्वाध्यक्ष आणि परिषदेचे एक थोर मार्गदर्शक श्री भाऊसाहेब खाडेकर यांनी अथरणास सिद्धले असतानाहि पुरस्कार लिहून दिला, श्री व. शां. देसाई (म. ना. प.चे अध्यक्ष) यांनी प्रास्ताविक शब्द लिहून दिले याबद्दल म. ना. परिषदेतर्फे ती कृतज्ञता व्यक्त करीत आहे. अनेकांच्या सदिच्छा आणि सहकार्य हेच मराठी नाट्य-परिषदेचे भांडवल आहे. या संस्थेजवळ ना अमाप पैसा ना सुसज्ज कार्यालय किंवा कार्यकर्त्यांचा ताफा. अशा परिस्थितीत दिल्ली येथील ४३ व्या मराठी नाट्यसंमेलनप्रसंगी हा ग्रंथ मराठी नाट्यप्रेमी रसिकांना व अभ्यासकांना मराठी नाट्यपरिषदेच्या वतीने नम्रपणे मी सादर करीत आहे. सद्य स्थितीत ग्रंथ जास्तीत जास्त निर्दोष करण्याचा यत्न केला आहे, पण त्यातून काही राहून गेले असल्यास क्षमस्व !

वर्षप्रतिपदा
१७ मार्च १९६१
पुणे, ४

*गो. म. वाटवे*
चिटणीस
मराठी नाट्यपरिषद



मराठी नाट्यपरिषद जिवंत
ठेवण्यासाठीं ज्यानी आमरण
देह झिजविला त्या
कै. अनंत वामन बरवे
याना सादर समर्पण

# नाटयसंमेलनाची प्रेरणा

३१ ऑक्टोबर १८८१ या शुभदिनी कै अण्णासाहब किर्लोस्कर याच्या 'शकुतला' या नाटकाचा प्रथम प्रयोग पुणे येथें झाला आणि त्याच दिवसापासून मराठी रगभूमीच्या नव्या युगाचीहि नादी सुरू झाली कै विष्णुदासाच्या नाटकाचे युग १८६० च्या सुमारास समाप्त झाले आणि इचलकरजीकर, कोल्हापूरकर, अळतेकर इ नाटक मडळयाच्या 'बुनिश' आणि अद्भुतरम्य पौराणिक नाटकाचा प्रारभ झाला याचा पुढचा टप्पा कै अण्णासाहेबाच्या शाकुतल नाटकाने गाठला १८८० पासून सर्व महाराष्ट्रभर नाटके आणि नाटक मडळया याचा व्याप अव्याहतपणे वाढू लागला त्यात जसे उचित आणि उत्कर्षदायक नवीन प्रवाह येऊन मिळू लागल त्याचप्रमाण नको त्या गोष्टीचाहि समावेश होऊ लागला गुणाबरोबरच दोषहि वाढीला लागले रगभूमीच्या उन्नतीला मारक ठरणारे नाटयव्यवसायातील दोष कोणत्या मार्गाने काढून टाकावेत, निदान त्याना नेटाने पायबद घालावा याचा विचार विचारी नाटयभक्ताच्या मनात घोळू लागला कै अनत वामन बरवे हे अशाच नाटयप्रेमी वृत्तीचे परतु कृतिशूर रसिक होते '

कै. बरवे यांच्या मनात नाट्यसंस्थांच्या चालकांना कोणत्यातरी निमित्तानें एकत्र आणून नाटकधंद्याविषयी विचाराची देवाणघेवाण करण्याची कल्पना निश्चित केव्हा उत्पन्न झाली हे सांगणे कठीण आहे, परंतु सन १९०० मध्यें मात्र त्यांच्या मनात या विचारानें पक्कें ठाण मांडले होतें हें निश्चितपणे म्हणता येतं. याला पुढील आधार सांपडतो[१]—"सन १९०० सालीं नाशिकच्या 'लोकसेवा' पत्रात एक सूचना देऊन पाहिली कीं, आमच्या महाराष्ट्र नाटकमंडळ्यांच्या मालकांनी अथवा त्यांच्या व्यवस्थापकांनी दरसाल कोठें तरी एकदा एकत्र जमून आपल्या धंद्यातील अडचणींचा विचार करावा व नाट्यकलेच्याहि सुधारणेची चर्चा करावी. ही सूचना प्रसिद्ध झाल्यानंतर इतर कांहीं वर्तमानपत्रांत अनुकूल अभिप्रायपूर्वक हिचा अनुवाद पाहण्यात आला, पण ज्यांना उद्देशून ही सूचना होती त्यांच्यांत हिचा कांही प्रवेश झाल्याचें मुळींच दिसलें नाही आणि त्यामुळें ती सूचना त्या वेळी तितकीच राहिली." यावरून हे स्पष्ट होतें की कै. बरवे यांनी आपल्या मनातील कल्पना अमलात

केली आहे तसीच या कॉन्फरन्सास मदत करून आपल्या स्वत वरिता म्हणून एक मोठा फड उभरावा व त्यातून नाटयक्लेची सुधारणा करावी " कै कुलकर्णी याचा हा ग्रथ १९०३ मध्ये प्रसिद्ध झालेला आहे यावरून १९०० पासून मूळ धरलेली कै बरवे याची कल्पना जनमनात कशी रुजू लागली होती याचा प्रत्यय येतो

कै. कुलकर्णी याच्यासारख्या अधिकारी अभ्यासकाप्रमाणेच सर्वसाधारण रसिकहि या कल्पनेला उचलून धरीत होते कै बरवे यानी सुरू केलेल्या 'नाटयकला' या मासिकात ( डिसेंबर, १९०४ ) पैठणचे एक नाटयप्रमी गृहस्थ श्री श ना कावळे याचे एक पत्र प्रसिद्ध झालेले आहे त्यात त्यानी कै बरवे याच्या नाटयविषयक विविध उद्योगाची प्रशसा केली असून कै बरवे हे 'महाराष्ट्र नाटक मडळीचे नाटयसमेलन' भरविण्याच्या प्रयत्नात असल्याचाहि स्पष्ट निर्देश आहे

या वेळी कै बरवे यानी नेटाने कामाला प्रारभ केला व त्यासाठी नाटकमडळयाच्या चालकाशी बोलणी सुरू केली " राजापूरकर नाटक मडळीचे मालक रा बाबाजीराव राणे याच्यापाशी या विषयाची चर्चा करिता त्यानी या प्रकारचे समेलन एकवेळ भरवून पहावे, आपण त्यासबधाचा खर्च हौसेने करू अशी उमेद दाखविली तेव्हा या प्रकारच्या प्रयत्नाला अगोदर नाटकव्यवसायी माणसाची व नाटयकलाभिवृद्धिच्छु विद्वानाची समति कशी काय मिळते हे पाहण्यात येऊन, त्याची बरीच अनुकूलता दिसल्यावर समेलन भरविण्याचे निश्चित झाले "[१]

अशा तऱ्हेने कै अनत वामन बरवे याच्या नाटयविषयक कळवळीने निर्माण झालेली नाटयसमेलनाची कल्पना कै राणे याच्या आपुलकीच्या साहाय्याने साकार होऊन दि २८ ऑगस्ट १९०५ या दिवशी मराठी नाटयसमेलनाचे पहिले अधिवेशन सुरू झाले

१. नाट्यविषयाची सुशिक्षित चर्चा, पृ ९८ ( तळटीप )



मराठी रंगभूमीचे जनक
कै. विष्णुदास भावे



मराठी रंगभूमीचे पहिले आश्रयदाते
कै. सर चिंतामणराव अप्पासाहेब पटवर्धन


अध्यक्ष ग श्री खापर्डे

# १. मुंबई

१९०५

उमरावतीचे सुप्रसिद्ध, अग्रगण्य आणि रसिक वकील. राजकीय चळवळीतील लोकमान्य टिळकांचे सहकारी

पहिले नाट्य समेलन मुबई येथील बॉम्बे थिएटरमध्ये राजापूरकर नाटक मडळीच्या विद्यमाने दि २८ आगस्ट १९०५ या दिवशी भरविण्यात आल वऱ्हाडचे सुप्रसिद्ध विद्वान व रसिकाग्रणी श्रीमत गणश श्रीकृष्ण उर्फ दादा-साहेब खापर्डे यानी या समेलनाचे अध्यक्षस्थान मडित केल होत

या समेलनाचा वृत्तात देताना समलनाचे प्रणते कै अनत वामन बर्वे यानी समलनाचा उल्लेख 'महाराष्ट्र नाटक मडळयाचे समेलन' अशा शब्दानी आपल्या 'नाट्यकला' या मासिकात केला होता या निर्देशावरून दोन गोष्टी स्पष्ट होतात पहिली म्हणज ह्या समेलनाची व्याप्ति महाराष्ट्रापुरती होती आणि हे समेलन प्राधान्यान नाटक मडळयाचे असाव असा हेतु चालकाच्या मनात होता समेलनाला उपस्थित असणाऱ्या नाटक मडळयाची सख्या पाहिली म्हणज या विधानाला दुजोरा मिळतो या समेलन प्रसगी पुढील नाट्य-सस्था प्रत्यक्षपणे किंवा प्रतिनिधि रूपात उपस्थित झाल्या होत्या —

(१) किर्लोस्कर नाटक मडळी (२) नाट्यकला प्रवर्तक सगीत ना म, (३) स्वदेशहितचिंतक ना म (४) वाशीमकर स ना म, (५) महालक्ष्मी प्रासादिक स ना म, (६) पाटणकर स ना म (७) राजापूरकर स ना म, (८) परमानद प्रासादिक स ना म, (९) महाराष्ट्र ना म, (१०) सामाजिक

ना म, (११) नाट्यकलासंवर्धक मित्र समाज, (१२) प्रभु ॲमेच्युअर्स ना म, (१३) दि डक्कन थिएट्रिकल यूनियन, व (१४) रघुनाथ प्रासादिक वाद्यामकरानुयायी मंडळी

याशिवाय पुढील नाट्यसंस्थानी पत्रद्वारें आपली सहानुभूति व्यक्त केली होती — (१) शाहूनगरवासी ना म, (२) श्रीमाणिकप्रभु प्रासादिक स्त्री संगीत ना म (३) कुडाळकरप्रासादिक ना म व (४) आर्यकलोत्तेजक नाटक मंडळी

वरील नाट्यसंस्थांची नावं पाहिली म्हणजे त्यात संगीताबरोबरच गद्य नाटक मंडळ्यानी व व्यावसायिकाबरोबरच हौशी नाट्यसंस्थानीहि भाग घेतला होता असं दिसून येतं

*मुंबईतील अनेक थोर साहित्यिक व पुढारी या संमेलनाला उपस्थित* होते ज्याना उपस्थित राहणे शक्य झाले नाही त्यानी शुभसंदेश पाठवून आपली सद्भावना व्यक्त केली होती हिराबाई पेडणेकर यानी या संमेलनासाठी स्वरचित कविता पाठविल्या होत्या

## 'ही संस्था विद्वत् परिषद बनवा'

संमेलनाचे नियोजित अध्यक्ष दादासाहेब खापर्डे यानी संमेलनाच्या कल्पनेचे स्वागत करून संमेलनाला 'भरत नाट्य समाज' असं नाव सुचविले त्याच-*प्रमाणें संमेलन केवळ नाटक मंडळ्यासाठींच न ठेवता त्यामध्यें विद्वान्, रसिक,* नाट्य मर्मज्ञ याचाहि समावेश करून संमेलनसंस्थेची विद्वत् परिषद

उपाय या धद्यात जर आहे तर यास पवित्र का म्हणू नये ?. " या धद्यासाठी सर्व लोकानी प्रयत्न का करावा याचे उत्तर देताना अध्यक्ष म्हणाले, " नाटक ही जी शाळा आहे, ही आबालवृद्धास सारखी उपयोगी पडणारी आहे हीत व्यावहारिक व अध्यात्मिक अशा दोन्ही प्रकारचे शिक्षण मिळते अशा प्रकारच्या या शाळेची समाजसुधारकानी अत्यत चिंता ठेविली पाहिजे नाटक हे आयुष्याचे प्रतिबिंब आहे यात अति आवडत्या माणसाकडून अति गोड भाषेत शिक्षण मिळत असते " परकीय नाटकात वापरल्या जाणाऱ्या पोषाखासबधी ते म्हणाले, " नाटकात चित्रविचित्र देखाव्याचे प्रमाण कमी करावे व केवळ नाट्याकडे दृष्टि द्यावी शेक्सपीअरची अथवा इतर परकीय कवींची नाटकें मराठी स्टेजवर होतात ती करताना पोषाख, देहस्वभाव वगैरे गोष्टी त्याच्याच ठेवाव्यात भाषा मात्र मराठी असावी, अगर नावे, पोषाख, देहस्वभाव व अभिनय सर्वच आमचे ठेवावे पण सकर करू नये या सकरा-पासून पुष्कळ वेळा विरस होतो "

## निबंधवाचन

(१) हल्लीची नाटके व नाटकमडळ्या. ले श्री आप्पाजी विष्णु कुलकर्णी

श्री कुलकर्णी यानी आपल्या निबधात नाटकमडळ्याची स्थिति आर्थिक दृष्टीने चिरस्थायी होण्यासाठी एक फड उभारण्याची कल्पना पुढे ठेवली त्याचप्रमाणे नाट्यधद्यात नाट्यकलेचे सशास्त्र अध्ययन केलेल्या इसमानीच शिरावे, त्यासाठी नाटकमडळ्यानी उच्च प्रतीचे शिक्षक मिळवून नाट्यकलेच्या शिक्षणाची शाळा स्थापावी असेहि सुचविले नाट्य-विषयक सग्रहालयाची स्थापना करण्याचीहि त्यानी सूचना केली त्याच्या निबधाच्या पुढील भागात नाटकवाल्याची नीतिमत्ता सुधारणे आणि तमाशाचे स्वरूप येत चाललेल्या नाटकाचा दर्जा सुधारणे या मुद्याचा विचार आहे [१]

(२) 'नाटक मडळ्याच्या सध्याच्या अवनत स्थितीची कारणे व त्यावर उपाय' हा श्री नीळकठ सखाराम कुलकर्णी याचा एक निबध या समेलना-साठी आला होता

---

१ हा निबध ' नाट्यविषयाची सुशिक्षित चर्चा ' यात समग्र प्रसिद्ध झाला आहे

## मंजूर झालेले ठराव

(१) संमेलनासाठी ज्या नाटक मंडळचा प्रत्यक्ष किंवा प्रतिनिधिरूपानें उपस्थित राहिल्या किंवा ज्यांनी पत्ररूपानें आपली सदिच्छा व्यक्त केली त्याना संस्थेचें सभासदत्व मिळावें.

(२) सभासद झालेल्या प्रत्येक नाटक मंडळीनें प्रत्येक वर्षी आपल्या एका प्रयोगाचें उत्पन्न संस्थेला देऊन एक फंड जमा करावा.

(३) *या ठरावाना धरून या संमेलनाचे कामकाज करण्यासाठी अध्यक्षाच्या* वतीनें एक 'भरत नाटच समाज' स्थापन करण्यात यावा आणि त्याचे चिटणीस म्हणून श्री. शंकर बापूजी मुजुमदार व दुय्यम चिटणीस म्हणून श्री. अनंत वामन वर्वे हे असावे असें सर्वानुमतें ठरले.

या तीन ठरावांशिवाय जे इतर ठराव मंजूर झाले त्याचा आशय पुढील-प्रमाणें होता—

संस्थेकडे आलेली उत्तम नाटकें व नाटचविषयक ग्रंथ याना मदत करावी. त्यातील नाटकांचे प्रयोग करण्याचा हक्क सभासद–नाटचसंस्थांना असावा. 'नाटचकला' या मासिक पुस्तकास फडांतून मदत करावी नाटक मंडळयांनी प्रयोगाच्या सजावटीसाठी होतां होईतो देशी व नच जमल्यास जपानी सामान वापरावें. गांवोगावी फिरणाऱ्या नाटक मंडळयाना प्रसगविशेषीं ज्या अडचणी *येतात त्याचें निवारण करण्यासाठी काही कायमची तरतूद करून ठेवावी,* संस्थेच्या मालकीचें एक नाटचविषयक संग्रहालय स्थापून त्याचा खर्च *संस्थेच्या* फडातून चालवावा. इ. इ.

अशा रीतीनें मराठी नाटचकलेच्या वर्तमान आणि भावी काळासंबधीं अनेक दृष्टीनी विचार होण्यास प्रारंभ झाला आणि हा विचार करणाऱ्या नाटक मंडळचा व समाजातील इतर जाणती मंडळी याना एकत्र आणणाऱ्या 'नाटच-संमेलन' या संस्थेची मोठया उत्साहानें मुहूर्तमेढ रोवण्यांत आली.



अध्यक्ष न चि केळकर

# २. नाशिक

## १९०६

*मराठी साहित्याचे 'सम्राट'. वृत्तपत्रकार, नाटककार आणि निबंधकार. राजकीय क्षेत्रात लोकमान्य टिळकांचे वारस.*

पहिल्या संमेलनात घोषित झाल्याप्रमाणे दुसरें नाट्यसंमेलन दि १४ व १५ मे १९०६ यादिवशी नाशिक येथे पाटणकर संगीत नाटक मंडळीच्या विद्यमाने भरविण्यात आले संमेलनाच्या प्रसिद्धिपत्रकात 'सर्व महाराष्ट्र नाटक मंडळांचे दुसरें संमेलन' असा उल्लेख करण्यात आला होता या संमेलनाचे अध्यक्ष श्री नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर हे होते

## 'निर्व्यसनी धंदा'

अध्यक्षपदाचा बहुमान आपण का स्वीकारला हे सांगताना अध्यक्ष म्हणाले, "नाटकाचाच धंदा करणारे लोक व इतर जनसमाज यांचे मध्यें परंपरागत असें जें एक प्रकारचें असांनिध्य, एक प्रकारचा परकेपणा किंवा तुटकपणा उत्पन्न झाला आहे त्याचा परिणाम नाटकसंस्थेवर फारच अहितकारक झाला असून तो हरप्रयत्नाने दूर झाला पाहिजे सुशिक्षित व म्हणून बहु मानास्पद मानल्या जाणाऱ्या वर्गाच्या निकट सश्रयाचे वळण किंवा परंपरा पाडली असता हें असांनिध्य नाहींसें करता येईल व या संस्था कालांतराने श्रेष्ठ दर्जास चढतील अशी माझी खात्री आहे" नट व नाटकमंडळ्या याच्याबद्दल लोकांची जी अनादरबुद्धि आहे ती केवळ हिंदुस्थानातच नसून पाश्चात्य देशांतहि एकेकाळी होती त्याचा इतिहास सांगून नाट्यकलेला संस्कृत वाङ्मयात केवढें महत्त्वाचे व मानाचे स्थान होते याचे अध्यक्षांनी

विवेचन केले. ते म्हणाले, "नाट्य हें ब्रह्मनिर्मित आहे एवढेंच नव्हे तर त्याचें शास्त्र म्हणजे तो एक वेदच मानला आहे मालविकाग्निमित्र, उत्तर-रामचरित, विक्रमोर्वशीय इत्यादि नाटकांतील उल्लेख पाहिले म्हणजे नाटक करणे अगर पाहणें या गोष्टीस पूर्वी कमीपणा दिला जात नव्हता हें दिसून येण्यासारखें आहे.... नाट्य ही एक केवळ करमणूक असल्याने त्याचें सेवन गंभीर-रसात्मक जीवित-व्यवसायाचे मानाने क्वचित् व अल्प प्रमाणानें करा-वयाचें असतें परंतु एवढ्यावरून त्यास हलकेपणा येतो असें म्हणणें चुकीचे होईल" यानंतर अध्यक्षांनी 'नाटकें हीं जगातील उत्तमोत्तम काव्याचें भांडार होत' असें सांगून पौर्वात्य व पाश्चात्य नाटककारांची माहिती दिली. इतकेंच नव्हे तर मिस एलेन टेरी किंवा हेन्री आयर्व्हिंग यांची उदाहरणें देऊन या कलावंतांना केवळ नाट्यसेवेवर राष्ट्रीय कीर्तीचा लाभ झाला याचें वर्णन केलें

शेवटी, नाट्यकलेला उर्जितावस्था येण्यासाठी काय केलें पाहिजे हें सांग-तांना अध्यक्ष म्हणाले, "नटवर्गानें निर्व्यसनी बनलें पाहिजे. आपलें सुशिक्षण वाढविलें पाहिजे व कलेच्या दृष्टीनें नाट्यकलेची सुधारणा करून तिला संपत्तिमान, मनोज्ञ आणि सुंदर अशी केली पाहिजे ... नाट्यसंस्थेच्या आश्र-यानें सर्व प्रकारच्या ललितकलांचा जितका परिपोष होतो तितका दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीनें क्वचित्‌च होईल ... नेपथ्यविधान, रंगपरिपोष, चित्रकला-प्रदर्शन व गायनद्वारा उच्च प्रतीचें मनोरंजन या सर्व गोष्टी नाट्याश्रित असल्यानें ललितकलांच्या सुधारणास ही संस्था अत्यावश्यक होय."

निबंधवाचन

(१) *संगीत मुलांचे आवाज—डॉ डी के. कुटे (धुळें)*

(२) नाटकाच्या गद्यपद्यस्वरूपाविषयीं— श्री. द आ फाटक

नाट्यसंमेलनासाठी आलेले हे दोनही निबंध नाट्यकला मासिकाच्या जून १९०६च्या अंकात प्रसिद्ध झाले होते

श्री कुटे यांच्या निबंधाचा सारांश—मराठी नाटकांतून संगीताचा प्रारंभ होऊन २५ वर्षे झाली या काळाचे १२ वर्षांचे दोन टप्पे पडतात पहिल्या टप्प्यात, नाटकांतील मुलांना शास्त्रीय संगीत पद्धतशीर शिकविलें गेल्यामुळे

त्याचा आवाज योग्य तऱ्हेने कमावला जाई पुढील काळात पारशी पद्धतीची संगीत रचना चालू झाली त्यामुळे शास्त्रीय ज्ञानाचा आधार तुटला पेटीच्या साथीवरील चढचा आवाजातील गाण्यामुळे मुलाच्या आवाजावर एकदम ताण पडू लागला याशिवाय वसवीपणा, निद्रानाश इ गोष्टी आवाज नष्ट होण्यास कारणीभूत होतातच

श्री फाटक याच्या निबधाचा सारांश—नाटय हे ससाराचे चित्र आहे वाङ्मयमिश्र अशा नाटकानी हा हेतु साध्य होत नाही अभिनयात व्यत्यय येणार नाही अशा ठिकाणी सगीत– तेंहि मर्यादित—ठेवल्यास क्षम्य होतें व चागले खुलते अभिनयचातुर्य, स्वभाववैचित्र्य, रसाविर्भाव ही जी नाटय-कलेची खरी अगें त्याचा परिपोष गद्य नाटकेच करू शकतात ऐतिहासिक नाटके तर सगीत असूच शक्त नाहीत मात्र स्थलकालाचा व रसाचा विचार करून अभिनयादि गुणास बाधक न होईल अशा ठिकाणी माफक पदें ठेविल्यास ती अस्वीकार्य होणार नाहीत"

परीक्षा—या वर्षी नाटयविषयक एक लेखी परीक्षा ठेवण्यात आली होती या परीक्षेसाठी 'मृच्छकटिक' नाटक नेमण्यात आले होते याची प्रश्नोत्तरें नाटयकला मासिक मे १९०६ या अकात प्रसिद्ध झाली आहेत

## ठराव

या समेलनात नाटयप्रयोगाच्या हक्कासबधीच्या कायद्यावर चर्चा झाली त्याचबरोबर गतवर्षीच्याच बहुतेक ठरावाची पुन्हा उजळणी झाली.

## करमणूक

समेलनप्रसगी महाराष्ट्र ना म ने श्री खाडिलकरकृत 'सवाई माधवराव याचा मृत्यु' या नाटकाचा प्रयोग करून दाखविला

## चिटणिसाचा गौरव

या समेलनास पैठण येथील एकनाथ महाराजाच्या सस्थानचे कारभारी श्री ए. अ बार्शीकर हे उपस्थित होते त्यानी नाथाचा प्रसाद म्हणून एक शाल, नाथाच्या प्रशसापत्रकासह, श्री अ वा बरवे याना, त्याच्या नाटय-सेवेच्या गौरवार्थ अर्पण केली

## समकालीन वृत्तपत्रे

या समेल्नानंतर नेटिव्ह ओपीनियन (ऑगस्ट १९०६) व विविधज्ञान-विस्तार (८ जुलै १९०६) यानी समेल्न व नाटक मडळया याना उद्देशून काही सूचना केल्या होत्या नेटिव्ह ओपीनियनने 'नाट्यसमेल्न ही संस्था नाटक मडळघाच्या मुधारणमाठी आहे ते हा या मस्थेच्या चाल्कानी अशा मडळघाना कोणत्याहि कारणान नाखुष करून या मर्थेतून बाहेर पडू देऊ नये' असे सुचविले हात

विविधज्ञानविस्ताराने समेल्नाच्या निमित्तान पुढील विचार व्यक्त केले होते (१) अभिनयाचे सोपपत्तिक आणि मार्मिक शिक्षण देणाऱ्या शाळा निघाल्या पाहिजेत (२) नाटकमडळघाची अतर्गत व्यवस्था सुधारली पाहिजे (३) नाटकमडळयाची दानत वाढली पाहिज नाटकाचा मुख्य हेतु लोकांच्या सात्त्विक व उच्च मनोवृत्तीचा परिपोष करणे हा असल्यान, जी नाटक केली जातात ती भारदस्त व लोकाची सन्मार्गाकड प्रवृत्ति करणारी अशी असली पाहिजेत नाट्यसमेल्नाच्या कमेटीन आपल्या आश्रयाखाली यणाऱ्या नाटक मडळयानी कोणती नाटके करावी, कोणती करू नयेत, कोणत्यामधील कोणता भाग असभ्यपणाचा दर्शक आहे याचा निर्णय केला पाहिजे व हे आपले काम निस्पृहपणे बजावल पाहिज या सस्थेस दरसाल काही रक्कम नाटक मडळयानी देण्याची योजना फार महत्त्वाची आह

नाट्य-समेल्नासारख्या सस्थाचा उपक्रम झाला आहे ही गोष्ट मोठ्या आनदाची आहे व वरील गोष्टीचा खल होऊन जर नाट्यकला चागवळण लागले नाटक मडळयाची स्थिति सुधारली, लोकशिक्षणास चागल स्वरूप प्राप्त झाल तर हल्लीच्या स्थितीत अशा समेलनानी मोठीच कामगिरी बजावल्यासारखे होईल '

हा उतारा विस्तारपूर्वक देण्याचा उद्देश नाट्यसमेलनासबधी जाणत्या सुशिक्षित वर्गात जी सहानुभूति निर्माण झाली होती, ती दर्शविण्याचा आहे समेलनाची विविध कार्ये पार पाडण्यासाठी नाटक मडळयानी आपल्या एका चागल्या नाट्यप्रयोगाच उत्पन्न द्यावे' असा ठराव पूर्वीच्या समेलनात झाला होता परतु त्याप्रमाणे एकाहि नाट्यसस्थेने साहाय्य केले नाही यावद्दल

' नाट्यकला ' आणि ' रंगभूमि ' या दोनही मासिकांनीं त्याच्या उपेक्षा-वृत्तीचा समाचार घेतला आहे. महाराष्ट्रांत त्या वेळीं अनेक नाटक मंडळ्या उत्तम तऱ्हेनें चाललेल्या असूनहि पहिल्या दोन वर्षांत फक्त एका राजापूरकर ना. मं. नें एका खेळाचें उत्पन्न – रु. १५० – भारतनाट्य समाजाला देणगी म्हणून दिल्याचा उल्लेख आढळतो. [१]



अध्यक्ष कृ. प्र. खाडिलकर

## ३ पुणे
### १९०७

*मराठीतील अग्रगण्य नाटककार आणि प्रख्यात नाट्यशिक्षक लोकमान्य टिळकांचे राजकीय आणि वृत्तपत्रसृष्टींतले उजवे हात.*

हें संमेलन किर्लोस्कर संगीत मंडळीच्या विद्यमानें पुणें येथील किर्लोस्कर नाट्यगृहांत दि. २० व २१ मे १९०७ या दिवशी भरलें होतें. या संमेलनाचे पूर्वनियोजित अध्यक्ष डॉ. गर्दे हे होते. परंतु कांहीं कारणानें संमेलनाचें अध्यक्षस्थान श्री. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर यांनीं मंडित केलें.

या संमेलनाची रूपरेषा 'नाट्यकला' मासिकांत पुढीलप्रमाणें प्रसिद्ध झाली होती.

(१) नाटक मंडळ्यांचे प्रतिनिधि, कार्यकारी व्यक्ति व वार्षिक १ रुपया वर्गणी देऊन सभासद झालेल्यांची खासगी सभा (या सभेंत नाट्य व्यवसायाच्या सद्य स्वरूपाची चर्चा व भावी सुधारणेच्या उपाययोजना, संमेलन-संस्थेची घटना, कार्यक्रम-योजना इ. विषयांचा विचार होईल.)

(२) जाहीर सभा — गतवर्षीच्या नाट्यसृष्टीचें पर्यालोचन, अध्यक्षांचें भाषण, नाट्यविषयक निबंधांचें वाचन व विद्वानांचीं भाषणें होतील.

(३) करमणुकीचे कार्यक्रम व नाट्यविषयक लेखी परीक्षा.

पुढील नाट्यसंस्था प्रत्यक्ष किंवा प्रतिनिधिरूपानें उपस्थित होत्या (१) स्वदेशहितचिंतक ना. मं. (२) नाट्यकलाप्रवर्तक सं. ना. मं. (३) पाटणकर सं. ना. मं. (४) महालक्ष्मी प्रासादिक सं. मं. (५) महाराष्ट्र

ना म, (६) राजापूरवर स ना म, (७) बेळगाववर स्त्री स ना म व (८) चिपळूणवर स ना म काहींनी शुभेच्छा सदेश पाठविले होते

या समेल्नाचे वेळीच पुण्यास ग्रथकाराचेहि समेलन भरल होत साहजिकच बरेच ग्रथकार नाटचसमेलनासहि उपस्थित राहिले होते

## खालावत चाललेली नाट्यकला

वि ना म च्या वतीने उपस्थिताचे स्वागत केल्यानतर श्री शकरराव मुजुमदार यानी नाटचसमेलनाचे पुढील उद्देश सागितले — (I) नाटचकलेचे पाऊल कशा रीतीने पडेल, उत्तम नाटककार व नट कशा रीतीने उदयास यतील यासबधाने विद्वानानी व सर्व नाटक मडळयानी एकत्र जमून चर्चा करणे, (II) नवीन नाटककाराना उत्तजन मिळावे व आपद्ग्रस्ताना साहाय्य मिळावे यासाठी नाटकमडळचानी मदत करून फड जमविणे

नाटयकला खालावत का चालली आहे याची श्री मुजुमदारानी खालील कारणे सागितली— (१) मिश्रसमाज, (२) सुशिक्षित लोकाची अनास्था, (३) तीच नाटकें पुन्हा पुन्हा प्रयोग करून दाखविणे, (४) नाटकाची निवड करण्याची पद्धत व (५) लोकाच्या बदलणाऱ्या लहरीप्रमाणे बदलणाऱ्या चचल अभिरुचीला अनुसरून नाटकें करण यासिवाय सामाजिक परिस्थिति, नाटच-विषयक ग्रथाचा अभाव इत्यादि गोष्टींचाहि श्री मुजुमदारानी निर्देश केला

या समेल्नाचे अध्यक्ष कै कृ प्र खाडिलकर याच्या भाषणाचा अहवाल उपलब्ध झाला नाही तथापि या समेलनाला उपस्थित राहिलेल्या काहीं विद्वानाची भाषणे प्रसिद्ध झाली आहेत त्याचा सारांश पुढे दिला आहे

## निबधयाबन

या समेल्नात निबधासाठी पुढील विषय जाहीर करण्यात आले

(१) गद्य नाटकें यशस्वी होण्यासाठीं काय करावे ? या विषयावर एकूण ११ निबध आले त्यापैकी चागल्या दोन निबधाना बक्षिस देण्यात आलीं बक्षीस र २५

(२) श्री कृ कोल्हटकर याच्या चार नाटकातील निवडक वेचे स्पष्टीकरण व समानार्थक सस्कृत, इग्रजी उताऱ्यासह बक्षीस रु २० व १५

**लेखी परीक्षा**— 'शाकुंतल' हें नाटक लेखी परीक्षेसाठी नेमण्यात आलें होतें, व यशस्वी तीन उमेदवाराना श्री माधवराव पाटणकर र १० डॉ श म विध्वस व नाट्यसंमेलन याच्याकडून प्रत्येकी र १५ अशी तीन बक्षिसें जाहीर करण्यात आली (या परीक्षेतील यशस्वी उमेदवारात ग कृ बोडस हे एकटेच नाट्यव्यवसायी होते, इतर कॉलेजचे विद्यार्थी होते श्री बोडस याना दुसरें बक्षीस मिळाले[१])

चर्चा

नाटकासबधानें चार शब्द— श्री लक्ष्मणशास्त्री लेले

श्री लेलेशास्त्री यानी सस्कृत वाङमयाच्या आधारें नाट्याची तात्त्विक-चर्चा केली ते म्हणाले, 'नाट्य लोकानुचरितम्' असें नाट्याचे लक्षण आहे घडलेल्या गोष्टी अभिनयद्वारा प्रेक्षकास दाखविण्याच्या उद्देशाने रचिलेले जें काव्य तें नाटक होय याला दृश्य काव्य असें सस्कृत साहित्यकारानीं नाव दिले आहे यालाच अभिनय किंवा रूपक म्हणतात रूपकाचे दहा प्रकार असून त्यापैकी एकाला नाटक अशी सज्ञा आहे

नटाचा व्यापार किंवा कर्म तें नाट्य होय याला अगदी मराठी शब्द नाच हा आहे पुढे लक्षणेने नाट्य शब्दाचा अर्थ अभिनययुक्त नर्तन असा झालेला आहे

यानतर व्याख्यात्यानी, भरतनाट्यशास्त्र, दशरूपक या ग्रथातील काही वचनाचा उल्लेख केला नतर ऐतिहासिक काळातील नाट्यविषयक दृष्टिकोन विचारात घेतल्याननर नाटकासबधी पुढील चार गोष्टीचा त्यानी उल्लेख केला—

(१) उत्तम नाटकें, सहृदय व रसिक गृहस्थाच्याकडून लिहून घेतली पाहिजेत (२) नटमडळी सुशिक्षित निर्व्यसनी, नम्र व स्वकार्यकुशल असावी (३) उत्तम रगभूमी व प्रसाधनाची उत्तम साधने साध्य केली पाहिजेत व (४) ग्रथकारानी अभिरुचीला शुद्ध वळण लावले पाहिजे

वाईचे काशिनाथशास्त्री लेले यानी आपल्या भाषणात नाटक-सगीता-दिकाचा धदा प्राचीन महर्षीनीहि प्रशसनीय मानला असल्याचे सागून

१. नाट्यविषयाची सुशिक्षित चर्चा, पृ ४५ ते ५९

नाटक मंडळींनीं सदाचरणी राहिलें पाहिजे व प्रेक्षकांनीहि उदात्त विचार-जनक अशीच नाटकें पाहण्याचें ठरविलें पाहिजे असा उपदेश केला.

श्री. विष्णु मोरेश्वर महाजनी यांनी नाटयरचनेंत 'एकत्व' साधण्याची व नटांमध्येंहि नाटकें उत्तम करून दाखविण्यासारखें सहृदयत्व असण्याची आवश्यकता सांगितली. कवि (नाटककार) व नट यांचे संबंध कसे असतात यासंबंधी ते म्हणाले, "कवीचें कर्तृत्व जेथें हात टेकतें तेथें त्याची पूर्णता नट करून दाखवीत असतो. या कारणानें कवीचे पोषक नट हे होत. उभयतांचा अन्योन्याश्रय असतो.- कालिदासभवभूतीसारखे महाकवि हे आपल्याला नटाचे मित्र म्हणवीत असत." मध्याच्या नाटकासंबंधीं ते म्हणाले, "चांगले कवी, चांगलीं नाटकें, चांगले नट ह्या गोष्टींनी नाटयकलेची सुधारणा होणें ती एकीकडे राहून चांगले पडदे, चांगले पोषाख, चांगले देखावे या अप्रधान गोष्टींचीच वृद्धि फार होत आहे....यांत नाटयकौशल्य नाहीं तें अगोदर पाहिजे."

घद्याचा प्रसग वगळला असता सव त ह्न समाजातील एक सद्गृहस्थ या नात्यान आपणास उत्तम मा यता सपादन करता येईल अशी महत्त्वाकाक्षा अवश्य धरावी "

समेल्नाच्या तीन दिवसात रोज खाजगी बैठक होऊन त्यात भारत नाट्य समाजाच्या रचनबद्दल विशष ऊहापोह झाला व समाजाला व्यवस्थित स्वरूप दण्यात आल या प्रसगी तयार करण्यात आलेली समाजाची घटना पुढे दिली आह[१]

करमणूक

नाटचकला प्रवर्तक मडळीन मुद्दाम समेलनासाठी बसविल्या 'प्रमगुफा' नाटकाचा प्रयोग करुन दाखविला

सुप्रसिद्ध नकलाकार श्री गोपाळराव भोड व मराठे याच्या 'मवप व माभिनय' नकलाचा कार्यक्रमहि समेल्नात करण्यात आला

या समेलनानतर सस्थेचे एव चिटणीस श्री मुजुमदार यानी आपल्या जागेचा राजीनामा दिला, त्याच्या जागी श्री बरव याची निवड झाली स्वदशहितचितक ना म चे मॅनजर श्री गोविदराव होनप बी ए, याची दुय्यम चिटणीस म्हणून निवड करण्यात आली श्री मुजुमदारानी आपल्या राजीनाम्याच कारण 'नव्या इसमाला सधि मिळावी अस दिलत आढळत'

या नाटयसमेलनाची उपयुक्तता समाजातील विचारवताना पटलेली असली तरी समल्नापासून नाटयसस्थाच्या अपेक्षा फार मोठ्या हात्या त्या पुऱ्या करणें समाजाच्या आवाक्याबाहेरच होत त्याच्या मत समाजानें (समल्नान) पुढील गोष्टींवर लक्ष द्याव—[२]

(१) कोणत्याहि नाटकमडळीतील इसम दुसऱ्या नाटकमडळीनें, त्याच्याजवळ पूर्वीच्या नाटकमडळीच (Leaving Certificate) लीव्हिंग सर्टिफिकेट असल्याशिवाय आपणाकड ठवू नये

---

१ परिशिष्ट पहावें

२ रगभूमि, वर्ष ५, अक ३
नाट्यकला पाक्षिक, ? ७ १९०७

(२) एखाद्या गावी एक नाटक मंडळी असता तिच्या गैरसोयीबद्दल तिच्याशी विचार विनिमय केल्याशिवाय दुसऱ्या नाटकमंडळीने त्या गावी जाऊ नये

(३) सर्व नाटकमंडळ्यांनी मिळून रेल्वे अधिकाऱ्यांशी पत्रव्यवहार करून विशेष सवलती मिळवाव्यात व स्थलांतर करताना होणाऱ्या गैरसोयी नाहीशा करून टाकाव्या

(४) नाटक मंडळ्यांना प्रत्येक गावी पोलिसापासून बराच त्रास सासण्याचे प्रसंग येतात त्याबद्दल वरिष्ठ अधिकाऱ्यांशी पत्रव्यवहार करून त्याचा कायमचा बंदोबस्त व्हावा

(५) एक चागली परीक्षक कमिटी नेमून तिच्या संमतीने उत्तम नाटकाची यादी तयार करवावी व त्याच नाटकाचे प्रयोग मंडळ्यांकडून सर्वत्र व्हात जावेत

(६) भारत नाट्यसमाजाचे द्रव्यनिधीतून आपद्ग्रस्त मंडळीस व वृद्ध नटास मदत मिळावी

या सूचना योग्य अशाच आहेत तथापि त्या अमलात यण्यासाठी नाटक मंडळ्यांनी जें साहाय्य करावयास पाहिजे तें मात्र त्यांनी केलेले दिसत नाहीं वर्षभर खटपट करूनहि नाटकमंडळ्यांनी जी उदासीनता दाखविली त्याबद्दल संमेलनाचे चिटणीस श्री बरवे यानी पुढील उदगार काढले आहेत " नाटक मंडळ्याकडून ( वर्षांतून एका प्रयोगाच उत्पन्न समाजास देण्याची सक्रिय सहानुभूति— ) प्रत्ययाला येत नसल्याकारणाने हे चागले आणि महत्वाचे काय उगाच मागें पडू पाहत आहे याचा सर्व नाटक मंडळ्यांनी जरूर विचार करावा नाहीतर त्याचा सर्व दोष आपल्याच माथी बसणार आहे '

तथापि या वर्षी फक्त नाट्यचक्रप्रवर्तक मंडळी व पुण्याचा सोशल क्लब या दोन संस्थानीच संमेलनाची धुरा साभाळण्यास मदत केली



अध्यक्ष : नी. वि. छत्रे

# ४. नाशिक

१९०८

*मराठी नाटयकलेचीं आरंभापासूनचीं सर्व रूपांतरें पाहिलेले व नाटयाशीं दृढ परिचय असलेले मार्मिक व विद्वान् रसिक.*

हें संमेलन नाशिक येथील विजयानंद नाटकगृहात दि २२ ते २४ मे १९०८ या दिवशी नाटयकला प्रवर्तक शं. ना. मंडळीच्या विद्यमानें भरविण्यांत आलें. रावसाहेब नीळकंठ विनायक उर्फ कोंडोपंत छत्रे हे संमेलनाचे अध्यक्ष होते. संमेलनाचें नियोजित स्थान बदलल्यामुळें आणि गेल्या संमेलनात मजूर झालेल्या ठरावांपैकीं एकाचीहि अमलबजावणी न झाल्यामुळें 'रंगभूमि'कारानीं संमेलनासबंधी थोडी कुरकुर केलेली आढळते ![1] संमेलनाच्या चिटणिसांच्या अदलाबदलीसंबंधीहि थोडी नापसंती व्यक्त झालेली दिसते. तथापि संमेलन व्यवस्थित पार पडलें.

## नाटक हें सुसंस्कृत संसारचित्र

आपल्या भाषणांत अध्यक्ष म्हणाले — "सर्व धर्मांच्या व सर्व मताच्या हजारों आबालवृद्धास एकदम करमणूक करणारी व शिक्षण देण्यास समर्थ अशी नाटक हीच एक संस्था असल्यामुळें ती सुधारून तिच्यापासून हरकामी उपयोग करून घेण्याची इच्छा सर्वांस झाली आहे हें योग्यच आहे." प्राचीन संस्कृत ग्रंथांचा निर्देश करून भारत नाटकाची पूर्वपीठिका अलीकडची नसून ती फार प्राचीन आहे असें अध्यक्षांनी दाखवून दिलें नाटकाची त्यांनीं 'सुसंस्कृत संसार-चित्र' अशी व्याख्या केली याच काळात संस्कृत व इंग्रजी नाटकांचीं भाषांतरें करण्याचें काम विद्वानांनी मोठ्या उत्साहानें आरंभिलें होतें. त्याची आवश्यकता सांगताना अध्यक्ष म्हणाले, " ... यांत दोन हेतु आहेत. एक, त्या त्या देशातील

---

१. रंगभूमि, वर्ष – १, अंक १०.

प्रतिभापूर्ण उत्तम लेखकाचे त्रिकालाबाधित सिद्धात काय आहेत हे आपणास समजणें इष्ट आहे व त्या त्या देशातील त्या त्या कालचे रीतिरिवाज हेहि समजले पाहिजेत या दोहोच्या साहाय्यावाचून आमची सुधारणा प्रागतिक व श्रेयस्कर होणार नाही "

## निबंध व परीक्षा

या वर्षी पुढील विषयावर निबंध मागविण्यात आले होते — 'नाटक प्रयोगात स्त्रीवेषासाठी मुलाचेऐवजी स्त्रियाची योजना करता येईल काय? त्यापासून नफे व तोटे? (ही योजना) कशा रीतीने शक्य आहे?'

या विषयावर कोणीहि निबंध लिहून पाठविला नाही

लेखी परीक्षेसाठी या वर्षी 'वेणीसहार' हे नाटक होते परंतु हीहि परीक्षा झाली नाही

नाट्यगुण परीक्षेसाठी पुढील दोन विषय जाहीर करण्यात आले होते (१) प्रसिद्ध व्यक्तीची भूमिका (नक्कल) करून दाखवावी व (२) करुण, वीर, भयानक या रसातली भाषणे (प्रत्येकी सुमारें २० मिनिटें) म्हणून दाखवावी

या परीक्षसाठीहि उमेदवार मिळाले नाहीत

## खाजगी बैठक

अध्यक्ष श्री छत्र यानी खाजगी बैठकीत अनेक विवाद्य प्रश्नाचा निकाल केला यापुढे हे समेलन निदान दोन वर्षे तरी पुण्यासच भरवावे व नाट्य-वस्तुसग्रहालय नाशिकहून पुण्यास आणावे या पूर्वीच्या ठरावाची पुन्हा उजळणी झाली पुढील समेलनास अन्यत्र आमत्रण न आल्यास ते भरविण्याची व त्याच्या खर्चाची जबाबदारी घण्याचे पाटणकर ना म ने जाहीर आश्वासन दिले

नाट्यवस्तुप्रदर्शन

या संमेलनाचा एक उल्लेखनीय विशेष म्हणजे यंदा प्रथमच भरविण्यात आलेले 'नाट्यवस्तुप्रदर्शन' हा होय हा उपक्रम नवीनच असल्याने अपेक्षेइतक्या वस्तु आल्या नव्हत्या, तथापि ज्या होत्या त्या नाट्याची सर्वांगीण कल्पना आणून देणाऱ्या होत्या

मुंबईच्या डायमंड साप कंपनीने नटाच्या नेपथ्यविधानात उपयोगी पडण्यासाठी म्हणून कुसुंब्याचे फुलापासून तयार केलेला रंग ठेवला होता श्री दिनकर केशव साठ्ये यांनी आपल्या भायखळा येथील जरीचे कारखान्यात तयार केलेले जिग कामाचे नाटकी पोषाख, ठेवले होते नाट्यकला प्रवर्तक स म चे मॅनेजर यांनी तयार केलेली, तबोल्याप्रमाणे स्वरभरणा करणारी सप्तस्वराची पायपेटी, पाटणकर ना म तील मिस्त्री भाऊ कृष्ण सुतार याने तयार केलेल्या पडद्याच्या वप्प्या, पौराणिक नाटकातील पात्राचे वेष मुखवटे व आयुधे इ वस्तुहि ठेवल्या होत्या अर्वाचीन इंग्रजी पद्धतीच्या एका नाटकगृहाचा पूर्वनकाशा (Plan) तयार केला होता नाशिकच्या यशवंतसिंग परदेशी या कारागिराने केलेल्या कातरकामाचे सुरेख नमुने होते

श्री गोपाळ अनंत फडके यांनी काढलेली तैल रंगातील अर्धनारीनटेश्वराची तसवीर, पाटणकर मंडळीतील श्री शिवरामपंत जोशी याचे विविध मनोभाव व अंगविक्षेप दर्शविणारे फोटो होते यांशिवाय दादर येथील फाळके मंडळीकडून आलेल 'मूक नाटक' कै व ख पारेख याची प्रो पाठारे यांनी काढलेली तसबीर, आणि सर्वांत विशेष म्हणजे 'ज्योतिःशास्त्रपद्धतीने नाट्यगुणबोध' असा ठळक मथळ्याखाली चार प्रसिद्ध नटाच्या कुंडल्या देऊन त्यातील ग्रहावरून त्या नटाचा नाटकी गुणाचा कसकसा बोध होतो याची माहिती संग्रहित केलेली होती

करमणूक

या कार्यक्रमात यंदाहि श्री भाड याच्या नकला श्री बोरकर याचे जादूचे प्रयोग व प्रो पाठारे याची ग्लॅडस्टनची संक्षेप भूमिका इ चा समावेश होता श्री ग कृ वाडेकर यांनी अश्वत्थाम्याची भूमिका करून दाखविली संमेलनात वे शा स हरिशास्त्री गर्गे याच्या संस्कृत भाषणाचाहि कार्यक्रम झाला

---



अध्यक्ष ग कृ गर्दे

## ५. पुणें
## १९०९

पुण्यातील एक नामांकित डॉक्टर, सार्थ वाग्भट वगैरे ग्रंथांचे लेखक, केसरी, किर्लोस्कर नाटक मंडळी यांशी यांचा सुरवातीपासून संबंध होता.

हें संमेलन पुणे येथील नूतन आर्यभूषण थिएटरामध्ये पुण्याच्या सोशल क्लब, या हौशी कलावंताच्या संस्थेच्या वतीने दि २४ व २५ मे १९०९ या दिवशी भरलें होतें. संमेलनाचे अध्यक्षस्थान डा गणेश कृष्ण गर्दे यांनी स्वीकारले होतें

संमेलनास पुढील नाटक मंडळ्यांचे प्रतिनिधि उपस्थित होते —(१) नाट्यकला प्रवर्तक स ना म, (२) श्रीगुरुप्रासादिक स ना म, (३) महाराष्ट्र ना म (४) किर्लोस्कर स ना म व (५) शाहू नगरवासी ना म

(१) राजापूरकर ना म (२) श्रीमहालक्ष्मीप्रासादिक स ना म व (३) स्वदेशहितचिंतक ना, म यांनी पत्ररूपानें संमेलनाला सहानुभूतिपर संदेश पाठविले होते

रा मा दादासाहेब छत्रे, न चिं केळकर व कृ प्र खाडिलकर हे संमेलनाचे माजी अध्यक्ष आणि पुण्यातील बहुसंख्य विद्वान व नाट्यप्रेमी रसिक संमेलनाला उपस्थित होते

मंगलाचरण झाल्यानंतर सोशल क्लबचे चिटणीस व संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री दत्तात्रय आत्माराम फाटक यांनी स्वागतपर भाषण केलें हे पाचवें संमेलन भरविण्याचा मान धंदेवाईक नाटकमंडळ्यांच्या औदार्यानें हौशी नटांच्या संस्थेला मिळाला याबद्दल आनंद व्यक्त केल्यानंतर श्री फाटक यांनी

नाट्यकलेचा प्रभाव वर्णन केला "अनेक बहारीचे प्रसंग, काव्ये, कादंबऱ्या व इतिहास यांतून ग्रथित केलेले असतात, परंतु तेच प्रसंग ज्या नाटकांत गोविले आहेत अशी नाटके रंगभूमीवर चालू असता त्याचा जो प्रेक्षकवर्गाचे मनावर परिणाम घडतो तो जास्त टिकाऊ व हितपरिणामी असतो रंगभूमीवरील देखाव्यासंबंधीं ते म्हणाले, "डोळ्याला दिपवून टाकणारे पण प्रसंगविशेषी समयाला न साजणारे असे देखावे दाखविण्याकडे नाटकमंडळ्यांच्या चालकांचें लक्ष अधिक वेधल्यामुळें मुख्य कर्तव्याकडे दुर्लक्ष होऊं लागलें आहे उत्तम नट निर्माण करणें हें नाटकाचें मुख्यांग आहे परंतु त्या दिशेनें व्हावा तसा प्रयत्न होत नाहीं"

अध्यक्ष स्थानापन्न झाल्यानंतर संमेलनाचे चिटणीस श्री अ वा वर्वे यांनी मराठी रंगभूमीचा मागल्या वर्षाचा संक्षिप्त अहवाल वाचून दाखविला अहवालाचे प्रारंभीं पुढील दिवंगत नाटककारांना व नाट्यसमीक्षकांना त्यांनी श्रद्धांजलि अर्पण केली

(१) सोकर बापूजी त्रिलोकेकर (नलदमयंती, हरिश्चंद्र, सावित्री या मराठी व शनिमाहात्म्य, चित्रसेनगंधर्व, दमयंतिस्वयंवर, सुभद्राहरण, कृष्णविजय, मालिनी इ गुजराथी नाटकांचे कर्ते)

(२) गोपाळ अनंत भट (वुक्रिश नाटकांच्या काळांत श्री भट यांची रमा, तारा, पद्मावती ही नाटकें लोकप्रिय झाली होतीं)

(३) पुरुषोत्तम भास्कर डोंगरे (संगीत व गद्य अशा दोन्ही प्रकारच्या नाटकांचे लेखक यांच्या जरठोद्वाह आणि भीमसिंग पद्मिनी या गद्य नाटकांना बक्षिसें मिळाली होती, तर चंद्रसेना व चंद्रहास हीं संगीत नाटकें स्वदेशहितचिंतक व किर्लोस्कर या मंडळ्यांच्या रंगभूमीवर अत्यंत लोकप्रिय झाली होती 'सैरंध्री' या नांवाचें आणखी एक संगीत नाटक त्यांनी लिहून ठेविलें आहे)

(४) काशिनाथ नारायण पटवर्धन— नाटकमंडळ्यांच्या दोषांचा दोषैकदृष्टीनें खरपूस समाचार घेणारीयाची 'विविध ज्ञानविस्तारा'तील 'नाटक्यांचे तारे' ही लेखमाला त्यांतील मार्मिकतेमुळें फार गाजली होती सॅक्स्पीअरच्या टॅलिस्मन (Talisman) च्या आधारानें लिहिलेली 'संग्रामसिंह' ही यांची नाट्यकृति नुकतीच प्रसिद्ध झाली होती

(५) बाबुराव वरदोकर— याचे नाटक लौकरच रगभूमीवर प्रयोगरूपात येणार होते

यानतर चिटणिसानी गत वर्षांत रगभूमीवर आलेल्या नवीन नाटकाचा उल्लेख केला ती नाटके पुढीलप्रमाणे— (१) श्री दा वि नेवाळकरकृत 'मनोविजय' (२) श्री स धो काणेकृत 'द्रौणीमणिहरण, व (३) त्रिमूर्ति, (४) श्री शिंत्रे व श्री कोल्हटकरकृत 'विश्वामित्र' (५) श्री भा वि वरेरकरकृत कुजविहारी, (६) श्री द आ फाटककृत पुष्पराज

मराठी रगभूमीची सद्य स्थिति वर्णिताना श्री वरवे म्हणाले, "आज महाराष्ट्र नाटक मडळयाची सख्या सुमारें १५।२० आहे त्यात ५।६ च ठळक असून त्याचे नाटयव्यवहार व्यवस्थितपणे चालू असलेले दिसतात बाकीच्या काही कशातरी जीव धरून असून इतराची निरयश धडामोड चाललेली असते [1] ... आमच्या नटवर्गांत नवीन भर आणि तीहि नावाजण्यासारखी भर झालेली जशी विरळा दृष्टीस पडते, तशीच एकदा हौसेने किंवा सगतीने हा पेशा पत्करून चुकलेल्या नटाची मग या विषयात अभ्यासाने, शिक्षणाने किंवा परिश्रमाने उत्तरोत्तर गति पुढे आहे असेहि दाखविता येणे अगदी विरळच झालें आहे आवाज, स्वरूप व ताकद याची ईश्वरदत्त जेवढी स्वाभाविक अनुकूलता नाटकात शिरताना बरोबर आली असेल आणि पुढें नाटयव्यवसायाभोंवतालचे मोह आणि कुपथ्यें याच्या तडाख्यातून कायम राहिली असेल, तिच्या आधारावर आमच्या नटाचे वाईट बरें जीवन चाललेले दिसत असते "

त्या वर्षी किर्लोस्कर ना म ने स्वत च्या जन्मभूमीत—पुण्यनगरीत—स्वत च्या नावाचे एक नाटयगृह उभारले त्याबद्दल तिच्या चालकाचे अभिनदन केल्यानतर नाटकवाल्याचे गावातील समाजावरोबर आणि सरकारबरोबर जे सबध यतात त्याबद्दल चिटणीस म्हणाले, ' या वर्षी काही काही ठिकाणी काही नाटक मडळ्याचा गावातील लोकाशी विरोधभाव उत्पन्न झाला हे काही चागले झाले नाही नाटकवाले हे सर्वथा लोकाश्रयावलबी आहेत त्यानी लोकाना दुखवण्याची किंवा त्याच्याशी वढलीने वागण्याची दुर्बुद्धि धरू नये "

काही ठिकाणी स्थानिक अधिकाऱ्यानी नाटकातील काही भागाला फाटा

देण्याचे तर कांहीं नाटक मंडळयांना हद्दपार करण्याचे हुकूम येन्ने त्याबाबतीत भारत नाट्यसमाजाने सरकारशीं तडजोड करून असे अडथळे येणार नाहींत अशी तजवीज करावी असेंहि श्री. खरे यांनी सुचविलें.

## अध्यक्षीय भाषण

यानंतर संमेलनाचे अध्यक्ष डॉ. गर्दे यांचें भाषण झालें. ते म्हणाले, "नाटक हें नानारसात्मक असा लोकचरित्राचे चित्र असल्यामुळें परिपक्वदशेंत आलेल्या समाजातच त्याला योग्य विषय मिळू शकतो. कवी हे नाट्यकलेचें मुख्य अंग होय. नट हें दुसरें, रंगभूमि हें तिसरें व प्रेक्षक हें चौथें अंग. रंगभूमीच्या ऊर्जित अवस्थेस या चारहि अंगात सुधारणा होणें अवश्य आहे." यानतर अध्यक्षांनी या चारहि अगाचा परामर्श घेतला. त्याच्या मते कवि हा बहुश्रुत व प्रतिभासंपन्न पाहिजे. त्याच्या भाषेंत शब्दलालित्य व प्रसाद हे गुण पाहिजेत. तो स्वतः नट असला पाहिजे किंवा त्याने पुष्कळ नाटक प्रयोग पाहिलेले तरी असावेत.

नाटकाचे कथानक देशकालानुरूप, संविधानक मजेदार, भाषा पात्रानुरूप व विस्तार मध्यम प्रमाणात पाहिजे. ते नानारसात्मक असून बोधप्रद असावें.

नटात कायिक, वाचिक व मानसिक अशा तीनही प्रकारचे कांहीं गुणसमुदाय असावे लागतात असें सागून नतर अध्यक्षांनी त्या दहा गुणाचें सविस्तर विवेचन केलें

रगभूमीने चार गुण पुढीलप्रमाणें असावेत— (१) सुविस्तीर्णता, (२) बसावयाच्या जागाची योग्य रचना व व्यवस्था, (३) हवाशीरपणा व स्वच्छता आणि (४) उपकरणाची पूर्णता

नाट्यकलेचे चौथें अग जें प्रेक्षक त्याच्या अगी तीन गुण असावयास पाहिजेत ते म्हणजे, (१) विदग्धता, (२) रसिकता व सहृदयता आणि (३) खर्चीकपणा.

कवीचे सहा, नटाचे दहा, रगभूमीचे चार व प्रेक्षकाचे तीन अशा एकदर तेवीस गुणानी सपन्न असलेली नाट्यकला पूर्णतेला प्राप्त होते.

भाषणाच्या शेवटी नवे नट व नाटककार याची निर्मिति होणें, नटशाला स्थापन होणें, नटाना शिक्षण मिळणे व त्यांची नीतिमत्ता सुधारणे इ. गोष्टींचा उल्लेख करून अध्यक्षानी आपले भाषण सपविलें.

विवेचन

(१) ऐतिहासिक नाटकें — लेखक श्री वासुदेव गोविंद आपटे

ऐतिहासिक नाटकें म्हटले म्हणजे तीं इतिहास आणि काव्य यांच योग्य प्रमाणात झालेलें समिश्रण असलें पाहिजे हें उघड आहे इतिहास आणि काव्य ही भावंडें खरी तथापि दोघांचेंहि हक्क सारखे मर्यादित राखून दोघांच्या करवीं नाटकाचें इष्ट कार्य घडवून आणणें हें नाटककाराचें कर्तव्य असतें हें एकीकरणाचें काम खरें कौशल्याचें असतें योग्य पात्रें खरोखरीचीं इतिहासांत नसलीं तर नाटककारानें पाहिजे तर नवीन कल्पनेनें निर्माण करावीं पण तत्कालीन स्थितीचें चित्र बिघडू देता कामा नये ऐतिहासिक नाटककारानें मनुष्य जातींत ज्या चित्तवृत्ति विशेष ठसठशीत असतील तेवढ्याच खुलवून दाखविल्या पाहिजेत

विशेष प्रकारें झटलें पाहिजे...संस्थेच्या निधींचा बोजा नाटकमंडळ्यांनींचा आपल्या शिरावर घेणें जरूर आहे.

## चर्चा, ठराव इ.

'निबंधवाचनानंतर कांहीं भाषणें झालीं. श्री. पं. वा. मुजुमदार यांनी आपल्या भाषणांत न्यूयार्क येथील 'People's Institute' या संस्थेची माहिती सांगितली. तिचा उद्देश सर्व वर्गाच्या लोकांत परस्पर दळणवळण वाढावें असा आहे. नाटकगृह ही नीतिशिक्षणाची पाठशाळा आहे ही गोष्ट गृहीत धरून प्रेक्षकसमाजाला उत्तम नाटकें पाहावयास मिळतील अशी तिनें व्यवस्था केली आहे. निवडक विद्वान् मंडळीकडून बोधपर व सुरस नाटकाचें परीक्षण करून त्यांची प्रसिद्धि करणें हें या संस्थेचें कार्य आहे. शेवटी, पुण्यासारख्या शहरांतहि अशी एखादी संस्था व निव्वळ नाटकविषयाचें ग्रंथसंग्रहालय असावें अशी श्री. मुजुमदारांनी सूचना केली.

त्यांच्या भाषणानंतर श्री. इस्माएल बावाजी या मुसलमान नाटककाराचें भाषण झालें. नाटकासारख्या करमणुकीच्या बाबतीत मुसलमानांनी अलिप्त न राहतां एक होऊन हें सत्कार्य केलें पाहिजे, मराठी लेखकांनी अरबी, फारसी, उर्दू वाङ्मयाकडे लक्ष देणें युक्त आहे, नवीन नाटयशाळा काढून पदवीधर ॲक्टर्स निर्माण करणें जरूर आहे इ. सूचना श्री. इ. बावाजी यांनी केल्या.

*संमेलनाच्या दुसऱ्या दिवशी नाटकमंडळयांचे प्रतिनिधि, संमेलनाचे माजी* व आजी अध्यक्ष आणि हितचिंतक मंडळी यांची खासगी बैठक होऊन भारत-नाटयसमाजाचे सर्वसाधारण (General) व विशेष (Special) नियम ठरविण्यांत आले व झालेल्या खर्चास मंजुरी देण्यांत आली.

## नाटयपरीक्षा

लेखी परीक्षेसाठी 'वेणीसंहार' नाटक ठेविलें होतें. त्या परीक्षेंत नाटयकला प्रवर्तक म. तील श्री. ग. वा. साने यांना रु. १० चें पारितोषिक देण्यांत आलें.

## करमणूक व अध्यक्षीय समारोप

नाटयप्रसंग (Dramatic Situation) सुचवून त्याप्रमाणें नाटयप्रवेश करून दाखविण्याच्या अभिनव योजनेत सोशल क्लबच्या दोन सभासदांनीं *'भरत–कैकयी सवादा'चा प्रवेश करून दाखविला. डॉ. कृ. बा. खरे यांनी*

हॅम्लेट, आथेल्लो, अँटनी दर्याबाई, भरत इ भूमिका सवेष व साभिनय अशा इग्रजी-मराठी भाषणासहित करून दाखविल्या

आपल्या अध्यक्षीय समारोपाच्या भाषणात समेलनातील चर्चेचा परामर्श घऊन डॉ गर्दे म्हणाले, "नाट्यकल्त सुधारणा करण्याच काय नाटक-मडळ्या व सुशिक्षित प्रेक्षक या दोघावरहि आहे श्री आपटे याच्या निबधा विषयी बोलताना अध्यक्ष म्हणाल नाटकातून एतिहासिक व्यक्तींच्या विशष गुणाचेच प्रकटीकरण झाल पाहिजे नाहीतर नाटकात वैगुण्य येत ही समजूत बरोबर नाही थोर पुरुषामध्ये जे श्रेष्ठ आहेत त्याच्यात शौर्याखरीज दुसऱ्या अनक गुणाचा विकास झालेला आढळून येतो त्याच्या मनाचा व बुद्धीचा विकास अनक बाजूनी झालेला असतो (या ठिकाणी अध्यक्षानी सौभद्रातील अर्जुन उत्तररामचरितांतील व महावीरचरितातील राम याची उदाहरणे दिली) आपट याच्या 'इतिहास रस' किंवा सत्य रस यासबधाने मला इतकेंच सागावयाचे आहे की कोणतीहि गोष्ट ती एतिहासिक आहे एवढ्या-वरुनच रसात्मक होऊ शकत नाही त्या गोष्टीत नवरसापैकीच जर एखादा भाग असेल तरच ती रसात्मक होईल एखादे वेळी नाटकात एतिहासिक गोष्टीचा विपर्यास झाल्याने प्रक्षकाची मनोवृत्ति बावचळल्यासारखी होते ही जी रसहानि होते ती इतिहासरसाची अस आपट म्हणतात परतु हा जो वृत्तीवर धक्का बसतो तो रसहानीमुळें नसून फार दिवसापासून चालेल्या मनाच्या सस्काराचा विपर्यास झाल्यानें होतो हा सस्कारभग आहे रसभग नव्हे एकदरीत एतिहासिक रसाची कल्पना चुकीची आहे असे म्हणावे लागते"

होणे हेच आम्हाला आपल्यापासून आज विशेष साहाय्य पाहिजे आहे आपण विद्वान किंवा मार्मिक प्रेक्षक नाहीं असे नाही पण एवढें मात्र मला मोठ्या कष्टाने म्हणावे लागते की आपण 'वळण लावणारे, कार्यकारी प्रेक्षक नाही नटवर्ग आज इतकी वर्षे शक्य तितके प्रयत्न करीत आहे पण त्याचे एकाकी प्रयत्न या बाबतीत व्यर्थ होत आपणा प्रेक्षकाच्या हातात टीका हे मोठें कार्यकारी शस्त्र आहे, या शस्त्राचा जर आपण योग्य उपयोग करीत राहिल्यात तर नाट्यकलेची इष्ट मार्गांनी सुधारणा अवश्य झालीच पाहिजे प्रेक्षकांनी आपले कर्तव्य योग्य रीतीने बजाविले नाही तर रंगभूमीवरील चांगले चांगले नटहि बिघडून जातात" वर्तमानपत्रानेहि कार्यकारी 'प्रयोगा-वरील टीकेचा अभाव आहे असे सांगून श्री कारखानीस यांनी वृत्तपत्रांना अशी सूचना केली की त्यांनी नाट्यकला हे लोकशिक्षणाचेच एक साधन आहे ही गोष्ट लक्षात घेऊन तिची सुधारणा करण्याच दृष्टीने प्रयोगावरील

प्रारंभ झाला व त्याची वाढ वसवशी होत गेली हें सांगितल्यानंतर नाटय-संमेलनाविषयी ते म्हणाले, "*संमेलनाची पहिली कल्पना रा. अनंतराव बरवे यांनी काढून* १९०५मध्यें तिला मूर्त स्वरूप दिलें. आजपर्यंत प्रतिवर्षी संमेलन होत असून गेल्या वर्षापासून पुण्यग्राम हेंच संमेलनाचें कायमचें वसतिस्थान असावें असें ठरलें आहे.. एकाकी नटाची कार्यपूर्णता 'मंडळी' स्थापन झाल्याशिवाय व मंडळीची कार्यपूर्णता संमेलनें स्थापित झाल्याशिवाय होत नाहीं. कला वाढण्याला संमेलन हें साधन होईल. पूर्वी या कलेला जी वाढ प्राप्त झाली होती, ती पुनः संपादन करण्यासाठीं व हल्ली पाश्चात्य देशांत नाटयकलेला प्रोत्साहन मिळून तिचें स्वरूप दिवसानुदिवस उन्नततर होत आहे, त्याच्याशीं आपला संयोग ठेवावयाचा असेल तर ही खर्चाची, बुद्धीची, तपश्चर्येची कार्यें समाजाच्या सहानुभूतीशिवाय व संमेलनाच्या कार्यक्षम अस्तित्वाशिवाय बरोबर रीतीनें पार पडणें शक्यच नाहीं." नाटक व्यवसाया-वरील सरकारचा 'सक्त पहारा,' आश्रयदात्या प्रेक्षकांची विशिष्ट अभिरुचि, नाटकें लिहिणाऱ्या कल्पक व प्रतिभाशाली कवींची वाण व नाटकधंद्यात शिरलेले उनाड लोक या चार अडचणींचा निर्देश करून त्यांचा निरास करावयाचा असेल तर संघटित संमेलन हें अवश्य कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य आहे असें अध्यक्षांनी प्रतिपादन केलें. त्याकरितां नाटकमंडळ्यांनी समाजाला भरपूर द्रव्यसाहाय्य व मनुष्यबळहि द्यावें अशीहि त्यांनी सूचना केली. नट-वर्गाला उद्देशून ते म्हणाले, "नटाचें काम मनोरंजन करण्याचें आहे. शिकविणें हा नाटयकलेचा मुख्य विषय नाहीं. तथापि नटानें अभिनययुक्त वाणीनें नीतीचे घुटके जर प्रेक्षकवर्गास दिले व नटाचें व्यक्तिविषयक वर्तनहि तो घेतो त्या भूमिकेस साजेसें आहे असें जर झालें तर समाजशिक्षणास साहाय्य मिळून आपलें उद्दिष्ट लवकर साध्य होईल." नट आणि शिक्षक यांच्या कार्यांतील साधर्म्य वर्णन करतांना प्रा. भानू म्हणाले, "नट हा अज्ञानाचा व अनीतीचा शिक्षक आहे. शिक्षक शिकवितो तर नट गातो. फलप्राप्ति एकच. दोघांचा उद्देश एकच व साध्यहि एकच. मार्ग मात्र निराळे. जुन्यांत जें समाज मर्यादेत आहे त्याचें संरक्षण करणें आणि समाज एकवट होऊन परोपकारी होईल अशा समजुती प्रचलित करणें हें काम शिक्षक म्हणून, कलाप्रवर्तक म्हणून आणि धंदेवाला म्हणून नटवर्गास करावयाचें आहे. या साध्याचें

साधन होईल असे त्याचे वर्तन व त्याचा अभिनय, त्याची सीनसिनेरी व त्याचे नाटकविषय असावे "

नाटयविषयासंबंधी ते म्हणाले, ' जेथें उत्तराला प्रत्युत्तर मिळणेचा संभव आहे, तेथें कवीच्या प्रतिभेस योग्य,आणि समाजाचे चित्र बरोबर रेखाटून समाजाची प्रगति सात्त्विक मानाने करण्याची प्रेरणा उत्पन्न करील असा कोणताहि विषय घेण्यास मोकळीक असावी असे मला वाटत

निबंधप्रपंच '

१. मराठी नाटकें व नाटकमंडळ्या – लेखक श्री बळवंत हरि पंडित

श्री पंडित यांनी या निबंधात मराठी नाटकाचा प्रारंभ, त्याची वाढ, सांप्रतची त्याची अवस्था व त्यात अवश्य असणाऱ्या सुधारणा यासंबंधी चर्चा केली आहे " कै अण्णासाहेब किर्लोस्कर यांनी संगीत रंगभूमीवर क्रांति घडवून आणली परंतु त्याच्या अनुकरणाने निघालेल्या संगीत मंडळ्यात गानकुशल नट नसल्याने नाटयकलेच्या परागतीस प्रारंभ झाला संगीत मंडळ्यांनी नाटयकलेच्या ' अभिनय ' या प्रधान अंगाकडे दुर्लक्ष केले व पैसा मिळविण्यासाठी आपला मोहरा पार्शी चालीकडे वळविला

नाटयकलेच्या दृष्टीने सुधारणा करण्याच्या उद्देशाने गद्य नाटक मंडळ्या निघाल्या गद्य नाटकाचे रहस्य कळल्याखेरीज त्यापासून संगीत नाटका-प्रमाणे मनोरंजन होत नसल्याने सुशिक्षित वर्गाशिवाय दुसऱ्या वर्गांतून या नाटकास प्रेक्षक मिळणें कठीण पडते

नाटक हे मनोरंजन व लोकशिक्षण असे दुहेरी कार्य करीत असते, परंतु सांप्रतच्या संगीत नाटकापासून हे काम योग्य प्रकारें होत नाही व गद्य नाटकेंहि या कार्यांकरिता इच्छित अशापेक्षा कमी योग्यतेची दिसतात यासाठी संगीत न गद्य या दोन तऱ्हेच्या नाटकात आलेली फारकत दूर करून या दोन्ही तऱ्हांचे एकीकरण केले पाहिजे हे एकीकरण म्हणजे गद्याचा भाग जास्त घालून पदें फक्त ५।२५ च व तीहि १।२ पात्राच्या तोंडी ठेवायची

हल्लीच्या नाटकाच्या प्रवर्तकांनी काही जुन्या व काही पाश्चात्य अशा

१ सारांश दिलेले सर्व निबंध ' रंगभूमि ' मासिकात ( वर्ष ४ अं २ ते ५ ) प्रसिद्ध झाले आहेत

स्थिति मागताना ते म्हणाले, 'इंग्लीच्या नाटकात गायनाचा बराच गुळ-मुळाट चालेला दिसतो, परंतु खरें शास्त्रीय व म्हणूनच आल्हाददायक संगीत बाळैच एवू यत नाही प्रथम, प्रमुख नट गायनाचा अभ्यास शास्त्रीय पद्धतीने करीत असत, त्यामुळें संगीत नाटकाची छाप जनावर विलक्षण बसली परन्तु पुढील पिढीने मात्र शास्त्रीय पद्धतीकडे दुर्लक्ष केलं, त्यामुळें पूर्वी होऊन गलेल्या प्रसिद्ध नटाप्रमाणे खरे कलानिधि नट आज रंगभूमीवर दृष्टीस पडत नाहीत जी गाष्ट गायनाची तीच वादनाचीहि आहे

नाटकात समयानुकूल व प्रसंगानुरूप अशी रागयोजना होण्यासाठी नाटक-कारांना गायनकलेचे ज्ञान असणे अवश्य आहे मराठी रंगभूमीवरील नाट्यीय दृष्ट्या सदोष असणाऱ्या पारशी व गुजराथी चालीवरील पदामुळेंहि संगीत नाटकें मर्मज्ञाना रेचव वाटू लागली यासाठी उतरत्या रागीताचे अनुकरण करताना आपल्या संगीतातील रंग कमी न होईल अशी खबरदारी घणे हैं प्रत्येक नाट्यकाराचें कर्तव्य आहे ' निबंधाच्या शवटी संगीतामुळें अभिनयाचा विपाड होतो हे मत आपल्याला मान्य नसल्याचे प पटुस्करानी सांगितले आहे

४ 'नाट्यकलेचें खरें महत्त्व व तिचे विपरीत परिणाम होण्याची कारणें' या विषयावर एका अनामिक [ 'क्ष' नामधारी ] गृहस्थानी निबंध वाचला

५ 'सुस्वर आणि त्याचें संरक्षण' हा निबंध डॉ भाजेकर यानी वाचला

## लेखी परीक्षा

या समेल्नात लेखी परीक्षसाठी 'सौभद्र' नाटकाची योजना करण्यात आली होती या नाटकावरील प्रश्न काढण्याचे काम डॉ गर्दे व श्री राम गणेश गडकरी यानी केले होते या परीक्षेतील श्री हुदलीकर, श्री रानडे व श्री कालगावकर या पहिल्या तीन क्रमांकाना अनुक्रमें रु १५ १० व ५ अशी बक्षिसे देण्यात आली

लेखी परीक्षबरोबरच या संमेल्नात नटाचे वतन नटाचे अभिनय आणि प्रयोगानुकूल वास्तुरचना' या विषयावरील भाषणाची स्पर्धाहि ठेवण्यात आली होती त्या परीक्षेतहि श्री हुदलीकर श्री कालगावकर व श्री रानडे याना अनुक्रमें रु १५, १० व ५ अशी बक्षिसे देण्यात आली

नाटयवर्ग प्रवर्तक ना म ने केवळ नाटक मडळयातील मुलामाठीच 'नाटकातील मुलाची कर्तव्यें' या विषयावरील निबधाची स्पर्धा ठेवली होती या परीक्षेत पुढील तिघा बालनटाना बक्षिस देण्यात आली—(१) वि र देशमुख (महाराष्ट्र ना म) रु १० (२) दत्तात्रय केशव पराजपे (नाटयकला प्रवर्तक स ना म) रु ५ व (३) रघुनाथ गोपाळ पत्ते (महाराष्ट्र ना म) रु ३

## दर्शा, ठाण

संमेलनात *श्री शकरराव मुजुमदार याचें 'नाटयप्रयमग्रहालय' या* विषयावर व्याख्यान झाले ते म्हणाले, "नाटयप्रयमग्रहालय ही सस्था गेल्या वर्षप्रतिपदेला स्थापन झाली असून तिचा कार्यक्रम सुव्यवस्थित चालण्या-साठी येथील विद्वानानी मदत करण्याचे कबूल केले आहे या सस्थेच्या चालकाचा विचार नुसती पुस्तकें किंवा लेख जमवून त्याचे सग्रहालय करण्या-बद्दलचा नसून न्यूयॉर्कमधील 'पीपल्स् इन्स्टिटयूट' प्रमाणे कार्य करण्याचा आहे"

डॉ कृष्णाजी वासुदेव खरे यानी 'ललितकलेत आम्ही कोठपर्यंत पुढे सरसावलो आहो' या विषयावर भाषण केले ते म्हणाले, "अभिनय हा नाटयकलेचा आत्मा आहे व याजकडे दुर्लक्ष कराल तर वरवरच्या नुसत्या भपक्या पोषाखात 'अभिनयात्मारहित' शुष्क काष्ठशरीर राहील"



अध्यक्ष वि दि पलुस्कर

# ७. मुंबई
## १९११

*गांधर्व महाविद्यालयाचे संस्थापक : पट्टीचे गवई व नाट्याभिमानी – महाराष्ट्रात संगीत यांनी लोकप्रिय केले.*

सातवे नाट्यसमेलन कोल्हापूर स म च्या वतीने मुबई येथील एल्फिन्स्टन नाटकगृहात दि २२ व २३ मे, १९११ या दिवशी भरले होते गाधर्व महाविद्यालयाचे प्रमुख प विष्णु दिगबर पलुस्कर हे या समेलनाचे अध्यक्ष होते

मराठी नाट्यसमेलनाची सुरवात झाल्यापासून अध्यक्षानी व वृत्तपत्रीय टीकाकारानी गाजविलेले हे पहिलेच समलन अध्यक्षाच्या निवडीपासून तो समेलनाच्या एकदर स्वरूपापर्यंत अनेक घटनावर टीकाकारानी अत्यत कडक भाषेत टीका केली समेलनाचा एकदर वृत्तात पाहिल्यावर मग एकदर टीकेचा परामर्श घेऊ

या संमेलनाचे एक वैशिष्ट्य म्हणजे समेलनाला प्रवेशमूल्य ठेवण्यात आले होते समेलनाचा खच भागण्यासाठी साहाय्य मिळावे हा यामागील हेतू होता शिवाय ३०० प्रवेशपत्रिका सन्माननीय निमत्रिताना देण्यात आल्या होत्या

समेलनाला पुढील नाटक मडळयानी आपले प्रतिनिधि पाठविले होते—

(१) कोल्हापूरकर स ना म
(२) पाटणकर स ना म ( प्रतिनिधि —श्री माधवराव पाटणकर)
(३) किर्लोस्कर स ना म ( „ —श्री शकरराव मुजुमदार )
(४) [illegible]

या मराठी संस्थाशिवाय शेक्सपिअर नाटक कंपनी आणि गुजराथी, उर्दू व पारशी नाटक मंडळ्यांचे प्रतिनिधिहि उपस्थित होते

चिटणीस श्री वरवे यांनी संदेश-वाचन केल्यानंतर मागील संमेलनापासून एक वर्षांत घडून आलेल्या नाट्यविषयक घडामोडीचा परामर्श घेतला विशेष म्हणजे रंगभूमीवर स्त्रियांची कामें स्त्रियांनीच करावी असा, त्या काळच्या समाजात खळबळ उडून देणारा विचार मांडण्याचे त्यांनी धारिष्ट केले[1]

## अध्यक्षीय भाषण

संमेलनाचे अध्यक्ष प. पलुस्कर यांचे भाषण अनेक कारणांनी गाजले त्यापैकी एक कारण म्हणजे प पलुस्करांना मराठी उत्तम येत असूनहि मराठी नाट्यसंमेलनाचे अध्यक्षीय भाषण त्यांनी हिंदी भाषेतून केले हे होय यावद्दल अध्यक्षांनी पूर्वी परवानगी मागितली होती असा खुलासा पुढे चिटणीसांनी केला

अध्यक्षांनी आपल्या भाषणाच्या सुरवातीला 'संगीत' किंवा गायनविद्या ही नाट्यकलेचाच एक भाग आहे, असे सांगून नाट्यसंमेलनाची आवश्यकता प्रतिपादन केली ते म्हणाले, "आजकाल कालेकरून नाट्यकलेंत दोष उत्पन्न झाले असल्यामुळे ते सुधारण्यासाठी, निदान नाट्यसुधारणेची स्पष्ट व निर्भीड चर्चा करून त्या व्यवसायात असलेल्यांना योग्य दिशा दाखविण्यासाठी हें नाट्यसंमेलन आहे, असं मी तरी निदान समजतो सध्याच्या नाट्यकलेत प्रमुख दोष म्हणजे पद्धतीला व शास्त्राला सोडून नाट्यप्रयोग करणे व कोणतीहि हुकमत नसणे हे होय ( यासंबंधी अध्यक्षांनी आण्णासाहेब किर्लोस्करांचा आपल्या नाटक मंडळीवर कसा सक्त अंमल असे याच्या आठवणी सांगितल्या ) संमेलनासंबंधी नाटक मंडळ्यांच्या मनांत जे गैरसमज विनाकारण उत्पन्न

---

१ 'याला अनुलक्षुन रंगभूमि'कारांनी पुढील टीका केली " वस्तुतः या दृष्टीनें स्त्रियांची कामें स्त्रियांनीं करणें अशक्य आहे कदाचित् एखादी तशी निष्णात सांपडू शकेल, स्त्रियांची कामें स्त्रिया करू लागल्यानें नाटकधंद्याला उर्जितावस्था तर कधीं यावयाची नाहींच, परंतु हल्ली जी त्याला स्थिति प्राप्त झाली तिच्यापेक्षाहि हीन स्थितीस तो धंदा जाईल बरवे यांच्या डोक्यांत ज्या काहीं विलक्षण ( Quixotic ) कल्पना घोळत असतात त्यापैकीं ही एक फार दिवसांची आहे ती सुदैवानें समर्थनीय नाहीं म्हणून तिच्याबद्दल अधिक विचार करण्याचेंहि कारण नाहीं " ( रंगभूमि– वर्ष–५ अंक २ ते ८ )

झाले आहेत ते त्यानी समेलनात प्रत्यक्ष हजर राहून व प्रत्यक्ष या कार्यामध्ये मन पूर्वक अंग ठेवूनच नाहींसे होणार आहेत

नाटयकला सध्या गद्य नाटकाचे एक व सशास्त्र संगीत विद्येच्या प्रसाराचे एव अशा कैचीच्या दोन पात्यामध्यें सापडली आहे. गद्य नाटकाचे पाते एके वेळी शाहूनगरवासीसारख्या ना. म नें व आजकाल तिच्याच तोडीच्या महाराष्ट्र वगैरे नाटक मडळ्यानीं सतेज राखल्यामुळें गद्य नाटकाविषयी लोकाची अभिरुचि वाढून संगीताविषयी ती तितक्या पटीने कमी होत आहे. वास्तविक कै. अण्णासाहेबानी नाटकाला संगीत स्वरूप दिलेहे त्या कलेच्या उन्नतीचे खरें खरें एक नवे साधनच झाले, परतु संगीत हे उलटें पदोपदी रसभग करिते, त्यापेक्षा गद्य नाटके पाहणे बरें, असा विद्वान लोकाचा अभिप्राय होऊं लागला आहे संगीताचा कटाळा उत्पन्न व्हावयाला आणि रसपरिपोषाच्या ऐवजी केव्हा केव्हा तर रसभगहि करावयाला कवि व नट या दोघाच्याहि अगचे अज्ञान अथवा बेपर्वाई हीच कारणें असलेली दृष्टोत्पत्तीस घेतात (या ठिकाणी अध्यक्षानी नानासाहेब जोगळेकर याच्या ' धि कार मन साहिना ' व केशवराव भोसले याच्या ' मूर्तिमत भीति उभी ' या पदाची उदाहरणे, प्रात्यक्षिकासह दिली.)

भाषणें व निबंधवाचन

या संमेलनांत भाऊशास्त्री लेले, रा. ग. प्रधान व रा. सा. ओक यांचें निबंध-वाचन झालें. भाऊशास्त्र्यांच्या भाषणाचा विषय किंवा वृत्तान्त उपलब्ध झाला नाहीं. श्री. प्रधान यांच्या भाषणाचा विषय 'नाट्यकला व राष्ट्रोन्नति' असा होता. रा. सा. ओक यांचा 'नाटकपात्रांची भाषा' या विषयावरील निबंध वाचून दाखविण्यात आला. या निबंधावर तत्कालीन वृत्तपत्रात मतभेद व्यक्त करण्यांत आल्याचें वृत्त 'रंगभूमीच्या संमेलनअहवालांत आहे.' सौ. काशीबाई हेर्लेकर यांचें नाट्यप्रयोगांतील उणीवा दर्शविणारें आणि अपेक्षा व्यक्त करणारे एक पत्रहि वाचून दाखविण्यांत आले.

'रंगभूमि' मासिकात प्रसिद्ध झालेले आहेत.[२] संमेलनाचे अध्यक्ष हे पूर्वीच्या खापर्डे, केळकर, भानू प्रभृति अध्यक्षांप्रमाणे सर्वमान्य व विद्वान असे गृहस्थ नव्हते, हा एक आक्षेप होता. त्याला उत्तर म्हणून 'संदेश' वृत्तपत्रात पुढील खुलासा करण्यात आला होता, "श्री. पलुस्कर यांची अध्यक्षपदासाठी झालेली योजना संमेलनापूर्वी सुमारें महिनाभर प्रसिद्ध करण्यात येऊन ती सर्वांकडे कळविण्यातहि आली होती. तथापि (किर्लोस्कर म. खेरीज) त्याचा स्पष्ट निषेध कोणाकडूनहि आला नाही. उलट नाटकमंडळ्या, आणि माजी अध्यक्ष प्रा. भानू व निमंत्रक नाटक म. यांना ही योजना मान्य होती."

अध्यक्षांनी श्री. जोगळेकर व श्री. केशवराव भोसले यांच्यावर केलेली गायनटीका व तिचे प्रात्यक्षिक ही मात्र संमेलनाच्या अध्यक्षपदाला न शोभणारी होती असे दिसते. 'रंगभूमि' मासिकात इंदुप्रकाश, ज्ञानप्रकाश, सयाजीविजय, इ. वृत्तपत्रांतील जे अभिप्राय उद्धृत करण्यात आले आहेत[३] त्यावरून अध्यक्षांचे प्रतिपादन अनुचित तर होतेंच. परंतु ते खरेंहि नसावे असे वाटते. प. पलुस्करांच्या भाषणात निर्भीडपणा असला तरी दोषाविष्करणाची त्यांची पद्धति वरच्या पातळीवरील असती तर त्या संबधीं एवढा प्रक्षोभ उत्पन्न झाला नसता. संमेलनातील घटनाविषयी जें कलुषित वातावरण निर्माण झाले त्यासंबधी 'ज्ञानप्रकाश' ने लिहिले की, "यंदाच्या संमेलनामध्यें कित्येक गुणी माणसांच्या मनामध्यें तेढ उत्पन्न झाली ही खेदास्पद गोष्ट होय. ही तेढ काढून टाकण्याऐवजी कित्येक लेखक एकपक्षीय लेख लिहून ती वाढवीत आहेत ही त्याहूनहि शोचनीय गोष्ट आहे."

अध्यक्षांच्या उद्‌गाराचे पडसाद प्रत्यक्ष संमेलनातहि उमटले. त्यासंबधी पुढील उल्लेख आढळतो, "अध्यक्षांचे भाषण संपताच त्यास आत बोलावून त्याच्यावर तोंडसरं झाडण्यात आला ... संमेलनाच्या वेळी झालेल्या बेकायदेशीर व असमाधानकारक प्रकाराबद्दल मुद्दाम, सभासदांची सभा पुण्यात दोन वेळा (किर्लोस्कर. स. म. च्या विनंतिवरून) भरवावी लागली. अध्यक्षांचें भाषण व वर्तन यासंबधी या सभेत ऊहापोह झाला[१]."

(खाजगी बैठकीत संमेलनविषयक काय कामकाज झाले त्याचा वृत्तांत मिळू शकला नाही.)

२-३. कित्ता


अध्यक्ष : मो. वि. जोशी

# ८. उमरावती

## १९१२

*उमरावतीचे अग्रगण्य वकील : हिंदी राजकारणांतील प्रागतिक पक्षाचे अध्वर्यु.*

हें संमेलन विदर्भांत उमरावती येथें इ. स. १९१२ मध्यें ईस्टरच्या सुटीत भरविण्यात आलें. संमेलनाचें निमंत्रण श्रीमहालक्ष्मीप्रासादिक सं. ना. मं. नें दिलेलें होतें व संमेलनाच्या अध्यक्षस्थानी विदर्भातील विद्वान वकील सर मोरो विश्वनाथ ऊर्फ अण्णासाहेब जोशी यांची नियुक्ति झाली होती.

संमेलनाचें स्थान पश्चिम महाराष्ट्रातील नाटक मंडळयांच्या दृष्टीनें जरा दूरचें असल्यानें संमेलनास फक्त पुढील तीन नाटक मंडळ्या उपस्थित होत्या. —(१) पाटणकर सं. ना. मं., (२) कोल्हापूरकर सं. ना. मं. व (३) नाट्यकला प्रवर्तक स. ना. म. चे प्रतिनिधि म्हणून श्री. आपटे. विविध प्रांतात संमेलन भरविल्याने सर्व मराठी जनतेचें लक्ष संमेलनाकडे वेधेल या हेतूने हे अधिवेशन विदर्भांत भरविण्याचें ठरलें असा खुलासा चिटणीसांच्या भाषणात आढळतो

## अध्यक्षीय भाषण

" प्रत्येक प्रगतिपर देशात गद्य ग्रंथकार, कवि, वक्ते असणें जसें इष्ट आहे, तसेंच नाटकें व नट निपजणें हेंहि इष्ट आहे. मनोरंजन व समाजशिक्षण हे नाट्यकलेचे मुख्य दोन हेतु ज्या मानानें साध्य होतील, त्या मानानें नाट्यकलेची अभिवृद्धि आहे असें समजलें जाईल. " हें कार्य हल्लीच्या नाटक मंडळ्याकडून यथाशक्ति पार पाडलें जात आहे, तथापि नाट्य-

कलेची अधिक उन्नति होण्यासाठी सघशक्तीतून निर्माण झालेल्या एका सत्तेची आवश्यकता असल्याचे अध्यक्षानी प्रतिपादन केले "नाटके कोणती करावीत, नाटकात अश्लील प्रकार येऊ नयेत आणि नट व नाटयकला याचे-सबधी एकदर ध्येये उच्च दर्जाची असावीत, या सर्व गोष्टी अमलात येण्यास अशा एका सत्तेची फार जरूरी आहे उच्च ध्येये कायम बाळगण्यासाठी नाटक मडळीतील माणसे व्यक्तिश उत्तम शीलाची पाहिजेत नाटकी शब्दाचा ३०।४० वर्षापूर्वी जो अर्थ असे तितक्या अर्थाचा वाचक तो शब्द हल्ली नाही, याचे कारण नाटक मडळीतील माणसे दिवसेदिवस जास्ती सुव्यवस्थित राहात आहेत, व ती जास्त शीलाची आहेत स्त्रियाची कामे करण्यासाठी स्त्रियाच असणे फार इष्ट आहे असे प्रेक्षक या नात्याने मला पुष्कळ वेळा वाटले आहे, व जरी या देशात वेश्याखेरीज इतर स्त्रियानी नाटकात जाणे सभवत नाही, तरीपण कालातराने चागल्या सभावित शिकलेल्या बायकाहि नाटकात जातील अशी मला पूर्ण उमेद आहे "

भाषणाच्या शेवटी अध्यक्षानी, नाटक मडळ्या व प्रेक्षक या दोघानीहि आपली अभिरुचि उच्च राखण्याचा प्रयत्न केला पाहिजे असे सागून आपले भाषण सपविले

नियमवाचन

प्रगल्भतेचें माप घेण्याचें नाटक हें एक साधन आहे; म्हणून त्याची जोपासना झाली पाहिजे

२ नाट्यपात्रें आणि त्यांचे अभिनय —लेखिका सौ मथुराबाई द्रविड

समाजसुधारणेंचें एक महत्वाचे अंग म्हणून नाट्यकलेचे स्थान विशद केल्यानंतर रंगभूमीवरील पुरुषवेषधारी आणि स्त्रीवेषधारी नटांच्या पायाखालील, हालचालीत, अभिनयांत ज्या उणीवा आढळून येतात त्यांचे सौ द्रविड यांनी अनेक उदाहरणें देऊन वर्णन केलें स्त्रियांच्या भूमिका पुरुषच करीत असल्यानें त्यांचे टोप परिधान करणें, छातीचा बराचसा भाग उघडा दिसेल अशा चोळ्या वापरणें, अप्रमाणशीर वस्त्रपरिधान करणें इ गोष्टी स्त्रियांच्या दृष्टिकोनातून पाहिल्या असता किती कलाहीन दिसतात यांचे सौ द्रविड यांनी तपशीलवार विवेचन केलें काही नटांच्या अभिनयाच्या पद्धतीविषयी त्या लिहितात, ' ही (स्त्रीवेषधारी) पात्रें स्त्रीस्वभावाची व स्त्रियांच्या स्वाभाविक विनयाचा पायमल्ली करीत आहेत असं वाटून मनास खेद होतो ' रंगभूमिव्यतिरिक्त इतर वेळी नटांनी नाटकी पद्धतीनें वागण्याचे सोडून द्यावे

बिरकोळ एकूण सुमारे १२०० रु

प्रत्येक नाटक मडळींत १०।५ मुल तरी असतातच हल्ली नृत्याचा भाग वाढू लागल्यानं ही सख्या १५।२० पर्यंत काही ठिकाणी आहे सब नाटक मडळ्या मिळून सुमारे ४।५ शें मुल या धद्यात आहेत

लेखी परीक्षा

(१) आमच्यातील सुशिक्षित समाजाचं 'नाट्यकलेविषयी व नाटक मडळ्याविषयी कर्तव्य कोणते ? व ता समाज ते कर्तव्य कितपत पाळीत आहे ?' या विषयावरील दोन निबधाना अनुक्रमें रु ९ व रु ६ अशी बक्षिसे देण्यात आली

नाट्यसस्थांच्या स्पर्धा

(१) किर्लोस्कर ना म दिलेल्या नाटकधद्यापासून त्यातील लोकास काय फायदे करून घेता यतील' या विषयावरील श्री देवस्थळी व श्री 'दत्तात्रय' याच्या निबधाना अनुक्रमें रु १२ व रु ८ अशी बक्षिसे देण्यात आली

(२) महाराष्ट्र, कोल्हापूरकर व स्वदेशहितचितक या नाटक मडळ्यानीं 'वीर, करुण व हास्य यापैकी एका रसाचे सशास्त्र विवेचन व साभिनय प्रात्यक्षिक' या विषयावर नटवर्गासाठी स्पर्धा योजिली होती

चर्चा

या समेलनात श्रीमत ग श्री ऊर्फ दादासाहेब खापर्डे व श्री सी भा जोशी याची भाषणें झाली

सयुक्त प्रयोगाची गगोत्री

पाटणकर श्रीमहालक्ष्मीप्रासादिक व कोल्हापूरकर या नाटक मडळ्यातील प्रमुख नटानी मिळून मृच्छकटिक' नाटकाचा सयुक्त प्रयोग करून दाख विला त्यात शकाराची भूमिका प्रसिद्ध नट श्री शिवरामपत जोशी यानी केली

श्री भाडे याच्या नकलाचा कार्यक्रमहि झाला



अध्यक्ष : के. रा. छापखाने

# ९. पुणें
## १९१३

*सांगलींतील प्रसिद्ध वकील: मराठी रंगभूमि व नाट्यक्षेत्रांतील एक रसिक. मोहनतारा (नाटक), स्वाध्याय, ज्ञानेश्वरी वगैरेंचे लेखक.*

नाट्य संमेलनाचें नववें अधिवेशन पुणे येथील किर्लोस्कर नाटकगृहात चित्ताकर्षक नाटक मंडळीच्या विद्यमाने दि. १९, व २० मे १९१३ या दिवशी साजरें झालें. श्री. केशव रामचंद्र छापखाने हे अध्यक्ष होते.

संमेलनाला पुढील नाटक मंडळया उपस्थित होत्या.—(१) चित्ताकर्षक ना. मं. (२) किर्लोस्कर सं. ना. मं. (३) भारत ना. मं., (४) नाट्यकला प्रवर्तक सं. ना. म. व (५) सोशल क्लब (पुणें). राजापूरकर व पाटणकर यांचे प्रतिनिधि संमेलनाला उपस्थित होते.

पुढील नाट्यसंस्थांनी पत्रद्वारा सहानुभूति व्यक्त केली होती (१) माणिकप्रभू सं. ना. म (२) नूतन सं. ना. म., (३) भारतेंदु ना. मं., (४) कोल्हापूरकर ना. म., (५) महाराष्ट्र ना. मं., (६) ललितकलादर्श स ना. म, (७) ग्वाल्हेरकर स. ना. मं., (८) लक्ष्मीव्यंकटेश प्रासादिक बेळगावकर स्त्री. स. ना. म. व (९) आर्यानंदोद्भव पुणेकर ना. मं.

नाशिकचे वकील श्री. रा. ग. प्रधान व प्रा. गो. गो. टिपणीस यांनी सविस्तर पत्रें पाठवून आपले मनोगत व्यक्त केलें होते. प्रा. टिपणीस यांनी आपल्या पत्रात डे. ए. सोसायटीप्रमाणें नाट्यविषयासाठी एक स्वतंत्र सोसायटी स्थापन व्हावी अशी इच्छा व्यक्त केली होती. त्या संस्थेच्या आश्रयानें एक संगीत व एक गद्य अशा दोन नाट्यसंस्था चालवाव्यात, विद्वानांनी मान्य

वगैरेच नाटक या संस्थानी करावीत, न केल्यास त्याच्यावर बहिष्कार घालावा इ सूचना प्रा टिपणीस यांनी केल्या होत्या

चित्ताकर्षक मडळीतर्फे स्वागत करताना श्री रामभाऊ गोसले म्हणाले "भारत नाटय समाज व नाटक मडळ्या याच्यात पोष आणि अवयव याच्या सबधाप्रमाणे निकट सबध आहे एकीकडून समाजातील विद्वान व रसिकाची मार्मिक दृष्टि व दुसरीकडून सरकारची चौकस दृष्टि अशा दृष्टीच्या प्रकाशात नाटक मडळ्याना आपले कार्य साम्प्रत करावे लागत आहे

अध्यक्षाच्या निवडीबद्दल रीतसर सूचना—अनुमोदन होऊन अध्यक्ष श्री छापखान स्थानापन्न झाल्यानतर समेलनाचे चिटणीस श्री वरवे यानी नाटयसमेलनाच्या तापर्यंतच्या कार्याचे निवेदन वाचून दाखविले त्यातील ठळक गोष्टी — (१) 'नाटयविषयक सुनिश्चित चर्चा' या पुस्तकाचे प्रकाशन, (२) नाटयवस्तुसग्रहालयाचा उपक्रम, (३) नाटयविषयक लेखी परीक्षा व साभिनय परीक्षा (४) नाटयव्यावसायिकाना मदत करण्याची योजना, (५) नाटक व प्रयोग याना परवानगी मिळण्याबाबत ज्या अडचणी येतात त्यासबधी सरकारबरोबर पत्रव्यवहार

नवीन नाटके पसत करून घेण्यासाठी सेन्सारशिप मारखी व्यवस्था करणे व नाटयकलाविषयक वर्तमानपत्र चालू करणे ह्या सूचना केल्यानतर चिटणिसानी राजापूरकर ना म चे नाटयकवि श्री शकरराव वळावकर याच्या निधनाबद्दल दुखवटा व्यक्त केला

## अध्यक्षीय भाषण

याचा मृत्यु, प्रमसंन्यास, इ नाटकाचा अपवाद आहे ) वीरतनय, शारदा ही नाटके ओढून ताणून आनंदपर्यवसायी करण्यात आली आहेत केवळ जुन्या नाट्यशास्त्रनियमाच्या आडकाठीमुळें हे होत असेल तर इतर बाबींत आग्ल पद्धतीचे अनुकरण केल्यावर या बाबतीत ते का करू नये ?

(२) नाट्यशास्त्र — लेखक श्री ना के बेहेरे

या निबंधात श्री बेहेरे यानी साराशरूपाने पौर्वात्य व पाश्चात्य नाट्यशास्त्र व नाट्यवाङ्मय याचा इतिहास कथन केला

(३) इग्रजी पद्धतीवर बसविलेलें सगीताचें नोटेशन —

लेखक श्री खडकर

या निबंधात आपले सगीत जगाला समजावे यासाठी ते इग्रजी नोटेशन पद्धतीने करणे इष्ट आहे असा विचार माडला होता

(४) नट व नाट्य — लेखक श्री ब हृ पंडित

नाटकाचे हृद्गत व्यक्त होण्यासाठी नटाला कोणत्या गुणाची आवश्यकता असते याचे वर्णन या निबंधात आहे 'नटास चागले स्वरूप, चागला आवाज भूमिका समजण्याजोगी बुद्धि प्रसगावधान सृष्टिनिरीक्षणाची सवय चेहेऱ्याचे स्नायु हलवून निरनिराळे मनोविकार दाखविण्याचे सामर्थ्य, स्वीकृत भूमिकेशी तादात्म्य होऊन जाण्याची शक्ति नीतिमत्ता इ गुणाची अपेक्षा असते ' असे लेखकाचे मत आहे

(५) 'सामाजिक नाटकांचा नैतिकदृष्ट्या परिणाम' —

लेखक श्री दंडवते

नाटकाचा चागुलपणा किंवा वाईटपणा हा नाटकात प्रतिपादन केलेल्या मताचा लोक कशा रीतीने उपयोग करून घेतात यावरून ठरवावयाचा असतो सामाजिक नाटक लिहिण्याचे काम फार जबाबदारीचे आहे त्यासाठी समाजात चाललेल्या सव गोष्टीचे पूर्ण ज्ञान हवे समाजाचे मन न दुखविणारी पण सामाजिक सुधारणेच्या कामी उपयोगी ठरणारी नव्या सुधारणाचा पुरस्कार करणारी परतु जुन्याची हेटाळणी न करणारी अशी नाटके हवी असल्याचे श्री दंडवते याचे मत आहे

(६) जुनीं व नवीं नाटकें — लेखक डॉ वि गो चिपळूणकर

पूर्वी नट आणि नाटकमंडळ्या याच्याकडे लोक तुच्छतेने पाहात असत

परन्तु आता ही प्रवृत्ति बदलली असून नटाना मानान वागविले जात आहे या स्थित्यतराचा निर्देश करून डॉ चिपळूणकर यानी मराठी नाट्यकलेचा थाडक्यात आढावा घेतला परतु सध्याच्या नाटकमडळयाच्या दर्जाविषयी ते म्हणाल, ' जुनी मराठी नाटके चागली हाती, पण अलीकडची नाटक भिकार आहेत त्यात फाजील व पाचकळ शृगार असतो " नाटकात काम करणाऱ्या मुलाची स्थिति फार शोचनीय असते असे डॉक्टरानी शेवटी नमूद केल होत

(७) नाट्यरचना —लेखक हरि नारायण आपटे

" नाट्यकलेत कवि, नट, चित्रकार या तिघाच कौशल्य एकवटलेले असते या त्रयीचे समेलन जर चागल वठल नाही तर त नाटकच नव्हे नाटक हे कोणत्याहि स्वरूपाचे असले तरी त्यापासून आनदच हाता हरिश्चद्राचे दुःख पाहून डोळ्यावाटे जरी अश्रू वाहत असतात तरी आतून एक प्रकारचा आनदच होतो नाटकाचा विषय कोणता असावा याविषयी निर्बंध घालणें शक्य नाहीं ही एक उपकल्पा आहे व सर्वस्वी कवीच्या चातुर्यावर अवलबून राहील सविधानकात काळाची, स्थळाची व कृतीची, एकात्मता असण हेंहि आवश्यक आहे"

(८) सामाजिक सुधारणा व नाटकें याचा सबध— लेखक प्रा गोविंद चिमणाजी भाटे

सामाजिक नाटकातील मतप्रतिपादन हें वादग्रस्त असले तरी तें इष्ट परिणामदायी होण्याचाच सभव आहे हे सागताना प्रा भाट यानी पुढील मत माडले माझ्या मते सद्बुद्धीनें सदुद्देशानें व शुद्ध अत करणानें लिहिलेलीं नाटकें, मग ती सामाजिक सुधारणस अनुकूल असोत वा प्रतिकूल असोत, इष्टच आहेत

## लेखी परीक्षा

या समेलनात परीक्षेसाठी 'हॅम्लेट' नाटक नेमले होते. आणि नाटककार श्री गोविंद बल्लाळ देवल यानी नाटक मडळी एकाच्या मालकीची असावी की मागीची असावी आणि ती फिरती असावी किंवा बैठी असावी' या विषयावर एक प्रश्नपत्रिका काढली होती

या दोन्ही परीक्षाचे निकाल प्रसिद्ध झालेले नाहीत

## करमणूक

मनोरजनाच्या कार्यक्रमात चित्ताकर्षक नाट्य मडळीने 'तोतयाचे बड' या नाटकाचा प्रयोग करून दाखविला या मडळीला भारत नाट्य समाजातर्फे अध्यक्षाच्या हस्ते एक सुवर्णपदक अर्पण करण्यात आले

समारोपाच्या भाषणात अध्यक्ष म्हणाले, "नटाचा धदा हलक्या प्रतीच्या लोकाकडे होता आणि तो ब्राह्मणवर्गाने करू नये असा एक पक्ष आपल्यापुढे माडण्यात आला कुशीलवाचा धदा सरदारी पेशाइतका किंवा अधिकाऱ्याच्या धद्याइतका उच्च नाही हें खरें पण म्हणून त्यात पडू नये असे म्हणणे हे साप्रतच्या इग्रजी मनूत तरी चालणार नाही परिस्थितीला अनुरूप अशी योजना होणे आवश्यक आहे नाटकधद्यातील लोकाची व प्रत्यक्ष धद्याची सुधारणा कशी करता येईल याचा विचार करणे हे नाट्य समेलनाचे कर्तव्य आहे सामाजिक नाटकें लिहिणे असेल तर ती रसपूर्ण असावी व लोकाना पसत पडावी, ही जबाबदारी ओळखूनच नाटककाराला नाटक लिहावे लागेल ..कोणता कवि चिरायु होण्यास पात्र, हे इतिहास ठरविणार आहे"



अध्यक्ष शि म परांजपे

## १०. पुणें

१९१४

*'काळ' कर्ते : लोकमान्यांचे प्रमुख अनुयायी : लेखन नि भाषणे यांनी मराठी जनतेंत जागृति केली : पहिला पांडव हें यांचें नाटक.*

हें संमेलन पुणें येथील आर्यभूषण नाटकगृहात सोशल क्लबच्या वतीने दि २१ व २२ मे या दिवशी भरविण्यात आले श्री शिवराम महादेव परांजपे यांनी अध्यक्षपद स्वीकारले होते

प्रत्यक्ष वा प्रतिनिधिरूपात उपस्थित नाटक मंडळ्या— (१) किर्लोस्कर स ना म, (२) वमईकर स ना म, (३) श्री साईनाथ प्रासादिक स ना म, (४) रॉयल ॲमेच्यूर क्लब, मुंबई, (५) डेक्कन सोशल क्लब, (६) गंधर्व ना म, (७) भारत ना म व (८) नाटयकला प्रवर्तक स ना म

पुढील नाटक मंडळ्यांनी पत्रद्वारा शुभेच्छा व्यक्त केली होती (१) नूतन आर्य कोल्हापूरकर स म, (२) लक्ष्मीवेंकटेश प्रा स्त्री स म, (३) पाटणकर स ना म, (४) महाराष्ट्र ना म, (५) माणिकप्रभू स ना म,

नाट्यवस्तुसग्रह व ग्रथ-सग्रह् याची वाढ होत आहे" आपल्या भाषणात श्री. वरवे यानी मागील वर्षांत दिवगत झालेल्या नाट्यसेवकाना श्रद्धाजलि अर्पण केली

(१) सदाशिवराव भावे

(२) मुबईच्या पारशी नाटक मडळीचे मालक व प्रख्यात नट श्री बालीवाला यानी आपली कपनी विलायतेला नेऊन तेथें नाव मिळवले होते हरिश्चद्र हे त्याचे नाटक मराठी व गुजराथी अशा दोन्ही भाषात लोकप्रिय झाले होत

(३) राजापूरकर नाटक मडळीचे व्यवहारदक्ष व कर्तृत्ववान मालक श्री वावाजीराव राणे नाट्यसमलनाच्या मूळ कल्पनेला मर्त स्वरूप देण्यात वावाजीरावानी मोठा हातभार लावला होता

(४) खडेराव भिकाजी बेलसरे— शेक्सपीअरच्या नाट्यकृति मराठी भार्षेत आणण्याची मोठी कामगिरी श्री बेलसरे यानी अत्यत परिश्रमाने पार पाडली त्यावद्दल त्यानी माजी गव्हर्नराकडूनहि प्रशसा मिळविली होती

(५) सुमेरसिंगाची प्रसिद्ध भूमिका करणारे श्री गोपाळराव दाते.

या श्रद्धाजलिबरोबरच श्री वरवे यानी नाट्यसेवकाचा सन्मान करणाऱ्या दोन गुणज्ञ सस्थानिकाना आदराजलि वाहून त्याच्याबद्दलचा आदर व्यक्त केला वडोद्याचे अधिपति श्री सयाजीराव गायकवाड यानी गधर्व नाटक मडळीला वर्षासन मजूर केले आणि इचलकरजीचे अधिपति श्री वावासाहेब घोरपडे यानी नटसम्राट श्री गणपतराव जोशी याना परितोषिक देऊन त्याच्या नाट्यगुणाचा उचित गौरव केला

या गुणग्राहकतेबद्दल उभय सस्थानिकाचे आभार मानण्यात आले

## अध्यक्षीय भाषण

अध्यक्ष श्री शिवरामपत पराजपे यानी आपल्या भाषणात भरतमुनिप्रणीत नाट्यकलेचा इतिहास सागून त्याचे प्रस्तुतच्या स्थितीतहि पूर्णरूपाने साम्य कस आहे याचे विवेचन केले हल्ली नाटकापासून द्वैत उत्पन्न होत किंवा नाटकमडळधास पैशाची जशी अडचण पडते तशी नाटकाची उत्पत्ति झाली त्या वेळी पडली होती, ती भागविण्यासाठी कुवेर सावकार कसा उभा राहिला याची माहिती अध्यक्षानी आपल्या विशिष्ट शैलीने रगवून सागितली

कालिदास, भवभूति यांच्या नाटकांची थोरवी सांगून 'नटकर्म चांगले वागला तर त्याची योग्यता समाजात केवढी वाढेल' याचेहि दिग्दर्शन केले नट, नाटक मंडळ्या व नाटककार हे राष्ट्राचे घटक आहेत, या नात्याने त्यांची योग्यता व कर्तव्यें किती उच्च प्रकारची आहेत याचे विवेचन केल्यानंतर अध्यक्षांनी नाटक मंडळ्यांत अलीकडे सुरू झालेल्या फाटाफुटीच्या प्रकाराबद्दल आपले विचार सांगितले ते म्हणाले, ' अशा घडामोडी टाळता यणें दुरापास्त असल्यास ही अनेकता वृक्षाच्या वाढीप्रमाणें स्वाभाविक असून अशाहि स्थितीत परस्परांशी एकात्म्याने वागले पाहिजे आणि ' पोट आणि अवयव ' या गोष्टी प्रमाणें भरत नाट्यसमाजाला सर्वच ठेवले पाहिजे परमेश्वराच्याच मनातून आपल्या राष्ट्राला वरच्या दर्जाला न्यावयाचे आहे व त्यासाठी तो आपल्याला सध्या अनेक यत्नांमध्ये प्रवृत्त करतो आहे हे ध्यानात ठेवून आपण प्रत्यक्ष कार्यांत त्याची ही इच्छा पूर्ण होण्यासाठी उच्चाभिलाषा धरून आपापल्या कर्तव्यात तत्पर असले पाहिजे

## नाट्यगुण परीक्षा

या संमेलनात लेखी परीक्षा न ठेवता उमेदवार नटांची नाट्याभिनयाची परीक्षा ठेवण्यात आली होती नटाने दुसऱ्या पात्राची सहमा अपेक्षा न ठेवता एका भूमिकेचे सुमारें अर्धा तास सवेष प्रात्यक्षिक दाखवावे अशी ही योजना होती त्याप्रमाणें सोनार वल्लभधील कलावंताना ' देवयानी ' नाटक व ' कपिलाषष्ठी ' हा विनोदी चुटका करून दाखवला श्री रा के वाळेकर यांनी नपथ्यपाठ ' या करमणूक पत्रातील प्रसंगाचे प्रात्यक्षिक दाखविले या सर्वांना प्रशंसापत्रक देण्यात आली श्री ग कृ बोडस यानाहि एक प्रशंसा पत्र देण्यात आले

## चर्चा

संमेलनात झालेल्या भाषणाचा सारांश पुढीलप्रमाणें —

माजी अध्यक्ष श्री छापखाने यांनी भारत नाट्य समाजावर वृक्षाचे रूपक करून तो आता ललितकलाच्या स्वरूपात कसा प्रफुल्लित होत आहे व उत्तरोत्तर फलद्रूप होण्याचीहि अवस्था कशी दाखवीत आहे याचे वनस्पती शास्त्राच्या आधाराने वर्णन केले

श्री शंकरराव मुजुमदार यांनी नाटक मंडळ्यांच्या सध्याच्या रचनेत एकट्याची मालकी, भागीदारी, नियामक बोर्डानुसारी, हिस्सेवारी अशा ज्या अनेक पद्धति आहेत त्यांची माहिती देऊन सर्वांत जुनी आणेवारीची पद्धत व तीत त्यातल्याच एखाद्या व्यवहारदक्ष प्रमुख व्यक्तीच्या तंत्राने चालण्याची शिस्त ही रचनापद्धत जास्त उपयोगी असल्याचे आपले मत सांगितले. नाटक-मंडळ्यांतील फाटाफुटी या स्वाभाविक असल्या तरी मूळ कायम राखूनच शाखा विस्तार करण्याची त्यात प्रवृत्ति न दिसली तर त्या श्रेयस्कर ठरणार नाहीत असा स्वतःचा अभिप्राय सांगितला.

श्री गो. गो. टिपणीस यांनीहि याच विषयावर भाषण करून असले प्रकार बेशिस्त, धंद्याच्या भरभराटीस नुकसानकारक आणि बहुतेक अपस्वार्थप्रेरित असल्याचे सांगितले. नाटक मंडळ्यांत लहान मुलांच्या शिक्षणासंबंधी जी अनास्था दिसून येते तीबद्दल श्री. टिपणीस यांनी नाटकमंडळ्यांना दोष दिला, आणि उत्तम व्यवस्थेची एखादी नमुनेदार नाटकमंडळी करून दाखविण्याची

नाट्यप्रयोगात अतिशयोक्ति, उत्तानविकार प्रदर्शन व अमानुष प्रसंग वसे घालण्यात येत असतात व त्यामुळें शुद्ध व प्रबुद्ध मनानं प्रयोग पाहण्याची वशी सोय उरली नाही ' हे दाखवून त्या प्रकाराचा स्पष्ट निषेध केला

आभारप्रदर्शनानंतर संमेलनाचा कार्यक्रम समाप्त झाला (या संमेलनात खासगी बैठकीत झालेल्या विचार विनिमयाचे शिवा खुल्या बैठकीत मजूर झालेल्या ठरावाचे वृत्त मिळाले नाही )

--



अध्यक्ष रे ना वा टिळक

# ११. मुंबई
## १९१५

मुलाफुलाचे कवि · ख्रिश्चन असूनहि मराठी संस्कृतीचे उपासक

हें संमेलन मुंबई येथील गांधर्व महाविद्यालयाच्या जागेत दि २० व २१ मे १९१५ या दिवशी भरले होतं संमेलनाचें निमंत्रण भारत नाट्य मंडळीने दिलेलें होतें आणि अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध मराठी कवि रे नारायण वामन टिळक[1] याची योजना झाली होती

संमेलनास पाठविलेल्या संदेशात श्री न. चिं केळकर यांनी संमेलनाच्या कार्याचें वर्णन "Co operation of free thought between dramatic companies and the world of their enlightened sympathisers outside' असे केलेलं होतं

## अध्यक्षीय भाषण

'*नाट्यसमेलनाचे अध्यक्षस्थान स्वीकारुन श्री टिळकानी कोणती प्रभु सेवा आणि जनसेवा केली ?*' या ख्रिस्ती मित्रानी विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देताना अध्यक्ष म्हणाले, "ज्याला व्यवहारात धर्म म्हणतात त वास्तविक '*जीवन*' आहे पारलौकिक, एहिक, सामाजिक, राजकीय, वाड्मयात्मक इ या एकाच जीवनाची विविध रूपे आहेत नाट्यकला व नट मिळून जी सस्था बनते तो या जीवनातला एक 'तरग' आहे व हा तरगहि शुद्ध परिपूर्ण व परिरम्य असावा ही ईश्वरेच्छा पार पाडण्यासाठी रेव्हरड या नात्याने मला नाट्यक्षेत्रातहि यता आल आहे "

नाट्यकलेचे स्वरूप सागताना ते म्हणाले, "नाट्यकला ही वक्तृत्व, गान, अभिनय आणि आलेख याचे मिश्रण-रमणीय समीलन आहे नाट्य हा मानवी बुद्धीने प्रगल्भ, उदात्त व कमनीय केलेला स्वभाव आहे नाट्य हा मनुष्याचा स्वभाव आहे खरा, पण त्याची अनियत्रित वाढ थाबवून त्याला बुद्धिमत्तेने मुरड घालून चागले वळण दिल पाहिजे

साप्रत नाटक व नट याना हीनत्व प्राप्त झाल आहे, परतु इग्लडसारख्या *अर्वाचीन ख्रिस्ती देशात नाटक व धम ही एक हाती व आहेत म्हणून* माझ्यासारखा धर्मप्रचारक या समेलनाची धुरा वाहण्यास उद्युक्त झाला आह

कोणत्याहि राष्ट्राचे लाक जाग झाले, राष्ट्रजीवनाच्या नवीन लाटेत पोहू लागले म्हणज ते नाट्यकलेचे प्रसाधन करू लागतात (या विधानाच्या समर्थनासाठी अध्यक्षानी इग्लडमध्ये चाल्ल्या लोकजागृतीचे उदाहरण दिले) इग्लडमध्ये नाट्यवाङ्मयाने लोकापुढे जिवत माणस उभी केली तेथूनच नाट्यकलेच्या उत्कर्षाला आणि प्रकर्षाला प्रारभ झाला काही प्रमाणात आपल्या दशातहि असच झाल आहे आणि होणार आहे तीस-चाळीस वर्षा *पूर्वीची स्थिति पालटली आह जग नटाच कौतुक करायला, त्याना आपल्यां* अधिकाधिक आढून घेण्याला व त्याच्या कल्याचा सहृदयतन विचार करायल तयार आहे नटाना उद्देशून अध्यक्षानी पुढील सूचना केल्या—

(१) उपटपूजागारखी विनोदपात्रे नसावीत

(२) आत्मगत भाषण टाळावीं, आत्मगत विचार मूक अभिनयाः व्यक्त व्हावेत

(३) ज्या ठिकाणी रसाची उत्कटावस्था असेल तेथेंच सगीत योजावे

(४) अभिनयाच्या दृष्टीने नटाचा विचार, उच्चार व आचार यात साहचर्य असावे

(५) सगीत नाटकातील पदाच्या रचना व चाली अभिनयाला सार्जेशा व सशास्त्र असाव्या

भाषणाच्या शेवटीं मराठी नाटचकलेपासून कोणती अपेक्षा आहे हें सागताना रे टिळक म्हणाले, "आज आम्हाला शेक्स्पिअर पाहिज आमच्या लोकात स्वदेशाभिमान जागृत करायला प्रति शक्स्पिअर येथें निर्माण व्हायला पाहिज ज्या दिवशी आम्ही लोकाभिरुचीचे गुलाम नसून तिला वाकवणारे, हवी तशी करून घेणारे तिचे मालक आहोत ' या आत्मप्रत्ययाचे नट निर्माण होतील त्या दिवशी ही आपली महाराष्ट्रभाषा व महाराष्ट्ररगभूमि जगाला आणखी एक शेक्स्पिअर द्यायला सज्ज होईल आजचा काळच मुळी ध्येयाचा आहे तेव्हा उच ध्येय असल्यावाचून नाटचकवि हे लोकशिक्षकाचे काम चागले करू शकणार नाहीत "

"जगाला भीष्म, रामचद्र, हरिश्चद्र प्रत्यक्ष पहावेस वाटल तर ते तुमच्या नीतिशुद्ध वर्तनाने सापडोत म्हणजेच तुम्ही राष्ट्रोद्धार करण्यास प्रवीण ठराल" असे उद्गार काढून अध्यक्षानी आपले भाषण सपविले।

## नाट्यगुणपरीक्षा

समेलनात नाटचप्रवेश करून दाखविणाऱ्या नटाना त्याच्या प्रावीण्याबद्दल भारत नाटचसमाजाकडून प्रशसापत्रकें देण्यात आली

## ठराव

समेलनात पुढील ठराव मजूर झाले

(१) आक्षिप्त वाङ्मयासबधीचा ठराव—'सरकारने आक्षेपार्ह भाग वगळून नाटकें करण्याची परवानगी द्यावी'

(२) प्रयोगासाठी परवानगी मिळवताना ज्या अडचणी येतात त्या दूर व्हाव्यात

(३) नाटच मडळयातील भानगडीचा (मतभदाचा) निकाल भरत नाटच समाजान नमलेल्या पचामार्फत करून घ्यावा

# १२. पुणें

## १९१६


अध्यक्ष : शं. बा. मुजुमदार

*किर्लोस्कर नाटकमंडळींतले सुरवातीचे प्रमुख नट व कुशल व्यवस्थापक : रंगभूमि मासिकाचे संपादक : मराठी रंगभूमीवर यांनीं आमरण नितांत प्रेम केलें.*

बारावें संमेलन पुण्याच्या किर्लोस्कर नाटक-गृहांत, राजापूरकर नाटक मंडळीच्या वतीनें, दि. २९ व ३० मे १९१६ या दिवशी भरविण्यांत आलें. समेलनाचें अध्यक्षपद किर्लोस्कर नाटक मंडळीचे कर्णधार श्री. शंकर बापूजी मुजुमदार यांना देण्यांत आलें होते. समेलनाच्या अध्यक्षपदाचा बहुमान नाट्यव्यावसायिकाला मिळण्याचा हा पहिलाच प्रसंग.

### अध्यक्षीय भाषण

*अध्यक्ष श्री मुजुमदार यांच्या भाषणात पुढील विचार व्यक्त झालेले* आढळतात.

(१) *महायुद्धामुळें नाटकधंद्याच्यापुढें अनेक स्वरूपाच्या अडचणी उभ्या* राहिल्या आहेत त्याचा विचार होणें जरूरीचें आहे.

(२) गेलीं ३।४ वर्षे संमेलनाच्या कार्याला विशेष उत्साह नाही. (भरत नाट्य समाजासंबधी ' रंगभूमि ' मासिकात अशी टीका आली होती की, " भ ना. समाजाची स्थिति क्षयरोग्यासारखी आहे. ठेंचा खात खात त्यानें १२ वर्षे काढ़ली, या सर्व गोष्टी तडीस नेण्याचें श्रेय श्री. वरवे यांना एकट्यालाच आहे ")

(३) स्त्रियाच्या भूमिका स्त्रियांनीच कराव्या अशा स्वरूपाची मतें व्यक्त होऊं लागली आहेत; परंतु सांप्रतच्या सामाजिक परिस्थितीचा कल पाहता या

प्रश्नाची चर्चा आणखी काही वर्षें करू नये

(४) नाटकविषयक अनेक कायदे होत आहेत थिएटरसंबंधीहि कायदे होत आहेत तिकडे लक्ष देणें जरूर आहे

(५) संमेलनात नटवर्ग फारसा भाग घेत नाही ही विषादाची गोष्ट आहे नाट्यकलेचा उद्धार व्हावयाचा असेल तर नटवर्गानेच तो केला पाहिजे विद्वान मंडळी राजे रजवाडे समाज हे सर्व सहानुभूति दाखवून आपले वक्तव्य पार पाडीत आहेत पण नटवर्गाने अद्याप स्वत काही केलेले नाही

निबंधवाचन

(१) 'नाट्यकला आणि नटवर्ग समाजात विशेष आदरणीय होण्यासाठी कोणत्या गोष्टीची आवश्यकता आहे आणि नटवर्गाची पात्रता वाढविण्यास त्याने काय केले पाहिजे या विषयावरील निबंधासाठी किर्लोस्कर ना म ने रु २५ जाहीर केले होते

(२) नटाचे आरोग्य व चर्या या विषयावर डा काळोख यानी आपला निबंध वाचला

(३) श्री सवाई गंधर्व याना आपल्या निबंधात शास्त्रीय संगीताचा प्रसार व्हावा असे सुचविले

चर्चा व ठराव

संमेलनात श्री ना के बेहरे प्रा श्री नी चाफकर श्री अ ब कोल्हटकर याची भाषणे झाली

संमेलनात मंजूर झालेल्या एका ठरावान्वयें नाटकविषयक कायद्याची सुधारणा व्हावी अशी सरकारला विनंती करण्यात आली

दुसऱ्या ठरावान्वयें शेक्सपिअर-त्रिशतसांवत्सरिक जन्ममहोत्सवाच्या प्रसंगानिमित्त शेक्सपिअरविषयी आदर व्यक्त करण्यात आला शेक्सपिअरच्या नाट्यवाङ्मयाची विश्वात्मकता आणि विशेष म्हणजे मराठी रंगभूमीवर असलेले त्याचे ऋण यासंबंधी विवेचन करणारी प्रा चाफेकर श्री गो वा कानिटकर, श्री गो क दामले याची भाषणे झाली



अध्यक्ष कृ प्र खाडिलकर

# १३ पुणे

## १९१७

*मराठीतील अग्रगण्य नाटककार आणि प्रख्यात नाट्यशिक्षक लोकमान्य टिळकांचे राजकीय आणि वृत्तपत्रसृष्टीतले उजवे हात.*

हे संमेलन गंधर्व नाटक मंडळीच्या विद्यमाने पुणे येथील किर्लोस्कर नाटक गृहात दि ४ व ५ जून १९१७ या दिवशी भरले होते [1] संमेलनाचे अध्यक्ष श्री कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर हे होते

## अध्यक्षीय भाषण

कवि हा स्वतः संसारातील आनंद उपभोगून दुसऱ्याचा संसार आनंदमय करीत असता तो राजसत्तेच्या झाडाला सोडीत नाही ती मानिकाश जुमानीत नाही त्याची प्रतिज्ञा असते की रसाने मी राजाला भिजवून टाकीन ब्रह्म जसे विश्वाला व्यापून दशांगुळे उरते तसाच कवि हा राजसत्तेला व्यापून पुनः रंगभूमीवर प्रकट होतच असतो रसामध्ये जो एक प्रकारचा वेग असतो त्यामुळेच कवीमध्ये सामर्थ्य येत असते

रणांगणापासून जसा वीरवृत्तीचा उगम तशीच पुरुषार्थापासून वीरवृत्तापासून राजवैभवापासून रसाचा—काव्याचाहि उत्पत्ति आहे आम्हा कवींच्या मागोमाग वीरपुरुष किंवा वीरवृत्ताच्या मागोमाग आम्ही असा हा वाद आणि

---

१ या संमेलनाचा सविस्तर वृत्तान्त मिळू शकला नाही मात्र खाडिलकरांचे अध्यक्षीय भाषण त्यांच्या 'खाडिलकरांचा लेखसंग्रह' या ग्रंथात ( भाग २ रा ) प्रसिद्ध झाले असल्याने याचा सारांश देणे शक्य झाले

रस यामधील अन्योन्यसबंध आहे माझा हिंदुस्थान, माझें महाराष्ट्र वीर पुरुषांनी केव्हा गजबजून जाईल, यश उज्ज्वल स्वरुपाने वावरू लागेल, अशी तळमळ कवींना लागून राहिलेली असते कवि व वीर यांचा हा आधी मागूनचा परस्परपोषक चमत्कार पूर्वी महाराष्ट्रात स्वराज्याच्या वेळी दिसून आला कवींचे राज्य व वीर पुरुषांचे राज्य महाराष्ट्रात एकाच वेळी नांदले

'दुनियेचे कल्याण मी करीन' अशी वीरवृत्ति ज्याच्यात आहे त्याची कीर्ति कवींनी गायची नाही तर कुणाची गायची ? ससारी जनास कर्मयोगाला प्रवृत्त करणे हे वीराचे काम, हे कवीचे काम ! राष्ट्राला सुखी करीन हा पीळ वीरांना पडेल तेव्हा कवीच्या अंत करणात कालवाकालव होईल, तो काव्य बोलेल, तो रस ओतील, तो नाटक गाईल ! काममोहित क्रौंचमिथुनाला मारताना पाहून वाल्मीकिसारख्या आद्य कवीच्या तोंडून काव्यरूपाने शापवाणी प्रकट झाली मसारसुखाची राखरांगोळी झालेली पाहून शापवाणी उच्चारणे कवीला अपरिहार्य आहे कवि शाप बोलेल तोच वीरवृत्ति आळखील

ज्याचे कीर्तनविषयाशी तादात्म्य होते तोच उत्तम हरिदास असे रामदासांनी सांगितले आहे ज्याचे राष्ट्राच्या वीरवृत्तीशी, परमपुरुषार्थाशी तादात्म्य झाले तोच उत्तम नाटककार होतो, व जो स्वत च्या भूमिकेशी तादात्म्य पावला तोच उत्तम नट होतो हा कर्मयोगाचा सप्रदाय महाराष्ट्रात फार पुरातन आहे महायुद्धाने राजकीय वातावरण धडाडून पेटले आहे, हाच काळ कवींना अनुकूल, वीरांना अनुकूल, राष्ट्रमर्यादेयाला अनुकूल होय याच काळी महाभारत समजल हाच काळ नटांना व नाटककारांना हितावह आहे "

## निबंधस्पर्धा

यदाच्या वर्षीहि किर्लोस्कर स ना म न गेल्या वर्षीचाच विषय निबंधासाठी ठरून त्याला २५ रु च बक्षिस जाहीर केले होते



अध्यक्ष मु. रा. जयकर

## १४. पुणें
### १९१८

*राजकारण व कला यांचा सुरेख संगम साधणारे, महाराष्ट्राला अभिमान वाटणारे विख्यात कायदेपंडित व वक्ते पुणें विद्यापीठाचे पहिले कुलगुरु*

हें संमेलन पुण्याच्या नूतन आर्यभूषण नाट्यगृहात, महाराष्ट्र नाटक मंडळीच्या विद्यमाने दि. २७ व २८ मेला बॅ. मुकुंद रामराव ऊर्फ बाबासाहेब जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें.

श्री. केळकर, श्री. खाडिलकर, प्रो. भानु, दे. भ. परांजपे इ. माजी अध्यक्षांच्या व श्री. टॅब, प्रा. फडके, प्रा. भाटे इ. रसिकांच्या उपस्थितींत संमेलनाच्या कार्यक्रमाला प्रारंभ झाला. स्वागतपर भाषणांत महाराष्ट्र ना. मं. चे चालक श्री. कारखानीस म्हणाले, "नाटककारांनी व नटांनी आपलेंच कार्य आहे असें जाणून हें संमेलनाचें कार्य यशस्वी करावें. सुशिक्षित समाज, नटवर्ग व नाटकमंडळ्या यांनी एकमेकांपासून दूरदूर राहतां कामा नये. अन्योन्य परिचयानें परस्पर हितच होणार आहे. नटवर्गानें भारत नाट्यसमाजासारख्या मध्यवर्ती मंडळाकडून त्यांच्यापुढें निर्माण होणाऱ्या अडचणी दूर करून घ्याव्यात. त्यांच्या फायद्यासाठीं 'प्रॉव्हिडंट फंड' काढावा. तसेंच नाट्यग्रंथांची एक मोठी लायब्ररी असावी."

चिटणिसांच्या अहवाल व संदेशवाचनानंतर अध्यक्षांचें भाषण झालें. अध्यक्ष बॅ. जयकर आपल्या भाषणांत म्हणाले,

"नाटकाच्या प्रयोगप्रसंगीं सुशिक्षित वर्ग तटस्थ आहे. हा समाज आपणी तटस्थपणाच्या गादीवरून तयार होणार नाहीं, तोंपर्यंत नाटकाच्या प्रयोगांनी

प्रगति होणार नाही म्हणून सुशिक्षित लोकाची मैत्री व महकारिता नाटक मडळयानी सपादन केली पाहिजे सध्याच्या नाटय मडळयानी आपले वतन सुधारले पाहिजे व समाजातील सुशिक्षित वर्गाशी सहवास ठेवला पाहिजे आज नटाबद्दल सुशिक्षित मडळीत आदर नाही याचे कारण नटाचे निकृष्ट वतन हेच होय आज जी हिंदी सस्कृति विद्यमान आहे तिचे उज्ज्वल स्वरूप लोकापुढे माडणे हेच नटवर्गाचे कर्तव्य होय समाजातले हजारो स्त्री-पुरुष नाटक पाहण्यास येतात नाटक हे समाजाचे — सुसस्कृत समाजाचे — चित्र असल तर करमणुकीबरोबर त्याना शिक्षणहि मिळणार आहे

मध्यवर्ती अशा नाटयभिन्न सुशिक्षित मडळीच्या नेतृत्वाखाली नाटक-मडळयानी काम केले तर हल्लीचे बरेचसे दोष नाहीसे होतील (या ठिकाणी अध्यक्षानी पूर्वी झालेल्या कै य बा कीर्तिकर याच्या कालिदास एल्फिन्स्टन सोसायटीचा त्याचप्रमाणे कै अण्णासाहेब किर्लोस्कराच्या उपक्रमाचा निर्देश केला) नाटक मडळयामध्ये आपल्या व्यगाची जाणीव उत्पन्न होऊन श्री वरवे यानी स्थापिलेल्या भरत नाटक समाजाला त्या जोवर मदत करीत नाहीत व तद्वारा आपली उन्नति करून घेत नाहीत तोपर्यंत आपल्या नाटक मडळयाची व नटवर्गाची सुधारणा होणार नाही '

अशी सुधारणा करण्यासाठी अध्यक्षानी पुढील उपाय सुचविले (१) नटा साठी प्राव्हिडट फडाची योजना (२) सगीत नाटकात गायनभिज्ञ नटाचा समावेश (३) नाटयशिक्षणाची सोय (४) नाटयग्रथाचे सग्रहालय, इ इ

## चर्चा

समेलनात झालेल्या भाषणाचा साराश —

**श्री कृ प्र खाडिलकर** यानी शाकुतल नाटकाच्या पहिल्या व चवथ्या अकाच्या आधारे दुष्यत व शकुतला याची स्वभावरचना विशद करून सागितली

दे शि म परांजपे यानी ' त्रैगुण्योदभवमत्र लोकचरित नानारस दृश्यते ' या श्लोकाधारे नटानी कृत्रिम रग वगैरेवर भिस्त न ठेवता विकार दश विण्यास अत करणात वास करण्याऱ्या सत्त्वरजादि त्रिगुणाचा एकतानतेने उपयोग करावा असे सुचविले

श्री व ह पंडित यानी आधुनिक नाटकातील भार्तीचे ऐतिहासिक दृष्टीनें परीक्षण करून हास्यातिरेक आणि संगीतातिरेक हे दोष नाटकातून कमी करावेत असे सांगितले,

प्रा ना सी फडके यानी, नटानी निर्भीड टीका झाली तरी डगमगून न जाता, अशिक्षित लोकांच्या स्तुतीला न भुलता, सुशिक्षित वर्गाच्या मताकडे लक्ष देऊन चालावे व त्याच्या अभिप्रायाप्रमाणे नाटकाची निवड व नाटकातील अभिनय करावा असे सांगितले.

श्री द बा मुजुमदार आपल्या भाषणात म्हणाले, " एकीकडे क्रमाक्रमाने संमेलनाचे अंक वाढत आहेत, परतु त्याप्रमाणे दुसरीकडे त्याची उतरती कळा दृष्टीस पडत आहे विद्वान लोकानी यावे, भाषणे करावीत व नाट्यव्यवसायाबाहेरच्या लोकानी ती ऐकावीत या पलीकडे भरत नाट्य समाजाचे कार्य काहीएक झाले आहे असे निदर्शनाला येत नाही नाटक मंडळ्यांचा या उपेक्षावृत्तीने चौदा वर्षे जरी जरी संमेलनात नाटकधद्यासबधान ऊहापोह चालला आहे तरी ' पालथ्या घड्यावर पाणी ' हाच अनुभव आला "

चर्चेत श्री न चि केळकर, प्रा ग म भाटे व प्रा गो चि भाटे इ. विद्वानांचीहि भाषणे झाली

समारोपाच्या भाषणात, " समाजातील सुशिक्षित वर्ग आणि नट यांच्या साहचर्याची आवश्यकता आहे हे या संमेलनात उत्तम रीतीने सिद्ध करून दिले आहे " असे सांगून अध्यक्षांनी प्रा परांजपे यांच्या ' गुण्योद्‌गमन० ' या चरणाच्या प्रतिपादनाचे समर्थन केले कोणतेहि चागले नाटक रंगभूमीवर येण्यापूर्वी त्या नाटकावर एखाद्या पदवीधर व तज्ज्ञ गृहस्थाकडून नटवर्गाने प्रवचन करून घ्यावीत, ती ऐकावीत व मग नाटक बसविण्याचे काम सुरू करावे ' अशी नटाना सूचना करून अध्यक्षांनी आपले भाषण संपविले

श्री गोविंदराव टेंबे यांच्या आभारप्रदर्शनानंतर संमेलनाचा कार्यक्रम समाप्त झाला



अध्यक्ष नि वि वैद्य

# १५. पुणें

१९१९

भारताचार्य. ग्वाल्हेरचे माजी न्यायाधीश. गाढे संशोधक आणि लेखक

हे अधिवेशन पुणे येथील राष्ट्रीय नाट्यशाळेच्या[1] तर्फे नूतन आर्यभूषण नाटकगृहात दि १२ व १३ मे या दिवशी साजरें झाले भारताचार्य श्री चिंतामण विनायक वैद्य यांची अध्यक्ष म्हणून योजना झाली होती

संमेलनाला पुढील नाट्यसंस्था प्रत्यक्ष किंवा प्रतिनिधिरूपानं उपस्थित होत्या— (१) किर्लोस्कर सं ना म (२) गंधर्व ना म (३) नूतन सं ना म (४) महाराष्ट्र ना म (५) सोशल क्लब, पुणे (६) गणेश ना म (७) सिद्धराज सं ना म. (८) तरुण मित्र मंडळी. (९) पाचवड क्लब, (१०) वळवत गुणसेवक मंडळी इ इ

राष्ट्रीय नाट्यशाळेतर्फे स्वागत करताना चिटणीस श्री बरवे म्हणाले,

---

१ श्री अनंत वामन बरवे यांनी स्थापना केलेल्या नाट्यविद्यालयाची सुरुवात डॉ थाथर व्यंकटेश केतकर यांच्या हस्तें १९१७ च्या त्रिपुरी पौर्णिमेस झाली १९१८च्या त्रिपुरी पौर्णिमेस या विद्यालयाचा पहिला वाढदिवस समारंभ श्री कृ प्र खाडिलकर यांच्या हस्तें झाला, त्यावेळीं त्यांनी विद्यालयाचें नाव 'राष्ट्रीय नाट्यशाळा' असें ठेवलें ठाण्याचे श्री द प पाठारे यांनीं ४०० रु ची देणगी देऊन संस्थेच्या कार्याला मोठी चालना दिली तेच या संस्थेचे पहिले विद्यार्थी संमेलनाच्या वेळीं सर्वेन १० विद्यार्थी होते पहिल्या वाढदिवसाच्या वेळीं या विद्यार्थ्यांनीं नाट्याभिनयाचीं कांहीं प्रात्यक्षिकें करून दाखविलीं

"संमेलनाचे हे १५ वे वर्ष म्हणजे भारत नाट्यसमाजाची बालदशा सपून त्याचे पाऊल आता प्रौढपणात पडण्याचा काळ आला आहे यावेळी समाजाचा शाळेबरोबर योग जुळून, उत्तरोत्तर समाज हा 'संमेलनीय बाललीला' सोडून प्रौढपणाच्या काही कार्यास लागलेला दिसला पाहिजे"

संदेशवाचनानतर चिटणीसानी पुढील नाट्यसेवेबद्दल दुखवटा व्यक्त केला—(१) श्री राम गणेश गडकरी, (२) श्री हरि नारायण आपटे (३) रे ना वा टिळक, (४) श्री शिवरामपत जोशी व (५) रा सा, गो वा कानिटकर श्री वैद्य अध्यक्षपदी स्थानापन्न झाल्यानतर, भरत नाट्य समाजाचे चिटणीस म्हणून गेल्या वर्षी नियुक्त झालेले श्री सीताराम भास्कर जोशी यानी समाजाचा अहवाल वाचून दाखविला त्यानतर अध्यक्षांचे भाषण झाले

## अध्यक्षीय भाषण

कीर्तन व नाटक याची तुलना करताना अध्यक्ष म्हणाले, "कीर्तनात वक्ता व श्रोता अशी द्वयी असते तर नाटकात नट, नाटककार व प्रेक्षक अशी त्रयी असते नट व नाटक यापेक्षा ते नाटक पाहणारा जो द्रष्टा (प्रेक्षक) त्याचा अधिकार मोठा आहे या द्रष्ट्यानी आपले कर्तव्य नीट बजावले नाही म्हणून आपल्याकडील नाट्यकलेची सुधारणा व्हावी तशी झालेली नाही ही कला व शास्त्र फार जुनी आहेत ब्रह्मदेवाने सागितले व भरतमुनीनें तें ऐकले अशी दतकथा आहे यातील भरतशब्द 'अभिवाची' आहे "ग्रीकापासून भारतीय लोकानीं नाट्यकला घेतली" ही पाश्चात्य विचारसरणी कशी भ्रामक आहे हें सागून अध्यक्ष म्हणाले, "मनोरजन आणि नीतीचा पाय दृढ घरून मनात सद्गुणाचा प्रादुर्भाव उत्पन्न करणे हा नाटकाचा प्रधान हेतु होय उत्तम नाटकाचा उत्कृष्टपणा म्हणजे तें पाहण्याने देशप्रीति, सत्यप्रेम, स्वार्थत्याग इ सद्गुणाचे बीजारोपण हृदयात होतें जर्मन लोकाना देशप्रीतीच शिक्षण गेटीच्या नाटकानीच दिले 'हेन्री दि फोर्थ' व 'फिफ्थ' ही शेक्स्-पिअरचीं नाटक देशभक्तीनें ओथबलेली आहेत समाजाला उच्च व नीच स्थितीला नेण्याचा अधिकार नाटककाराचा आहे'

नाटकातील सगीताबद्दल आपला अभिप्राय सागताना श्री वैद्य म्हणाले

"नाटकात पदें अमूच नयेत ' हृ म्हणणे मात्र पसत नाही केवळ गद्यान प्रक्षकाचे मनावर व्हावा तितका परिणाम होत नाही गीत हृ नाटकाचे प्रधान अग आहे कालिदास, भवभूति, गेटी, शेक्सपिअर याची नाटके पद्यमयच आहेत—सगीतात गीत आणि भापण या दाहाचाहि अतर्भाव आहे नृत्य तितक आवश्यक आहे असे वाटत नाही सगीत हृ नादब्रह्म आहे—परतु जेव्हा एखाद्या प्रासादिक पदातील सुदर उपदेश श्रोत्याच्या मनावर ठसवावयाचा असतो तेव्हा नटान शब्दाचे अर्थ लुप्त होतील असा ताना घेत बसू नये "

नाटक म्हणजे चित्र, सुदर वचने, उत्कृष्ट देखावे व उदात्त मनोभाव इ जगातील उत्कृष्ट भागाचे एकीकरण असते हृ अध्यक्षानी 'शाकुतल' नाटकातील उदाहरणे देऊन पटवून दिले

"काव्यातील रसाचा आविर्भाव श्रोत्याच्या ठिकाणी होतो की नटाच्या ठिकाणी होतो असा एक महत्त्वाचा प्रश्न आहे रस म्हणजे ससारात चालल्या आनदाचा गाभा श्रोत्याच्या अत करणात आनद उत्पन्न होईल अशी मनात जाणीव ठेवून नटानी आविर्भाव करून दाखविला पाहिजे जी भूमिका आपण घेता तिच्याशी आपले तादात्म्य झाले आहे असे नटाने श्रोत्यास भासवले पाहिज व आपण घेतलेल्या सोंगाची वतावणी करीत आहो ही जाणीव मात्र त्यान आपल्या मनात ठेवली पाहिजे उपदेश इतकाच घ्यायचा की नट जसा नाटकात आविर्भाव करून दाखवितो तस मनुष्याने ससारात वागावे, म्हणजे ससारातली सर्व कार्ये उत्साहाने करायची परतु त्यातच रगून किंवा गुरफटून न जाता मी परमेश्वररूप आहे अशी नेहमी जागृति ठेवावी आणि अलिप्तपणे सर्व कर्मे कृष्णार्पणवुद्धीनें करावी "

## चर्चा

समेलनात झालेल्या भापणाचा सारास—

**प्रा चि ग भानू**—नाटक हे ससाराचे प्रतिबिंव आहे प्रतिबिंवाचे कार्य बिंबावर घडून ससार सुखाचा व्हावा व पतिपत्नीच्या सात्विक प्रेमाचा विकास व्हावा आणि योग्य शिक्षणाने ससाराचे रहस्य समजावून देण्यासाठी नाटककर्त्यांनी नाटयवस्तु निर्माण करावी नट होऊ इच्छिणारा गृहस्थ कितीहि वुद्धिमान् असो, त्याला नाटकातील अभिनयाला अवश्य असणाऱ्या शास्त्रक्रियाचे

ज्ञान शिक्षणाशिवाय होणे शक्य नाही, म्हणून नटास नाट्यविषयक शिक्षण चांगल्या प्रकारें मिळणे अत्यंत इष्ट आहे कै गोपाळराव दाते, श्री भट, भोननीस, किंवा राजहंस (बालगंधर्व) यांसारखे कित्येक उपजतच नट असतात पण ते अपवाद आहे सामान्य नटांना शिक्षण असणे अवश्य आहे श्री बरवे यांनी काढलेली नाट्यशाळा ही उणीव भरून काढील अशी मला आशा आहे, तिला नाट्याभिमानी लोकांनी शक्य ती मदत अवश्य करावी

**श्री गो मा चिपळोणकर**—नाट्य हें लोकशिक्षणाचें अंग आहे नाटक-वाल्यांचा दर्जा उच्च नाहीं हा गैरसमज दूर झाल्याखेरीज चांगले सुशिक्षित नट मिळूनहि नाट्यकला उर्जितावस्थेस येणार नाहीं पाश्चात्य देशाप्रमाणे *शाळा-कॉलेजांतून संमेलनादिप्रसंगीं विद्यार्थ्यांकडून नाटकें करवून घेण्याचा प्रघात मराठीत पडला पाहिजे नाटकें करणें हे पाश्चात्य लोकांच्या अंगवळणी* पडलें आहे ज्या मुलांना रूपाची व आवाजाची अनुकूलता असेल त्यांनी नाटकांत जाणे हे कॉलेजांत जाण्याइतकेंच महत्वाचे आहे कारण नाटकांत राहूनहि लोकशिक्षणाचे काम करता येतें व नट हा धंदा काहीं कमी महत्त्वाचा नाही नाटककार व शाळा-कॉलेजांतील अध्यापक यांची एक संयुक्त परिषद बोलावून तीत या विषयासंबधानें ऊहापोह व चर्चा झाल्यास हितप्रद होईल

**श्री कृष्णाजी आबाजी गुरुजी**—'समाजसुधारणेच्या दृष्टीनें कीर्तन आणि नाट्य या दोन्ही संस्थांची जरुरी आहे' असे सांगून श्री गुरुजींनी कीर्तन व नाट्य यांतील साम्य वर्णन केलें ते पुढे म्हणाले, "समाजांत शील उत्पन्न करण्याचे काम व चैतन्य उत्पन्न करण्याचें काम कीर्तनकारापेक्षा कांकणभर जास्तच हे नट व नाट्यकार करूं शकतील" याच्या समर्थनासाठीं गोरक्ष-णाच्या आपल्या कार्यांत नाटकाची मदत कीर्तनापेक्षा जास्त कशी झाली हें *श्री गुरुजींनी सांगितले त्याचप्रमाणे कै बापू गोखले यांच्या स्मृतीशी* निगडित झालेली विहीर गुरुजींच्या नाट्याविर्भावानें पुन्हा स्मृतिस्थळ म्हणून सभाळण्याचें लोकांनी ठरविलें' हा ऐतिहासिक प्रसंगहि त्यांनी निवेदन केला शेवटी वंगभंगाच्या समयीं श्री फणसळकर यांच्या 'स्वदेशी' नाटकामुळें स्वदेशीची केवढी प्रचंड लाट उसळली त्याचें वर्णन करून गुरुजींनी आपलें भाषण संपविलें

या चर्चेच्या कार्यक्रमात श्री त्र्य मो कारखानीस व श्री ग कृ बोडस यानीहि भाग घतला होता

श्री वोलकर यानीं रा ग गडकऱ्याच्या 'प्रेमसंन्यास' नाटकावरील आपला निबंध वाचून दाखविला

## गुण गौरव

या संमेलनात मराठी रंगभूमीवरील अभिनयपटु श्री चिंतामण गणेश गोखले, ठाण्याचे श्री पा वि जोशी व ग कृ बोडस या तिघाना अध्यक्षाच्या हस्ते रौप्यपदके देण्यात आली

सकेश्वर मठाचे जगद्गुरु श्रीशंकराचार्य यानी श्री अ ना वरवे यांच्या नाट्यसेवेमुळें संतुष्ट होऊन 'नाट्यकाव्यालंकारभूषण' ही पदवी व एक प्रशस्तिपत्रक दिले अध्यक्षाच्या हस्ते ती पदवी व प्रशस्तिपत्र श्री वरवे याना अर्पण करण्यात आले

## आभार व समारोप

उत्तर हिंदुस्थानातील छत्तरपूरच्या संस्थानच्या अधिपतीनी नाट्यशाळेला देणगी दिल्याबद्दल त्याचे आभार मानण्यात आले

समारोपाच्या भाषणात अध्यक्ष श्री चिं वि वैद्य म्हणाले कोणतीहि विद्या उत्कर्षाला पावण्यास तीन गुण आवश्यक आहेत (१) परमेश्वराची देणगी, (२) व्यासंग व (३) गुण व्यासंग व गुण याच्यासाठी नाट्यशाळा पाहिजेत कारण झाले की विकाराचा आविर्भाव होतो परंतु कारणाशिवाय अनेक विकाराचा आविर्भाव करणे कठिण आहे व तेच नटाचे काम आहे त्याला

# १६. पुणें

## १९२०



अध्यक्ष : वामन गोपाळ ऊर्फ वामनराव जोशी

*विदर्भाचे एक धडाडीचे राजकीय पुढारी, महात्माजींचे कट्टर अनुयायी. राक्षसी महत्त्वाकांक्षा आणि रणदुंदुभि या तेजस्वी नाटकाचे लेखक.*

हें संमेलन श्री सिद्धराज प्रासादिक स. ना. मंडळीच्या विद्यमाने पुणे येथील नूतन आर्यभूषण नाटकगृ. त दि. २४ व २५ मे १९२० या दिवशी भरलें होतें. संमेलनाच्या अध्यक्षस्थानी वऱ्हाडचे वामन गोपाळ ऊर्फ वीर वामनराव जोशी यांची नियुक्ति झाली होती.

*श्री. श्री. कृ. कोल्हटकर व श्री. खापर्डे यांनी अध्यक्षीय नावाची सूचना मांडली व श्री. शि. म. परांजपे यांनी तिला अनुमोदन दिल्यानंतर अध्यक्ष स्थानापन्न झाले.*

या वर्षापासून समाजाचे चिटणीस श्री. अ. वा. वरवे यांनी आपल्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें संमेलनाच्या व समाजाच्या कार्याची जबाबदारी श्री. सी. भा. जोशी यांच्यावर सोपविली होती.

चिटणीस श्री. सी. भा. जोशी यांनी संदेश वाचून दाखविले व अहवाल



अध्यक्ष यशवंत नारायण टिपणीस

# १७. पुणें
## १९२१

रंगभूमीच्या सर्वांगीण तंत्राचे जाणकार. नट, नाटककार व नाट्यशिक्षक. प्रख्यात महाराष्ट्र नाटक मंडळीचे एक मालक.

सतरावं संमेलन दक्षिणी सुबोध नाटक मंडळीच्या विद्यमाने पुणे येथील किर्लोस्कर नाटकगृहात दि २३ व २४ मे १९२१ या दिवशी भरलं होतें संमेलनाचे अध्यक्षस्थान श्री यशवंत नारायण टिपणीस याना देण्यात आले होते

दक्षिणी सुबोध मंडळीच्या वतीने श्री गि म परांजपे यानी उपस्थित मंडळीचे स्वागत केले व अध्यक्ष श्री य ना टिपणीस याचा परिचय करून देऊन त्याना अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंती केली श्री परांजपे याच्या सूचनेला श्री मामा वरेरकर यानी अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले

समाजाचे चिटणीस श्री सी भा जोशी यानी गल्या वर्षात समाजानें केलेल्या कामगिरीचा अहवाल वाचून दाखविला त्याच्या संदेशवाचनानंतर अध्यक्षीय भाषणाचा कार्यक्रम झाला[1]

## निबंधवाचन

या संमेलनात पुढील निबंध वाचून दाखविण्यात आले

(१) नाटकापासून प्रेक्षकावर होणारा परिणाम—श्री व्यंकटेश वळवंत पेंढारकर

१ श्री टिपणीस यांचे अध्यक्षीय भाषण मिळू शकलें नाहीं

१९१० मध्ये छापलेल्या नियमात व घटनेत दुरुस्ती करण्यासाठी २३ जणांची एक समिति नेमण्यात येऊन तिने ४ महिन्याच्या अवधीत योग्य ते फेरफार सुचवावेत असे खासगी सभेतील कामकाजात ठरविण्यात आले. समितीमध्ये शि म परांजपे, न चि केळकर खाडिलकर, टिपणीस, वरेरकर अ वा वर्वे, द आ फाळके, यशवंतराव भोसले, बालगंधर्व, पेंढारकर, इत्यादींचा अंतर्भाव आहे

अध्यक्षीय समारोप झाल्यानंतर ललितकलेतील एका बालनटाने एक पद गाऊन दाखविले व समारंभ समाप्त झाला'



अध्यक्ष श्री केशवराव कोरटकर

# १८. पुणें

१९२०

*हैदराबाद संस्थानातील नामवंत न्यायाधीश. मराठी संस्कृति व रसिकता यांचे कैवारी.*

अठरावें संमेलन पुण्यातील नूतन आर्यभूषण नाटकगृहात भारत नाट्यसमाज या मध्यवर्ति संस्थेच्या विद्यमानें हैदराबादचे वकील श्री केशवराव कोरटकर यांच्या अध्यक्षतेखाली दि ४ ते ६ मे १९२२ या दिवशीं भरलें होते

प्रारंभी चिटणीस श्री भी भा जोशी यांनी अहवाल व संदेश यांचे वाचन केले अहवालांत त्यांनी, 'प्राव्हिडंट फंडाची कल्पना यशस्वी होण्यासाठी कंपन्यांनी समाजास अधिक प्रमाणात द्रव्यसाहाय्य करावें' अशी विनंती केली श्री भास्करबुवा बखले व श्री लोखंडे यांच्या निधनाबद्दल दुःखवटा व्यक्त केला

याच वेळी करवीरमठाचे शंकराचार्य डॉ कुर्तकोटी समारंभस्थानी उपस्थित झाले त्यांनी आपल्या भाषणात संमेलनाच्या कार्याला आशीर्वाद दिला

दुसऱ्या दिवशी अध्यक्षीय भाषणानंतर चर्चेला सुरवात झाली[1]

## चर्चा

श्री गो मा चिपळूणकर आपल्या भाषणात म्हणाले, "नाटकें व सिनेमा यांपासून आपल्या भावना व कृति या सुसंस्कृत होत असतात हल्ली शाळांतून नीतीचे धडे घसा फोडून घ्यावेत आणि सिनेमांतून शृंगारपूरित देखावे पाहून त्यांचें मन बिघरावें असा प्रकार चालला आहे यासाठीं सिनेमा कंट्रोल बिलाची आवश्यकता आहे शिक्षण महोत्सव प्रसारक मंडळी स्थापन होऊन खेडोपाडी शिक्षणाचा प्रसार नाटकांच्या सहाय्यानें करावा

१ अध्यक्षीय भाषणाचा वृत्तांत मिळाला नाहीं

डॉ रा भि नाईक यानी आपल्या भाषणात, नाटकमंडळांनी शक्य तितका देशी कापडाचा वापर करावा अशी सूचना केली

श्री मो भा जोशी यानी इन्कमटॅक्स अधिकारी व रेल्वे याच्याकडून मंडळ्यांना जो त्रास होतो त्याचे वर्णन केले व कौन्सिलमध्यें नाटकमंडळचा-तर्फे एक सभासद नेमला जावा अशी सूचना केली चर्चेत भाग घेताना अध्यक्ष म्हणाले, " महाराष्ट्रातील नाटकाची सुधारणा पाहता हिंदुस्थानात बंगालशिवाय इतर कोठेंच इतकी सुधारणा झालेली आढळत नाही नाटक हे केवळ मनोरंजनाचे साधन नाही त्याने लोकशिक्षणहि देता येत नाटकाच्या योगाने समाजातील अश्लीलतेस आळा घालता येईल अश्लील नाटके आणि कार्ये यावर निर्बंध घालण्यासाठी जबाबदार संस्था असणें इष्ट आहे

श्री लक्ष्मणशास्त्री लेले यानी श्री रा ग गडकरी याच्या 'एकच प्याला' या नाटकासबधी आपले विचार प्रदर्शित केले ते म्हणाले, " या नाटकाच्या नावात फारसा ध्वनि नाही, पण नाव सुदर आहे नावाची ही कल्पनाहि नवीन आहे कर्त्यांनी नाटक लिहिताना 'मूकनायक' डोळ्यासमोर ठेवलेले दिसते पात्राची नावें रोमँटिक (Romantic) आहेत सिंधू हे नाव मात्र तितकेंसे मार्मिक नाही

पहिल्या अकातील सविधानकाची सूचना मार्मिक वाटत नाही केवळ शाब्दिक वाटते पहिला अक बराच पोचट व बेचव झाला आहे सविधानक सामान्य असले तरी त्याचे रहस्य चागले वठवले आहे या नाटकाला Message आहे सिंधूहि चागली Ideal स्त्री आहे नायक सहज फसणारा व सात्त्विक वृत्तीचा आहे 'गीते' सारखे ताडीस तोड खटपाळ पात्र निर्माण

भारत नाटय समाजातर्फे 'गोपाल क्लब' या सस्थेला सुवर्ण पदक देऊन तिचा गौरव करण्यात आला

## ठराव

(१) १९२२ या वर्षाकरिता समाजाच्या कार्यकारी मडळावर पुढील सभासद स्वीकृत करुन घेण्यात यावत—(१) श्री माधवराव काम्स, (२) श्री. द आ फाटक, (३) श्री केशवराव कारटकर, (४) श्री ममुरकर, (५) श्री वाघ (आर्यनचे मॅनेजर) व (६) श्री मोदी

(२) या ठरावान्वयें भारतसमाजाच्या चालू घटनचा विचार करुन तील परिस्थित्यनुमार अवश्य वाटत अमलल्या दुरुस्त्या मुचविण्यासाठी पुढील सभासदाचा एक समिति नेमण्यात यावी–(१) श्री क म्य दात, (२) श्री गोखल, (३) श्री म वा राण, (४) श्री पाडुरग राव, (५) श्री आपटे व (६) श्री मोदी

## करमणूक

सोशल क्लबन 'शाटिका' नाटकाचा प्रयाग करून त्याच उत्पन्न भारत नाटय समाजाम दिल त्याबद्दल चिटणिमानी क्लबाचे आभार मानले

—

# १९. पुणें

१९२३



अध्यक्ष श्री ना चाफेकर

डेक्कन कॉलेज व फर्ग्युसन कॉलेज येथील मराठीचे प्राध्यापक. संस्कृत व मराठी भाषेचे पंडित. व्युत्पन्न कवि व पट्टीचे वक्ते.

हें संमेलन यशवंत स ना मंडळीच्या विद्यमाने पुणें येथील किर्लोस्कर नाटक-गृहात दि २५ व २६ मे १९२३ या दिवशी भरले होते प्रा श्रीकृष्ण नीळकंठ चाफेकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले होते

यशवंत स मंडळीतील मुलांनी स्वागत-गीत म्हटल्यानंतर श्री नानासाहेब हर्डीकर यांनी उपस्थितांचे स्वागत केले

अध्यक्ष स्थानापन्न झाल्यानंतर चिटणीस श्री सी भा जोशी यांनी अहवाल-वाचन करून आलेले संदेश वाचून दाखविले

## अध्यक्षीय भाषण

संमेलनाध्यक्ष प्रा चाफेकर यांनी आपल्या भाषणात मराठी रंगभूमीचा १८४३ पासूनचा इतिहास निवेदन केला ते म्हणाले 'कैं आण्णासाहेब किर्लोस्करांनी शास्त्रीय संगीताचा पहराव चढविल्यापासून संगीत नाटकाचा उत्कर्ष होऊं लागला

संगीतामुळें गद्य नाटक बिघडतें असें बिलकुल नाहीं गंभीर व मननीय विषय असलेल्या नाटकातहि संगीन घातलें तरी रसहानि होण्याचा भीति नाही मात्र त्यातील संगीतयोजना नीट झाली पाहिजे या बाबतीत याजक स्नेह दुर्लभ ' असा अनुभव येतो हें बरें नाही

इग्रजीतील कॉमेडी (Comedy) व ट्रॅजेडी (Tragedy) या शब्दाचे आनदपर्यवसायी व शोकपर्यवसायी असे भाषातर करण्यात यतें पण त बरावर नाहीं. जे विषय केवळ मनाला प्रसन्न करण्याच्या दृष्टीनें लिहिलेले असतात अशा नाटकाना कॉमेडी म्हणतात उलट, भव्योदात्त विषयावर लिहिलेले असून ज्यात वाग्म्याची छटा आहे व इष्ट परिणाम घडलेला ज्यात दाखविलेला आहे त नाटक 'ट्रॅजेडी' होय 'एकच प्याला' हें ट्रॅजेडीचे उत्कृष्ट उदाहरण होय उत्कृष्ट नाटक कस निर्माण होईल याकडे लेखकान लक्ष दिल पाहिजे उत्कृष्ट नाटक निर्माण करण्यास प्रतिभा, परिश्रम, सविधानकचातुर्य, चित्ताकर्षकता आणि परिणामकारकता हे गुण पाहिजत नाटकाचे 'क्रियेची समग्रता' म्हणजे 'Completeness of action' हें एक प्रधान अग आहे ते सावल म्हणज नाटक लहान की मोठें ह पाहण्याचे कारण नाही " नट कसा असावा याविषयी प्रा चाफेकर म्हणाले. की अगशक्ति व कामाच स्वरूप ओळखणारा आणि तादात्म्यवृत्ति असलेला, नट असावा सगीताबद्दल ते म्हणाले, " सध्याचे सगीत हे पेपरमिन्मारखें आहे पेपरमिंट विरघळल्यावर त्यात कुचका धणा सापडतो तस आजच्या सगीताचे आहे सगीत कितीहि घोळक तरी श्रोत्याच्या मनावर अर्थाचा प्रकाश मुळीच पडत नाही "

## निबधवाचन

श्री एस जी तळवलकर यानीं 'नाट्यविषयक विचार' या आपल्या निबधात मराठी रगभूमीवरील स्थित्यतराचा थोडक्यात आढावा घतला

श्री बळवतराव वाघ यानी आपल्या निबधात नाट्यकलेला जाचक ठरणाऱ्या करमणुकीच्या कराचा विचार केला होता हा कर गरीब प्रेक्षकाकडूनच वसूल होणार असल्यानें सरकारने तो बसवू नये अशी श्री वाघ यानी सूचना केली होती

## चर्चा

श्री सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यानी 'सस्कृत वाङ्मयाधारें नाट्याचा इतिहास कथन केला ते म्हणाले " नाट्याच सुरवातीच स्वरूप हे साभिनय गीत व हावभावयुक्त नृत्य अशा द्विविध स्वरूपाच होत नाट्यातल्या सवादा

प्रमाणे शतपथ ब्राह्मणात काही संवाद आले आहेत प्राचीन वाङ्मयात कृशाश्च व शैलालिन् या नाटयसूत्रकाराचे उल्लेख आढळतात भरताचे नाटयशास्त्र हे पाणिनीच्या पूर्वीच, त्यातहि या नाटयसूत्रकाराचा उल्लेख आहे म्हणजे हे दोघे भरतापूर्वी होऊन गले हे उघड आहे परतु त्याची सूत्रे आज उपलब्ध नाहीत त्यावेळी नाटकात स्त्रियाची कामे स्त्रियाच करीत असे पतजलीने सांगितले आहे स्त्रिया क्वचित् पुरुषाचाहि वेष घेत असत ऊर्वशीने पुरुषाचा वेष घेतल्याचा उल्लेख आहे पुढे स्मृतिकाळापासून नटाला तुच्छ मानू लागले असे दिसते श्राद्धाला नटाला बसवू नये असा निषेधपर उल्लेख स्मृतीत आढळतो बौद्धायन, मनु, व याज्ञवल्क्य यानी आणि विष्णु-पुराणानेहि असा निषेधपर उल्लेख केला आहे

प्राचीन काळी नाटकमंडळ्या नसाव्यात असे वाटते नाटक एखादा गुहेत होई, तेहि फक्त विशेष प्रसगानेच भवभूतीची नाटक मंडळी होती असे डॉ बेलवलकराचे म्हणणे आहे मुसलमान अमलापूर्वी पुष्कळ नाटक मडळ्या असाव्यात असे म्हणण्यास आधार आहे तेथून पुढे नाटके कमी होऊ लागली ”

श्री गा मा चिपळूणकर याचे ‘ नाटक मंडळ्या व नाटयशिक्षण ’ या विषयावर व्याख्यान झाले ते म्हणाले, “ नाटयसस्था या रात्रीच्या शाळा आहेत त्याचे सध्याचे धदेवाईक स्वरूप नष्ट होऊन शाळा-कॉलेजाप्रमाणे त्याना शैक्षणिक स्वरूप यावे नटानी नाटयशाळेची परीक्षा देऊन प्रमाणपत्र मिळविले पाहिजे त्यासाठी सर्व नाटक मडळ्याचे मिळून एकच मध्यवर्ति

नाट्य समाजाचे संस्थापक आणि संवर्धक श्री. अनंत वामन बरवे हे दि. २६ डिसेंबर १९२३ ला दिवंगत झाले. त्यांच्या मृत्यूपूर्वी थोडेच दिवस संमेलनाचे दुसरे चिटणीस श्री. सीतारामपंत जोशी यांच्यावरहि काळाची कुऱ्हाड पडली होती त्यामुळें श्री. बरवे अधिक खचले. कौटुंबिक अडचणींच्या विपत्तीचे चटके त्यांना सतत बसत होतेच परंतु तशाहि स्थितीत त्यांनी समाजाच्या कार्यांत खंड पडू दिला नाही. परंतु तेविसाव्या संमेलनानंतर मात्र ते अगदी अंथरुणाला खिळून होते आणि त्यातच पुढें त्यांचा अंत झाला. त्यांच्या मरणापूर्वी कांहीं दिवस समाजानें सहचिटणीस श्री. ग. कृ. बोडस यांच्यावर सर्व जबाबदारी सोपविण्यात येऊन समाजाचें दप्तर त्यांच्या स्वाधीन करण्यांत आलें. श्री. बरवे खंबीरपणें पाय रोवून उभे होते तोंपर्यंत भारत नाट्य समाजहि सर्व आपत्तींना टक्कर देत उभा होता. परंतु त्याचा पायाच उखडल्यावर तो जमीनदोस्त झाला तर नवल कसलें ?

यापुढेंहि १९२४ ते १९३८ पर्यंत संमेलनें भरतच राहिलीं. श्री. ग. कृ. बोडस प्रभृति कार्यकर्ते आणि सोगल बलवासारख्या उत्साही सभ्या यांच्या खटपटीनें संमेलन-कार्य अविरत चालू राहिलें; परंतु त्याच्यामागची ' समाजा 'ची प्रेरक शक्ति मात्र नाहींशी झाली होती. नांव फक्त उरलें होतें.


अध्यक्ष बाबासाहेब घोरपडे

# २०. सांगली
## १९२४

*इचलकरंजी संस्थानचे दानशूर व कलाप्रिय अधिपति. यांच्या मदतीनेच कितीतरी संस्था व व्यक्ती ऊर्जितावस्थेला आल्या.*

श्री. वरव व श्री जोशी हे समाजाचे दोनहि चिटणीस एका पाठोपाठ निधन पावले तरी श्री ग कृ बोडस याच्या खटपटीमुळे अगदी थोड्या अवधीतच संमेलनाचे अधिवेशन भरण्याची तयारी होऊ शकली महाराष्ट्र नाटक मंडळीने निमंत्रण दिले आणि सांगलीच्या सदासुख नाट्यगृहात संमेलनाचे २० वे अधिवेशन, दि १२ व १३ मे १९२४ या दिवशी पार पडले इचलकरंजीचे सुविद्य आणि प्रजाहितदक्ष अधिपति श्री बाबासाहेब घोरपडे यानी संमेलनाचे अध्यक्षस्थान मंडित केले होते

स्वागताध्यक्ष श्री नटवर्य गणपतराव बोडस यानी आपल्या स्वागतपर भाषणाच्या सुरवातीला कै वरव व जोशी याना श्रद्धांजलि अर्पण केली ते पुढे म्हणाले, सांगली व नाट्यकला याचे संबंध फार निकटचे आहेत असे असूनहि बऱ्याच नाटक मंडळयानी संमेलनाविषयी उदासीनता प्रकट करून सांगलीकराचा बराच हिरमोड केला आहे संमेलनापुढे करमणुकीच्या कराचा मोठा प्रश्न आहे आणि हा कर कायम होण्यास नाटक मंडळ्यांचे दुर्लक्ष कारणीभूत होत आहे या बाबतीत देशभक्त व संस्थानाधिपति यानी साहाय्य केले पाहिजे नाटक मंडळ्यानीहि आता संघटित झाले पाहिजे शेवटी भारतीय नाट्य समाजाच्या पुनरुज्जीवनासाठी द्रव्यबळाचे साह्य करण्याची कळकळीची विनंती करून श्री बोडस यानी आपले भाषण संपविले

## अध्यक्षीय भाषण

पूर्वीपासूनच आपले नाटकाकडे लक्ष आहे हें सांगताना श्री. बाबासाहेब म्हणाले, " कै. विष्णुदासाच्याविषयी मला आदर आहे. त्यांची व माझी प्रत्यक्ष भेट झाली होती. त्याचे स्मारक या सांगलीसच व्हावें अशी माझी इच्छा आहे. नाटयकला व संगीतकला या दोहींनाहि सुरवातीपासून राजाश्रय आहे व पाहिजे. त्याशिवाय त्या सुधारणार नाहीत.

नाटयकला पश्चिमेकडून आली असा लोकप्रवाद ऐकतो पण तो खरा नाही. काश्मीरचे पंडित दत्तात्रय हे लिहीत असलेल्या एका नाटयग्रथांत हा प्रवाद खोटा असल्याचे त्यांनीं सिद्ध केले आहे. नाटयकला ही प्राचीन व *या देशांतलीच आहे. हल्लींच्या स्थितीतून हिचा उद्धार होण्यास भारत* नाटय समाजासारखी संस्था असणें अवश्य आहे हें ठीक. परंतु समेलनाचे घटक जे नाटककार, प्रेक्षक, नट, मॅनेजर व सरकार या परस्परांत विरोध दिसतो. यांनीं सलोख्यानें घेतल्यास सर्वांचेंच हित होईल.

नाटकाच्या सिद्धीची जबाबदारी नटावर फार आहे, समाजासहि फॅशन्स व पोशाखाच्या विविध तऱ्हा या नटापासूनच प्राप्त होतात, अशा उपर्युक्त वर्गाची हेळसांड समाजानेंहि करू नये. नटांप्रमाणें नाटककारांवरहि ही जबाबदारी आहे. *परिस्थिति बदलली आहे तेव्हा पूर्वीचीच नाटकें त्याच स्वरूपांत लोकांना* आवडणार नाहीत. ती चटकदार, करमणूक करणारीं, व आटोपशीर असावीत." ऑस्ट्रियन सरकारने नाटयकलेला जें साह्य केलें त्याचा उल्लेख करून अध्यक्षानी नाटयकलेला राजाश्रयाप्रमाणें राजनियंत्रणाचीहि जरूरी असल्याचें आपलें मत सागितले. संमेलनाला त्यानी पुढील सूचना केल्या —

(१) स्त्रियाची कामें स्त्रियांनीच करावीत, (२) इग्रजी पद्धतीची, धांगडधिंगा घालणारी नाचाची पद्धत बद करून भारतीय नृत्यकलेचें दर्शन घडवावें, (३) तैलगू, बंगाली या भाषेंतील उत्तम नाटकें मराठी रंगभूमीवर आणावीत, (४) नाटयशिक्षणाच्या सस्था स्थापन कराव्यात आणि (५) हिंदी नाटके *करण्याची पद्धत चांगली नसल्यानें तीऐवजी मराठी नाटकेंच परप्रांतात न्यावीत.*

चिटणीसानी आपल्या अहवालात मागील वर्षांतील तीन दिवंगत नाटयसेवकाना *श्रद्धांजलि अर्पण केली ते नट म्हणजे* —

(१) नाट्यकलालंकारभूषण अनंत वामन वरवे, (२) सीताराम भास्कर जोशी, (३) गंधर्व नाटक मंडळींतील श्री. केशव भिकाजी देवधर. (४) राजापूरकर ना. मं. चे मॅनेजर श्री. काकासाहेब सहस्रबुद्धे व (५) नाट्यकला प्रसारक मंडळीतील श्री. गुरव.

वरवे यांना श्रद्धांजलि अर्पण करतांना कै. वरवे यांच्या कुटुंबाला मदत म्हणून वर्वे धर्मफंडाची योजना त्यानी सांगितली.

चर्चा व ठराव

संमेलनांत रा. ब. देवल याचें व्याख्यान व बावीस श्रुतींच्या हार्मोनियमचें प्रात्यक्षिक झालें.

(१) सरकारी करावद्दल नापसंती व्यक्त करून तो रद्द करावा, निदान निम्मा करावा याबद्दल सरकारला विनती करावी. यासंबंधी खटपट करण्यासाठी पुढील समिति नेमण्यात येत आहे.—

(१) श्री देशपांडे (महाराष्ट्र ना. म.), (२) श्री. वाघ (आर्यन सेनेमा), (३) श्री. बीरकर (आनंद सं. म.), (४) श्री. दातार (सोशल क्लब).

(२) भारत नाट्य समाजाची कचेरी सांगली येथे आणावी व श्री. स. आ. कुलकर्णी यांनीं चिटणीस म्हणून काम पहावें.

करमणूक

या संमेलनात मनोरजनाचे वरेच कार्यक्रम झाले. त्यात महाराष्ट्र ना. मंडळीचा 'शिवसंभव' नाट्यप्रयोग, श्री. मामा भट, श्री. वैशंपायन (महाराष्ट्र ना. मं.) व श्री रानडे (गंधर्व ना मं.) यांची अभिनयाची प्रात्यक्षिकें, हे कार्यक्रम होऊन श्री. भट व वैशंपायन याना नैपुण्याबद्दल बक्षिसें देण्यांत आलीं. श्री. धुं. गो. फाळके यानी लिहिलेल्या दोन प्रवेशाचें 'नाट्य-वाचन' झाले.

संमेलनाला उपस्थित असणान्या पाहुण्याना अध्यक्षांच्या वतीनें मेजवानी देण्यात आली.



अध्यक्ष : धु. गो. फाळके

# २१. कोल्हापूर
१९२६

मराठी चित्रपटसृष्टीचे जनक. *सत्यवान – सावित्री, भस्मासुर-मोहिनी या पहिल्या मूकपटांचे निर्माते आणि दिग्दर्शक.*

हे संमेलन मनोहर स्त्री-संगीत नाटक मंडळीच्या वतीने कोल्हापूर येथील पॅलेस थिएटरमध्ये (हल्लीच्या केशवराव भोसले नाट्यगृहात) दि. १८ जुलै १९२६ ला चित्रपटमहर्षि श्री. धुंडिराज गोविंद फाळके यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते.

अध्यक्षांनी आपल्या भाषणात नाट्यसंमेलने दरवर्षी भरत नाहीत आणि जी भरतात त्यांत चिकाटीने काही कार्य होत नाही याबद्दल विषाद व्यक्त केला व नाटक मंडळ्यांनी आस्थेने लक्ष घालून नाट्यकलेची सुधारणा करण्यासाठी प्रयत्न करावेत अशी सूचना केली सुधारणेसंबंधी त्यांनी आपल्या काही सूचना केल्या. नटांनी शुद्धाचरण व शुद्ध विचार यांचे पालन करून या ५ व्या वेदाचे—नाट्यशास्त्राचे अध्ययन करावे, नाट्यशाळेत नटांना शिक्षण मिळावे, इ. त्यांच्या सूचना होत्या. त्यांच्या भाषणातील काही सूचना आज मोठ्या गमतीच्या वाटतील. नटांनी ब्रह्मचर्याचे पालन करावे, शरीरसंबंध होणार होईतो नट मंडळीतच करावेत, पात्रयोजना ठरविताना सामुद्रिक शास्त्राचा उपयोग करावा इ. इ.

संमेलनात मंजूर झालेल्या ठरावात पूर्वीच्या ठरावांचीच पुन्हा उजळणी झाली. त्यात करमणुकीचा कर रद्द करावा, प्रयोगाचे परवाने मिळण्यासाठी एक मध्यवर्ति मंडळ नेमावे, मध्यप्रांत सरकारने अनुकरण करून मुंबई सरकारने जप्त नाटकांवरील बंदी उठवावी इ. ठराव होते.

समेलनाध्यक्ष श्री फाळके याना हा समेलनाचा उपक्रम फार पसत पडला आणि त्यातून पुढे नाट्यकलेला उपकारक अशा कार्याची आखणी व्हावी यासाठी त्यानी मनापासून खटपट केली पुढील (म्हणज २२ व्या) समेलनासाठी म्हणून त्यानी अनक सूचना 'चाबूकस्वार' पत्रात प्रसिद्ध केल्या होत्या नाट्यसमेलनाचा अध्यक्ष नाटकमडळीतील असावा समेलन मे महिन्यात भरवावे नटाची परीक्षा घण्यासाठी निरनिराळ्या मडळ्यातील नटवर्गांनी सौभद्र नाटकातील भूमिका करून दाखवाव्या नतर निवडक सचात तेच नाटक करून दाखवावे इत्यादि सूचना या पत्रकात आहेत

तथापि श्री फाळके यानी तळमळीने केलेल्या या सूचनाकडे पुढील समेलनात फारसे लक्ष देण्यात आले नसावे असे त्या समेलनाच्या अहवालावरून वाटते

---

# २२. पुणे

१९२७



अध्यक्ष श्री नी चाफेकर

डेक्कन कॉलिज व फर्ग्युसन कॉलिज येथील मराठीचे प्राध्यापक : संस्कृत व मराठी भाषेचे पंडित • व्युत्पन्न कवि व पट्टीचे वक्ते.

माजी अध्यक्षाच्या सूचनेनुसार २२ वे संमेलन मे महिन्यात न भरता जुलै महिन्याच्या १० व ११ तारखेस पुण्यास भरले संमेलनाचे निमंत्रण बाल्नटाच्या आनंद म ना मं ने दिले होते आणि अध्यक्षपदी प्रा श्रीकृष्ण नीळकंठ चाफेकर यांची पुन्हा एकदा निवड करण्यात आली होती

संमेलनापूर्वी मौज व ज्ञानप्रकाश या वृत्तपत्रानी संमेलनाला काही सूचन केल्या होत्या मराठी नाटकाची जी गळचेपी सरकारकडून होत आहे ते थांबवावी, मराठी नाटकमंडळ्यांचा हिंदी व उर्दू नाटकाकडे अधिकाधि कल होत आहे त्यासंबंधी विचार व्हावा, परवानगी मिळण्यातील अडचणी दूर व्हाव्यात, मराठी नाट्यकलेचा समग्र इतिहास लिहिला जावा, इ सूचन

मडळयाच्या फाटाफुटी, स्त्रियाच्या भूमिका इ विषयासबधी आपली मते सागून अध्यक्षानी आपल भाषण सपविले

समेलनातील चर्चेत श्री अच्युतराव कोल्हटकर श्री दत्तोपत सारोळकर, प्रा जोग प्रा पाटणकर, प्रा सवनीस यानी भाग घेतला

करमणुकीच्या कार्यक्रमात आनद सगीत मडळीने 'सिहाचा छावा' हा नाट्यप्रयोग करून दाखविला श्री अच्युतराव कोल्हटकर याच्या हस्ते त्या मडळीला सुवणपदक व अभिमन्यूची भूमिका करणाऱ्या बालनटास चादीची बपबशी देण्यात आली

## २३. मुंबई
१९२८



अध्यक्ष सौ गिरिजाबाई केळकर

*ज्या काळात बायकांना नाटक लिहिणें ही एक अघटित घटना समजली जात होती, त्या काळात म्हणजे १९१३ च्या सुमारास 'पुरुषाचें बंड' सारख्या विवाद्य विषयावर यांनी नाटक लिहिलें. निर्भीड, समाधीटपणा, बुद्धीचें चापल्य हे त्याचे विशेष गुण होत.*

हें संमेलन श्री रघुवीर सावरकर याच्या 'रंगबोधेच्छु' समाजाच्या वतीनं दि २८ मे १९२८ ला मुंबई येथें भरलें होत संमेलनाची व्यवस्था पाहण्याची कामगिरी श्री अच्युतराव कोल्हटकर यानी स्वीकारली होती प्रसिद्ध लेखिका सौ गिरिजाबाई केळकर याची अध्यक्ष म्हणून निवड करण्यात आली होती संमेलनाचा प्रारंभ झाल्यापासून सुमारें २५ वर्षांनंतर एका महिलेला अध्यक्षपदाचा बहुमान मिळाला,

सौ केळकर यानी आपल्याला निवडून देण्यात बंधुवर्गानें जी गुणग्राहकता व्यक्त केली त्याबद्दल आभार मानून नाटकाची परपरा व तिच प्राचीनत्व कथन केल गल्या काही वर्षात परिस्थितीत जो बदल चाला त्याच वर्णन करताना त्या म्हणाल्या, ' आता सभ्य व सुशिक्षित लोक नाटकात जाऊ लागले आहेत नटवर्गाला पूर्वीप्रमाणे अस्पृश्य किंवा कमी दर्जाचे मानल जात नाही मात्र नटवर्ग हा रंगभूमीवर नाटकी असला तरी इतर वेळीं उत्तम नागरिक म्हणवून घेण्यासाठी त्याने शक्य तेवढी खबरदारी घेतली पाहिजे'

याबरोबरच नाट्यव्यवसायात ज्या अनिष्ट गोष्टींचा प्रादुर्भाव झाला त्यात दुही, अभिनयाच्या बाबतीत अनभिज्ञता उर्दू नाटक मंडळ्यांच्या अनुकरणाची प्रवृत्ति या गोष्टींचा अध्यक्षानी निर्देश केला त्या पुढे म्हणाल्या 'अलीकडच्या नाटकातून जे बीभत्स प्रकार व ग्राम्य विनोद दृष्टीस पडतो

तो पाहून लेखकाना सत्यसृष्टीची जाणीव नसावी असे वाटते विद्यार्थी-विद्यार्थिनीची नीतिमत्ता वाढवून त्याना कर्तव्यतत्पर बनविणारी चित्रेंहि रगभूमीवर यावयास पाहिजेत

नवरसापैकी शृगाररस शक्य तितका कमी ठेवण्याची नाटककारानी काळजी घ्यावी त्यात पाश्चात्याचे अधानुकरण नसावे ! स्त्रियाच्या भूमिकासबधी त्या म्हणाल्या, " आम्ही हिंदू लोक स्त्री ही पूजनीय व वदनीय मानतो व पुरुषापेक्षा वरिष्ठ समजतो," पाश्चात्याप्रमाणे तिला बरोबरीची समजत नाही अशा स्त्रीला घराबाहेरच्या विषारी वातावरणात आणून तिच्यातील स्त्रीत्व नष्ट करण्याची ही कल्पना कोणाहि सहृदय माणसाला मान्य होणार नाही स्त्रियाच्या साहाय्याशिवाय आपली रगभूमि चालली पाहिजे व उत्तम नागरिक असलेले पुरुषच नट झाले पाहिजेत स्त्री-नटाशिवाय नाटकाला रग कसा चढविता येतो हे आपल्याला बालगधर्व, सावकार, पोतनीस, दीनानाथ, भाटेबुवा, इ नटानी दाखविले आहेच, मग त्यात स्त्रिया कशाला ? पूर्व व पश्चिमेतील अतर लक्षात घेऊन नटीचा प्रश्न आपण डोळ्यापुढून काढूनच टाकावा ! " नटवर्गाला उद्देशून त्या म्हणाल्या," सुशीलपणा व सुशिक्षितपणा उत्तम शिक्षणाशिवाय नटाचे अगी येणे शक्य नाही नाटकात येणारी माणसे बहुसख्येने अशिक्षित वर्गातूनच येतात त्याच्या शिक्षणाची काळजी मडळीच्या मालकाने घेतली पाहिजे होतकरू नटानी नाट्याचा बसून अभ्यास केला



अध्यक्ष : बालगंधर्व

## २४. पुणें

१९२९

*आपल्या स्त्रीभूमिकांमुळें व गंधर्वतुल्य गायनामुळें बालगंधर्वांनी महाराष्ट्राला जवळजवळ पन्नास वर्षे मंत्रमुग्ध केलें होतें. गंधर्व नाटक मंडळीचे मालक.*

हें संमेलन २१ जून १९२९ ला बालमोहन नाटक मंडळीच्या विद्यमानें पुणें येथील विजयानंद नाटकगृहांत साजरें झालें. हें संमेलन अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण होतें. संमेलनाच्या अध्यक्षपदावर श्री. नारायण श्रीपाद राजहंस उर्फ बालगंधर्व यांची निवड झाली होती. यापूर्वी श्री. मुजुमदार व श्री. य. न. टिपणीस या रंगभूमीवर यशस्वी भूमिका केलेल्या नटांना अध्यक्षपदाचा मान मिळाला होता. परंतु मराठी रंगभूमीवर अनेक वर्षे एकछत्री अंमल गाजवणाऱ्या बालगंधर्वांची निवड या वेळी झाल्यामुळें संमेलनाविषयी विलक्षण आकर्षण निर्माण झालें होतें. श्री. बालगंधर्वांविषयी बहुजनसमाजांत जें कुतूहल होतें त्याची तृप्ति करण्यासाठी संमेलनाला विद्यार्थीवर्गहि मोठ्या प्रमाणात

वर्षे पुरी झाली आहेत, या अवधीत मराठी नाटके लोकांचे मनोरंजन करीत आहेत. नाटकाची सुरवात होऊन ५० वर्षे लोटली असली तरी नाट्य-संमेलनाचा प्रारंभ होऊन मात्र २५ च वर्षे झाली आहेत. आधी नाटक आणि नंतर नाट्यसंमेलन हा नैसर्गिक क्रम आहे. नटवर्ग आणि प्रेक्षक यांनी एकत्र येऊन विचारविनिमय करावा हाच संमेलनाचा उद्देश आहे."

स्वागताध्यक्ष श्री जगन्नाथमहाराज यांच्या भाषणानंतर श्री अण्णा साहेब कारखानीस यांनी अध्यक्षांची ओळख करून देऊन त्यांना अध्यक्ष-स्थान स्वीकारण्याची विनंती केली.

## करमणूक

या कार्यक्रमात बालमोहन ना  म तील नटांनी केलेला 'कर्दनकाळ' नाटकातील प्रवेश व श्री  मरपानदार (आयन फिल्म कं) यांच्या नकला झाल्या

समारोपादाखल अध्यक्षांचे छोटेसे भाषण होऊन संमेलनाचा कार्यक्रम समाप्त झाला

—



अध्यक्ष अ ह गद्रे

## २५. मुंबई
### १९३०

'केसरी'चे चतुर बातमीदार, 'मौज' वर्तमानपत्राचे आद्य संपादक आणि नाटिकाकार. हरिजनोद्धारक कार्याचे निष्ठावंत प्रचारक.

नाट्यसमेल्नाचें हे पंचविसावे म्हणजे रौप्यमहोत्सवी अधिवेशन, मोठ्या थाटामाटाने व भव्य प्रमाणावर साजरें व्हावयास हवे होते नाट्यसंमेलनाच्या मार्गक्रमणातील एका महत्वाच्या टप्प्यावर आल्यानंतर तत्पूर्व कार्याचे विहंगमालोकन करून पुढील मार्गावर कोणत्या दिशेनें वाटचाल करावयाची याची पद्धतशीर आखणी करणे हे अवश्य होते परंतु हें संमेलन अगदी वेगळ्या अर्थाने 'अपूर्व' ठरलें संमेलनाचा सारा कारभार अवघ्या तीन तासात उरकण्यात आला संमेलनाच्या कार्याचा रथच अगदी उलट दिशेला फिरल्याचे विपरीत दृश्य या संमेलनात दिसून आले

हें संमेलन मुंबई येथील बॉम्बे थिएटरमध्यें दि ५ सप्टेंबर १९३० ला भरले होते संमेलनाची व्यवस्था बाल्मोहन ना म ने च स्वीकारली होती संमेलनाचे अध्यक्ष श्री अनंत हरि गद्रे होते

संमेलनाचे नियोजित स्वागताध्यक्ष डॉ विनायक बापूजी निलोवकर हे वेळेवर उपस्थित राहू न शकल्यामुळें त्यांचे काम श्री अच्युतराव कोल्हटकर यांनी पार पाडलें 'संमेलनाचे अध्यक्ष श्री अनंतराव गद्रे यांनी २।–२॥ तासात संपणाऱ्या लघुनाटकाचा किंवा नाटिकेचा नवा संप्रदाय महाराष्ट्रात सुरू करून तो रंगभूमीवर यशस्वी करून दाखविला याच्या गौरवार्थ त्यांना अध्यक्षपदाचा बहुमान देण्यात आला आहे' असे स्वागताध्यक्षांनी सांगितले



अध्यक्ष ना रा वामणगावकर

# २६. मुंबई
## १९३३

विदर्भातील एक धडाडीचे वृत्तपत्रकार 'आत्मतेज' या नाटकाचे लेखक उदय या नियतकालिकाचे संपादक.

१९३० मध्ये भरलेलं औटघटकेच पचविसाव समल्न झाल्यानतर मध्यतरी ३ वर्षांचा कालावधि जाऊन १९३३ मध्यें २६ व समलन भरल आणि पूर्वीच्या समल्नाच्या पावलावर पाऊल टाकीत आटोपल हे समेल्न मुबई यथील बॉम्ब थिएटरात आनद स ना म ने दि १६ जून १९३३ ला भरविल उमरावतीचे श्री नारायण रामलिंग बामणगावकर हे समेलनाचे अध्यक्ष होते

१९३१ पासून महाराष्ट्रात बोलपटाच युग सुरू झाल्यामुळें मराठी नाटका विषयी आपुल्की बाळगणाऱ्या रसिकाच्यासमोर मोठी आपत्ति उभी राहिनी नाटयसमलनान या बाबतीत दूर दृष्टीन पावले टाकावीत अशी अपक्षा तत्कालीन वृत्तपत्रात काही नाटयाभिमानी लाकानी व्यक्त केलेली आढळते दि १५ जून १९३३ च्या 'मौज' मध्यें श्री रा. गा भिड यानी आपल्या लेखात नवीनच सुरू झालेले श्री गद्रे याच 'नाटिकायुग आणि बोलपटाचे आक्रमण याचा उल्लेख करून पूर्वीची रात्रभर चालणारी नाटक बद करून अल्पवेळात बोल्पटाप्रमाणे भरपूर करमणूक करणाऱ्या छोटया नाटिकाचा प्रचार करावा' अशी सूचना केली याच सुमारास रगभूमीवर 'मन्वन्तर' धडवून आणण्याचा सकल्प करून त्या दिशन श्री केशवराव दाते प्रभृतीच प्रयत्न सुरू झाले होते, हे लक्षात घऊन श्री भिड यानी अशी

अपेक्षा व्यक्त केली कीं, "रंगभूमीवर नव्या मनूची सुरुवात होण्याच्या वेळेस हें संमेलन येत आहे. यावेळीं त्याचें कौशल्यानें नेतृत्व केल्यास तें रंगभूमीच्या विकासास चांगली मदत करील यात संशय नाही."

'श्री. नाट्यसेवक' यानी याच अंकांत संमेलनाला पुढील सूचना केल्या–

(१) *संमेलनाची बैठक वर्षातून एकापेक्षां अधिक दिवस भरत जावी.* (२) संमेलनांत नुसती विद्वत्ताप्रचुर भाषणें न होतां नाटयकला व नाट्यव्यवसाय या दृष्टीनें साधकबाधक चर्चा व्हावी. (३) प्रसिद्ध नाटकाचे बोलपट घ्यावेत. (४) नाटक मंडळ्या, नट, नाटककार व नाट्यप्रेमी यांचे प्रतिनिधि मिळून १५ जणांचें मध्यवर्ति मंडळ स्थापावें व त्याचें कामकाज कॉंग्रेस वर्किंग कमिटीप्रमाणें चालावें. (५) नाट्यविद्यालयाची स्थापना करावी. इ. इ.

*या प्रकारच्या विचारांच्या पार्श्वभूमीवर संमेलनाला प्रारंभ झाला. डॉ.* मो. वा. वेलकर स्वागतपर भाषणात म्हणाले की स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनी कराव्यात पण त्या उत्सवप्रसंगीच कराव्यात. धंदेवाईक कंपन्यांतून करू नयेत. नाटिकासंप्रदायाचे प्रवर्तक श्री. गद्रे यांचें अभिनंदन करून श्री. वेलकर यांनी रंगभूमीचें करमणूक हें वैशिष्ट्य नसून लोकशिक्षण हें आहे असे सांगितलें.

## अध्यक्षीय भाषण

नाट्याचें स्वरूप सांगताना अध्यक्ष श्री. वामणगांवकर म्हणाले, " भरतमुनीनी नाट्याचा कर्ता ब्रह्मदेव मानला तरी निसर्गतः नाट्य हे मनुष्य-*स्वभावांतच आहे या मूळ कल्पनेला काही बाध येत नाही.* भारतीय नाट्य-शास्त्राचे पर्यवसान मोह – आनंद – यांत असावें असा नियम घातला आहे. *'ब्रह्म सत्य जगन्मिथ्या' या संन्यस्तवृत्तीची जाणीव करून देण्यासाठी या* शास्त्राचा जन्म नाही. आनंद हाच अखेरचा सिद्धांत आहे. हा आनंद व्यक्त करण्याची रीत ते 'नाट्य' होय. हृदय व्यक्त करण्यासाठीं त्यात भाषा आली. अर्थात् या भाषणातसुद्धां नाट्य आहे. नाटक हा प्रत्यक्ष संसार नसून त्याचें चित्र आहे; त्यामुळें सृष्टीतील घडामोडींचा देखावा प्रेक्षकाच्या हृदयावर बिंबवण्यासाठी चित्रकला, काव्य, प्रतिभा, अभिनयपटुत्व इत्यादींचा समावेश होतो. या सर्वांचा संयोग ज्यांत दिसतो ते नाटक होय.

नाट्यशास्त्राचा व उपलब्ध संस्कृत नाटकांचा बारकाईने अभ्यास केला म्हणजे सदर नाटके ही समाजाच्या विशिष्ट वर्गाकरताच झालेली असावीत, चारहि वर्णांच्यासाठी नसावीत असं वाटतं पण हा दोष नाट्यशास्त्राचा नसून परिस्थितीचा आहे जुन्या काळची नाटके राजाश्रयानेच सादर केली जात असल्याने त्यात विशिष्ट वर्गाचीच अभिरुचि अधिक प्रमाणात व्यक्त झालेली आढळते युरोपातील नाट्यकलेत राजा व लोक या दोहोंचा आश्रय असल्याने तीत मानवी जीवनाचे अनेकविध स्वरूप प्रकट झालेले आहे त्यातहि वर्गीकरणाचा दोष आहेच पण तो कमी प्रमाणात आहे एवढेच

वर्गाश्रयामुळे अर्थातच नाटकास मर्यादा पडल्या तथापि 'रसप्राधान्य' या काव्यतत्त्वाची जोड त्यास मिळाल्यामुळे उदात्त भावनांचा त्यात सहज उठाव होतो कथानकाचा शेवट आनंदपर्यवसायी किंवा दुःखपर्यवसायी असला तरी त्यात कलेचा शेवट आनंदातच होत असतो (येथे हॅम्लेट व उत्तरराम चरित' यांची अध्यक्षांनी उदाहरणे दिली) म्हणून आनंद हा कलेचा आत्मा होऊन बसला दशरूपकारांनी मात्र याच अर्थाने 'रूपक' अशी अन्वर्थक संज्ञा दिली आहे "

संस्कृतिभिन्नत्वामुळे पाश्चात्य नाटक स्वभावपरिपोष करणारी असली तरी पौर्वात्य नाटके रसपरिपोष करणारी ठरली हे सांगितल्यानंतर अध्यक्ष महाराष्ट्र रंगभूमीकडे वळले विष्णुदास भावे यांच्यापासून सुरू झालेल्या रंगभूमीच्या इतिहासाचे त्यांनी किर्लोस्कर, कोल्हटकर, खाडिलकर व गडकरी असे चार कालखंड पाडून प्रत्येक युगाची वैशिष्ट्ये सांगितली त्या काळाबद्दल अध्यक्ष म्हणाले, "उत्तम नाटक, त्यांना उठाव आणणारे व त्यातील भूमिकाशी तादात्म्य पावणारे नट, नटांना खुलविणारा योग्य देखावे व पोषाख यांचा उत्तरोत्तर सुकाळ होत जाऊन मराठी रंगभूमीचे वैभव वाढत गेले'

रंगभूमीला उतरती कळा लागण्याची अध्यक्षांनी दोन कारणे सांगितली– (१) बोलपटाच्या आपत्तीला तोंड देण्यासाठी नाटकांची चपाट्याने निपज होऊ लागली व ती पूर्वीसारखी सपन्न नसल्याने रंगभूमीचा दर्जा खालावला (२) नटांना बोलपट हे नवीन क्षेत्र मिळाल्यामुळे रंगभूमीवर चांगल्या नटांची वाण भासू लागली

नाट्यकला पूर्ववत् प्रभावी होण्यासाठी स्त्रियांनी रंगभूमीवर येणे नाविन्य

प्रयोग सुरू करणे, रसिकमंडळांनीं फक्त केवळ नाटकेंच रंगभूमीवर आणणे इ. जे उपाय सुचविले जात होते त्याचा अध्यक्षांनी परामर्श घेतला. शेवटीं उत्तम नट शिकवून तयार करणें, त्याच्यासाठीं नाटयशाळा स्थापणें, उत्तम नाटकें लिहवून घेणें हे उपाय सांगून अध्यक्षांनीं आपलें भाषण संपविलें. कांहीं उपस्थित व्यक्तींचीं भाषणें झाल्यानंतर रंगभूमीवर भूमिका करणाऱ्या स्त्रियांचे अभिनंदन करणारा ठराव मंजूर करण्यांत आला. अध्यक्षांनीं समारोपाच्या भाषणांत उत्तम नटांची परंपरा कायम राहण्यासाठीं मध्यवर्ति शाळा स्थापन करावी असें पुन: सुचविलें.

करमणुकीच्या कार्यक्रमांत आनंद स. म. तील बालनटांनीं डॉ. म्हैसाळकर-कृत ‘ प्रजेचा राजा ’ या नाटकाचा प्रयोग केला.



श्रीयुत गोविंदराव टेंबे

## २७. पुणें

१९३५

संगीत आणि साहित्य या बाबतीत महाराष्ट्राच्या कला-जीवनात अलौकिक स्थान मिळविणारे रसिक नट, नाटककार, गायक आणि अद्वितीय पेटीवादक

आहे आता त्याच्यात ही प्रेरणा बळावण्यास सिनेमा व सिनेमामुळे निर्माण झालेली आर्थिक कोंडी कारणीभूत झाली हे खरे परंतु त्याचा परिणाम मात्र नाटयसंस्थांच्या ऱ्हासात झाला दूरदर्शीपणाचा अभाव हेहि एक कारण आपल्याला सांगता येईल

या परिस्थितीमध्यें मला सुचणारे उपाय पुढीलप्रमाणें आहेत—

(१) कोणतीहि नाटयसंस्था धद्याला बळी पडू न देणें,

(२) कॉलेजातून नाटयमंडळ्या स्थापन करून त्यात स्त्री-पुरुष विद्यार्थ्यांनी भाग घेणें व या विद्यार्थ्यांसाठी नाटयशिक्षणाची सोय करणें.

(३) नगरपालिकांनी सुसज्ज नाटयमंदिरें बांधून तीं केवळ नाटय-प्रयोगाकरताच राखून ठेवणें

(४) नगरपालिकांनी नगर नाटयसंस्था स्थापणें

(५) सुशिक्षित नागरिकांनी नाटयमंडळें स्थापून त्यात स्त्री-पुरुष नागरिकांनी भाग घेणें

(६) नागरिक कुलस्त्रियांनी मंगलप्रसंगी घरगुती नाटयप्रयोग करणें

(७) धंदेवाईक नाटक मंडळ्यांनी आपल्या संस्थेंत स्त्रियांचा भरणा करणें,

(८) नाटकाचे प्रकार, जाती व क्षेत्र ठरविणें,

(९) नाटयकला ही इतर प्रतिष्ठित कलांइतकीच प्रतिष्ठित कला आहे धनोत्पादनाचा तो धंदा नव्हे, उलट, अंतःकरण हलविणारें, बुद्धीला चालना देणारें आणि जीविताला सौंदर्य देणारें असें तें वेदतुल्य निर्मळ साधन आहे अशी समाजाला जाणीव करून देणें ”

## निबंधवाचन

या संमेलनात पुढील निबंधाचें वाचन झालें —

श्री तळेकर — ‘नाटयसंस्था सुरक्षित व कार्यक्षम करण्याचे उपाय’ ( हा निबंध उपलब्ध झाला नाही ).

(२) डॉ न का घारपुरे — सिनेमामुळेंच नाटयसंस्थांचा ऱ्हास झाला काय ’

डॉ घारपुरे यांच्या मतें सिनेमामुळें नाटकधंद्याचें पाऊल मागें पडलें हे खरें परंतु त्याच्यामुळें ऱ्हास झाला असं म्हणता येत नाही हा ऱ्हास याव-

विण्याचे उपाय— (१) नाट्यविद्येचे शिक्षण घेऊन तयार झालेल्या नटांना पुरवठा करणे, (२) पात्रानुरूप नटनटींची कामापुरती पगारावर योजना करणे व (३) स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांना करणे, हे आहेत

## चर्चा व ठराव

संमेलनात मंजूर झालेले ठराव—

(१) कै. अण्णासाहेब किर्लोस्कर-सप्ताहाची योजना (२) शिक्षण संस्थांतून नाट्यमंडळें स्थापन करण्याची शिफारस (३) नगरसंस्थांना अद्ययावत् नाट्यमंदिरें बांधून ती केवळ नाटकांपुरतीच राखून ठेवण्याची विनंती

या ठरावावरील चर्चेत श्री. शंकरराव मुजुमदार, नाटककार श्री. माधवराव जोशी, श्री. अ. ह. गद्रे, श्री. आवेकर इ. मंडळींनी भाग घेतला

अध्यक्षीय समारोप व आभारप्रदर्शन होऊन संमेलन समाप्त झाले

अध्यक्षीय भाषण

श्री श प जोशी आपल्या भाषणात म्हणाले, "नाटककम्पन्यांचा ऱ्हास होण्यास इतर अनेक कारणांबरोबरच नाट्यसंस्थांचे बेसुमार खर्च आणि नाटकमंडळ्यांच्या चालकांचे दुराग्रह ही आणखी कारणे आहेत' यावर श्री जोशी यांनी पुढील उपाय सुचविले

(१) सुंदर नाटिका किंवा नृत्यगायनसंमिश्रित उच्च दर्जाचे नाटकी जलसे या दोन स्वरूपातच आमचे नाट्य सार्वजनिकरीत्या जिवंत ठेवता येईल

(२) नाट्यकलेशी सुविद्य लोक ज्या प्रमाणात निगडित होतील त्या प्रमाणात नाट्यकलेला चांगले दिवस आले असे म्हणता येईल" आपल्या भाषणाच्या शेवटी, 'यापुढे स्त्रियांनी नाटकात अवश्य कामे केली पाहिजेत' असे अध्यक्षांनी सुचविले

# २९. पुणें

## १९३८



अध्यक्ष : मा वि वरेरकर

*प्रसिद्ध नाटककार आणि कादंबरीकार. रंगभूमीवरील नवीनतेचे आद्य आणि सक्रिय प्रचारक : 'पद्मविभूषण' हा गौरव संपादन करणारे पहिले मराठी साहित्यिक.*

हे संमेलन पुणे येथील 'सोशल क्लब' च्या जागेत सोशल क्लबनेच अभिनव नाट्यमंडळाच्या सहकार्याने दि १४ व १५ मे १९३८ या दिवशी भरविले होते अध्यक्ष श्री भार्गवराव विठ्ठल ऊर्फ मामा वरेरकर हे होते

कार्याध्यक्ष डॉ घारपुरे यानी आपल्या प्रास्ताविक भाषणात भारत नाट्य समाज व नाट्यसमेलने याचा थोडक्यात इतिहास सागून नाट्यकला आणि नाट्यसमेलने या दोहोचीहि परिस्थिति कशी खालावत चालली आहे याचे वणन केले

स्वागताध्यक्ष श्रीमती शकुतलाबाई पराजपे म्हणाल्या, "बाळपणापासून मला नाट्यकलेची आवड आहे, परतु तिची तृप्ति मात्र परदशात गेल्यावर झाली तेथें मला फ्रेंच रगभूमि सर्वांत पसत पडली, याचे कारण फ्रेंच नाटकातून आढळणारा सात्विक विनोद से होय महाराष्ट्रात स्वतत्रपणे लिहिलेली नाटकें फारच थोडी आहेत निम्म्याहून अधिक नाटके पाश्चात्यापासून घतलेली आहेत आपल्या नाटकातील विनोदहि हलक्या दर्जाचा आहे

मराठी नाटकात आणखी एक प्रकार शिरू पहात आहे आणि तो म्हणजे पात्राच्या तोंडी इग्रजी शब्द अधिक प्रमाणात येत चालले आहेत हा होय ही प्रथा योग्य नाहीं नाटक हे समाजस्थितीचें चित्र आहे, तरी त्यातील वास्तवता ही कोठवर रेखाटायची ? हीच गोष्ट नटाच्या पोपाखाबाबतहि आढळते

लेखक कसलेला असेल तरच नाटक यशस्वी होतें. अभिनय, वक्तृत्व व व संगीत यांचे धडे देणाऱ्या शाळा निघाल्या पाहिजेत. नाटकांतून स्त्रियांच्या भूमिकाहि स्त्रियांनीच कराव्यात असें मला वाटतें."

## अध्यक्षीय भाषणांतील मुद्दे

अध्यक्ष श्री. वरेरकर यांनीं मराठी रंगभूमीच्या अवनतीची पुढील कारणें सांगितली —

(१) चित्रपट आणि बोलपट ह्या नवीन करमणुकीच्या साधनाचा हिंदुस्थानात प्रवेश.

(२) वृत्तपत्रांनी केलेले नाटक कंपनीतल्या नटांचे बेसुमार चोचले,

(३) नटवर्गांतील संघटनेचा अभाव.

(४) गुजराथी-मराठी व कानडी-मराठी वाद.

(५) रंगभूमीवरील भांडवलवाल्यांचें वर्चस्व, आणि

*(६) ग्रामोफोन व रेडियो या साधनांची वाढ व लोकप्रियता.*

गेलेल्या या नाटयकलेची विविध कारणामुळें कसकशी रूपें बदलत गेली याची कल्पना येईल " असे उद्‌गार काढले.

करमणुकीच्या कार्यक्रमांत श्री. मा. ना. जोशी यांनीं लिहिलेल्या 'प्रेमळ लफंगे' या नाटकाचा प्रयोग झाला.

या अधिवेशनाबरोबरच संमेलनाचें पूर्वस्वरूप बहुवंशी बदलून गेलें. 'भारत नाटय समाज' या लुप्तप्राय मध्यवर्ति संस्थेची पुढील नाटयसमेलनांत नव्याने उभारणी होऊन '*महाराष्ट्र नाटय संमेलन*' *या नांवानें त्या संस्थेचें* कार्य पुन्हा सुरू करण्यांत आलें. या फेरबदलाची सर्व मांडणी नागपूरच्या अधिवेशनांत करण्यांत आली.



अध्यक्ष त्र्य मा कारखानीस

# ३०. नागपूर

१९३९

महाराष्ट्र नाटकमंडळीचे एक संस्थापक. नाटयशास्त्राचे व्यासंगी. नाटकाचे दिग्दर्शक.

नाटयसमेलनाच्या इतिहासात या नागपूर अधिवेशनाचे कार्य फार महत्त्वाचे आहे नाटयसंमेलनाचे नामाभिधान,त्याना आधारभूत अशा नव्या मध्यवर्ति संस्थेची प्रतिष्ठापना, तिच्या कार्यपद्धतीचे नियम, नवीन कार्यकारी मंडळाची निवड इ सबधी या समेल्नात अनेक दूरपरिणामी स्वरूपाचे निर्णय घेण्यात आले आणि १९०५ मध्यें ज्या समेल्नाचा श्रीगणेशा करण्यात आला त्याला परिस्थित्यनुरूप नव्या, भरभक्कम पायावर उभें करून त्याला आधार म्हणून मराठी रंगभूमीला नवे वळण देण्याची मनीषा बाळगणाऱ्या महत्त्वाकांक्षी केंद्रीय शक्तीची मोठ्या उत्साहाने उभारणी करण्यात आली आज मराठी नाटय-परिषदेचे जें व्यापक आणि 'विविध कार्यमग्न' असे स्वरूप सिद्ध होत आहे त्याचा सकल्प या अधिवेशनात सोडण्यात आला

हे अधिवेशन नागपूर येथील अभिनव नाटयमंदिराच्या विद्यमान दि १३, १४ व १५ जानेवारी १९३९ या दिवशी साजरें झाले समेल्नाचे अध्यक्षस्थान श्री. त्र्यंबक सीताराम ऊर्फ अण्णासाहेब कारखानीस यानी स्वीकारले होत

ईशस्तवन व स्वागतगीत झाल्यानतर समेल्नाच स्वागताध्यक्ष ॲडव्होकेट तु ज केदार यानी छापील भाषण वाचून न दाखवता उत्स्फूर्त भाषण केले उप-स्थिताचे स्वागत करून मध्यप्रातातील आणि विशेषत नागपुरातील रंगभूमीच्या इतिहासाचा आणि हौशी नाटयसस्थांच्या कार्याचा त्यानी आढावा घेतला

श्री. पढरीपांडे यांनी अध्यक्षीय सूचना केल्यानंतर अध्यक्ष श्री. अण्णासाहेब सारस्वानीस स्थानापन्न झाले.

## रंगभूमीची विश्वव्यापी पीछेहाट

कै. दादासाहेब खापर्डे, कै. नं. बा. मुजुमदार आणि कै. ज. बा. बरवे यांनी केलेल्या नाट्यसेवेचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करून अध्यक्षांनीं रंगभूमीच्या चालू पीछेहाटीची चर्चा केली. ते म्हणाले, "ही पीछेहाट केवळ महाराष्ट्रीय रंगभूमीपुरतीच मर्यादित नसून तिचें स्वरूप विश्वव्यापी आहे. चित्रपटाच्या *आक्रमणामुळें रंगभूमीची प्रगति खुंटली असून ती आता नष्ट होण्याच्या* मार्गाला लागली आहे असें कांही आक्षेपकाचें म्हणणें आहे. परंतु रंगभूमीवरील खरी आपत्ति ही नसून रंगभूमि आपलें स्वत्व टाकून सिनेमाच्या वैभवाला व संपन्नतेला भाळून त्याच्या आहारीं जाऊ लागणें ही आहे. म्हणजे या आपत्तीचें स्वरूप आपणाला वाटतें तसें बाह्य नसून तें अंतर्गत आहे.

रंगभूमीवरील नटांनी सिनेमाच्या आहारीं जाऊन आपल्या रंगभूमीला केविलवाणी विपन्नावस्था आणू नये. रंगभूमि व सिनेमा ही अगदी भिन्न अशी, विशिष्ट कार्यें करणारी क्षेत्रें आहेत. हीं दोन्ही क्षेत्रें आपापल्यापरीनें आणि आपापल्या फलपुष्पानीं नेहमीं फुललेली राहावींत ......

नाटककारांनी बदलत्या काळाला धरून अर्वाचीन प्रश्नासंबंधीं विचार करणारी नाटकें लिहावयास पाहिजेत. लोकांतील रंगभूमीची आवड पूर्वी-इतकीच आताहि कायम आहे "

मध्या चालू असलेल्या नाट्यविषयक विस्कळित प्रयत्नाचा आढावा घेताना अध्यक्ष म्हणाले, " हे सर्व प्रयत्न स्वतंत्रपणें, अलग अलग व मर्यादित स्वरूपांत चालले आहेत तरी त्यांनी चैतन्याचा स्फुल्लिंग कायम ठेवला आहे. त्यावरील राख नाहींशी होण्यासाठी जोराची वावटळ उठविली पाहिजे. ती केव्हांतरी उठेलच अशा वावटळी राजकीय, सामाजिक इ. क्षेत्रात होत असल्याचें इतिहास सांगतो, तेव्हा येथेंहि तसें होईल."

भाषणाच्या शेवटी समेलनानें आता चार गोष्टींकडे लक्ष देण्याची जरूरी आहे असें अध्यक्षांनी सांगितलें. त्या चार गोष्टी अशा —

(१) नाट्याचें विश्वविद्यालयीन स्थान व त्याचा विश्वविद्यालयीन शिक्षणात अंतर्भाव.

(२) स्थानिक संस्थांनी नाटयप्रयोगार्थ उभारलेली रंगमंदिरें (National Theatres).
(३) मध्यवर्ति संस्थेची स्थापना.
(४) रंगभूमिविषयक चर्चेसाठी नियतकालिकाची योजना.

## निबंधवाचन व व्याख्यानें

समेलनांत निरनिराळ्या विषयावर ११ निबंध आले होते. त्यापैकी चार सारांशरूपानें वाचले गेले. त्याची नावें —

(१) मूकनायकपरीक्षण — श्री. द. रा. गोमकाळे
(२) नाटचविषयक एक वक्तव्य — श्री. वि. ल. चिपळूकर
(३) कोल्हटकरांच्या पदातील काव्यसौंदर्य
(४) शेक्सपिअर आणि मराठी नाटच — श्री. त्र्य. अ. गोडबोले

आचार्य स. ज. भागवत 'जीवन व रंगभूमि' या विषयावरील व्याख्यानांत म्हणाले, "प्रत्यक्ष जीवनात विकसनासाठी अथवा प्रकाशनासाठी आत्म्याची जी धडपड चालू असते तिचे स्वरूप स्पष्ट करून दाखविणें हा रंगकलेचा विषय आहे. जीवनांत जो सत् आणि असत् याचा संग्राम चालतो त्याचें चित्र रेखाटणे हे नाटचाचे सर्वश्रेष्ठ कार्य होय. या संग्रामामुळें मानवी आत्म्याची भावशुद्धि होऊन त्याची उन्नति व प्रगति होत असते. त्यामुळें या संग्रामाला अध्यात्मिक दृष्टया महत्त्व आहे. अशा रीतीनें नाटचकला ही आत्मबोध करून देणारी श्रेष्ठकला आहे......प्राचीन नाटचांत मनुष्यस्वभाव स्थिर व बहुतांशी अपरिवर्तनीय मानलेला दिसतो. आधुनिक नाटचांत मानवी स्वभावघटनेची मीमांसा करण्याचा प्रयत्न चालला आहे."

श्री. श्री. वि. वर्तक आपल्या भाषणात म्हणाले, "हजारो लोकाना पटणारी गोष्टच आपण करीत आहोत असें भासवीत, लोकहिताच्या दृष्टीनें आवश्यक व स्वतःच्या काळाला योग्य असे स्वत चे विचार द्रष्टे लोक लोकावर लादतात. कालिदासाप्रमाणेंच शेक्सपिअर, इब्सेन, गटे, शॉ, गडकरी वगैरे नाटककार असे द्रष्टे होते. नवीन नाटककारानी जुन्या पिढीतल्या लोकाना कांहीतरी नवें करून दाखवून आपले वैशिष्टय पटवून दिलें पाहिजे."

श्री. बाबासाहेब खापर्डे याचे 'ग्रीक ट्रॅजेडी व भारतीय नाटच' या विषयावर उद्बोधक व मनोरंजक व्याख्यान झाले.

## पुणे व ठराव

या अधिवेशनात एकूण १४ ठराव मंजूर झाले व त्यावर २४ वक्त्यांची भाषणे झाली त्यापैकी महत्वाचे ठराव —

(१) गतवर्षी दिवंगत झालेल्या नाट्यधर्मवक्तावद्दल दुःखदर्शक ठराव करून तो मृत व्यक्तींच्या नातेवाईकांच्याकडे पाठविण्यात आला

(२) १९३८ मध्ये भरलेल्या पुणे येथील २९ व्या संमेलनात मध्यवर्ति संस्थेची स्थापना करण्याचा ठराव होऊन तिची घटना तयार करण्यासाठी एक समितीहि नियुक्त करण्यात आली होती त्या समितीचे निमंत्रक श्री तळेकर यानीं तयार झालेली घटना नागपूर संमेलनास सादर केली विषयनियामक समितीमध्ये या घटनेत काही दुरुस्त्या करण्यात येऊन ती मंजूर करण्यात आली. या घटनेनुसार पुढील वर्षासाठी पुढील कार्यकारी मंडळहि नियुक्त करण्यात आले —

*अध्यक्ष — श्री श्री ना बनहट्टी, चिटणीस — डॉ न थ वरवे*

सभासद — श्री वरेरकर, श्री. पडरीपांडे, डॉ घारपुरे, श्री दातार

श्री वर्तक, श्री पुरोहित, श्री नेने व श्री वा वा भोळे

संस्थेला १०० सभासद मिळविणे, संस्था रजिस्टर करणे, नियतकालिक चालू करणे व संमेलनातील इतर ठरावांची कार्यवाही करणे अशी कामे या कार्यकारी मंडळावर सोपविण्यात आली होती

(३) मध्यवर्ति संस्था व संमेलन यांची पूर्वीची भारत नाट्य समाज व भारत नाट्यसंमेलन *अशी नावे बदलून* 'महाराष्ट्र नाट्य संमेलन' हेंच स्थायी संस्थेचे व संमेलनाचे नाव असावे

(४) आंतरविद्यालयीन नटसंघ तयार करावेत

(५) मराठी रंगभूमीचा सविस्तर इतिहास लिहून प्रसिद्ध करण्यात यावा

(६) विद्यापीठात नाट्यविषयक अभ्यासक्रम सुरू करण्याची खटपट करावी.

(७) अभिजन मंडळें (Family Circles) स्थापन करावीत

(८) स्थानिक स्वराज्य संस्थांना नाट्यगृहें बांधण्याची विनंती करावी

(९) जप्त वाङ्मयावरील बंदी उठवण्याची सरकारला विनंती करावी या ठरावावर बोलताना श्री दादासाहेब तोवडे म्हणाले, " नवविचाराचा समाजात अनिर्बंध प्रचार व्हावा आणि ते विचार वाया जाऊ नयत म्हणून

लेखकांना स्वातंत्र्य असणे जरूर आहे वाङ्मयनिर्बंध दूर करण्यासाठी वचनबद्ध झालेल्या कॉंग्रेस सरकारने वाङ्मयावरील निर्बंध तावडतोब रद्द करणे हें त्याचे कर्तव्य आहे"

## नाट्यविषयक प्रदर्शन

संमेलनातील या प्रदर्शनाचे उद्घाटन श्री बालगंधर्व यांच्या हस्ते झाले त्या वेळी ते म्हणाले, "ऐतिहासिक दृष्टया नटनटींचे पोषाख, केशभूषा व त्याची रचना, याची प्रदर्शनात मांडणी करावी प्रेक्षकांनी नाटक पाहताना नाटकाचे पुस्तक वाचण्यात वेळ न घालवता नटाच्या भूमिका योग्य वठत आहेत की नाही हें पहावे आणि वठत नसल्यास निषेधप्रदर्शक टाळ्या वाजवून आम्हाला त्याची जाणीव करून द्यावी नाट्यव्यवसाय करणाऱ्या निरनिराळ्या नाटक मंडळ्यात प्रेम व सहकार्य नांदले पाहिजे"

प्रदर्शनाचे (१) रंगभूमि व (२) वाङ्मय असे दोन विभाग होते पहिल्या विभागात छायाचित्रें, रंग साहित्य, दुर्मिळ हस्तलिखिताच्या प्रती इ वस्तु होत्या दुसऱ्या विभागात गेल्या ५० वर्षांतील नाट्यवाङ्मय, प्रकाशित व हस्तलिखित नाटकें, टीकाग्रंथ, नियतकालिकें इ साहित्य ठेवलें होते

प्रदर्शनातील पुढील वस्तु विशेष उल्लेखनीय होत्या — कै राम गणेश गडकऱ्यांच्या लिहिण्याच्या दोन पेन्सिली, त्यांच्या संग्रहातील विठोबाचा फोटो, लग्नकुंडली, तुतारी मंडळाचा फोटो, कै महादेवशास्त्री कोल्हटकर याच्या 'आयेल्लो' नाटकाची अस्सल प्रत, ३०।४० वर्षांपूर्वी प्रकाशित झालेल्या 'थिएटर' मासिकाचे अंक, मै अ बा बरवे यांचे सर्व वाङ्मय व त्यांच्याकडील जुन्या नाटकांचा संग्रह, श्री वनहट्टी यांच्याकडील इंग्रजी वाङ्मयाचा संग्रह इ इ

## करमणूक

संमेलनाच्या प्रारंभीच नागपूर येथील 'भगिनी मंडळा'ने संमेलनाप्रीत्यर्थ 'लग्नाची बेडी' या नाटकाचा प्रयोग करून दाखवला या प्रयोगाचे वैशिष्ट्य म्हणजे केवळ स्त्रियांनी जाहीररीत्या करून दाखविलेला नागपुरातील हा *पहिलाच प्रयोग होता*

(४) नागपूर विद्यापीठासाठी एक अभ्यासक्रम तयार करून तो त्या विद्यापीठाला सादर करण्यात आला मुंबई विद्यापीठात त्यासंबंधी खटपट सुरू केली

(५) नाशिक व नागपूर येथें अभिजन मंडळाची स्थापना होऊन त्यांनी अनुक्रमें 'स्वयंसेवक' व 'भावबंधन' हे नाट्यप्रयोग करून दाखविले



अध्यक्ष • गणपतराव बोडस

# ३१. नाशिक

१९४०

प्रख्यात नट आणि दिग्दर्शक— गंधर्व नाटक मंडळीचे एक मालक. 'माझी भूमिका' हें मराठीतील नटाचें पहिलें आत्मचरित्र यांनी लिहिलें आहे

हें संमेलन नाशिक येथील न्यू इंग्लिश स्कूलच्या पटांगणात खास संमेलनासाठीं उभारलेल्या भव्य मंडपात दि. २३ व २४ मार्च ११४० या दिवशीं भरलें होतें. संमेलनाची सर्व व्यवस्था नाशिकच्या महाराष्ट्र नाटयमंदिर या संस्थेनें स्वीकारली होती. अध्यक्षपदासाठी नटवर्य श्री. गणपतराव बोडस यांची निवड करण्यात आली होती.

संमेलनाच्या दिवशीं (दि. २३।३।४०) सकाळीं महाराष्ट्र नाटयसंमेलनाच्या सर्वसाधारण सभेची पहिली बैठक झाली. अध्यक्ष श्री. कारखानीस आजारी असल्यानें प्रा. वनहट्टी यांच्या अध्यक्षतेखालीं सभेचें कामकाज झालें. प्रारंभीं चिटणीस डॉ. न. ज. बर्वे यांनी वार्षिक अहवाल व जमाखर्च वाचून दाखविला आणि किरकोळ दुरुस्त्या होऊन तो मंजूर करण्यात आला. नंतर चिटणीसांनी, मध्यवर्ति समितीनें वर्षभरात झालेल्या कामाची माहिती सभेपुढें

निचूरकर अनुपस्थित असल्याने त्यांचे पत्र कार्याध्यक्ष श्री वा श्री पुरोहित यांनी वाचून दाखविले स्वागतपर भाषण श्री पुरोहित यांचेच झाले नंतर अध्यक्ष श्री बोडस यांना त्यांची 'एकच प्याला' नाटकातील भूमिका केलेली व 'महाराष्ट्र नाट्य संमेलन-अधिवेशन ३१ वे' अशी अक्षरें असलेली रौप्यमुद्रा अर्पण करण्यात आली सदनवाचनानंतर अध्यक्ष श्री गणपतराव बोडस यांचे भाषण झाले

अध्यक्षांनी आपल्या भाषणात मराठी रंगभूमीच्या सध्याच्या हीन परिस्थितीची अत्यंत मार्मिक आणि अनुभवावर आधारलेली चिकित्सा केली त्यांच्या प्रत्येक शब्दातून त्यांचे मराठी रंगभूमीवरील प्रेम दिसून येत होतें मुद्राभिनय व स्वराचा आरोह आणि अवरोह या त्यांच्या नाट्यगुणांनी त्यांचे भाषण अत्यंत आकर्षक झाले मधूनमधून विनोदाच्या झुळुकी ते सोडीत. अलीकडील सिनेमा तमाशाविषयीत्यांनी सडकून टीका केली योग्य दिशेने प्रयत्न केल्यास मराठी रंगभूमीची स्थिति अजूनहि सुधारेल असा विश्वास प्रकट केला कुलीन स्त्रियांनी नाटकात घडा म्हणून काम करू नये मराठी रंगभूमि कधीच मरणार नाही असहि त्यांनी सांगितले

निबंधवाचन

श्री राम गोगटे यांनी 'बोल्पट व रंगभूमि' या विषयावर निबंध वाचला त्यात ते म्हणाले, "अमेरिकेत बोल्पटासाठी निवडलेल्या कथानकावर प्रथम एक नाटक लिहून त्याचे प्रयोग निरनिराळ्या ठिकाणी करतात त्यामुळें परिणामकारक प्रसंगाची योग्य कल्पना दिग्दर्शकास यते आणि बोल्पटात त्या प्रसंगाचा उठाव दाखविण्यास साहाय्य होते आपल्याकडे तालीम घेण्यात अत्यंत अनास्था दिसून यते नवे प्रयोग करून पाहण्याची प्रवृत्ति कमी आहे"

ठराव इ

संमेलनात अध्यक्ष श्री बोडस यांनी लिहिलेल्या 'माझी भूमिका' या आत्मचरित्राचे प्रकाशन प्रा बनहट्टी यांच्या हस्ते झाले त्यानंतर पुढील ठराव मंजूर झाले

(१) दिवंगत व्यक्तींना श्रद्धांजलि

(२) विद्यापीठातून नाट्याभ्यासाची शाखा निर्माण करण्याचे जें काय

आजवर झाले त्याबद्दल धन्यवाद व पुढें हें काय चालू ठेवण्याचा आदेश

(३) नागपूर विद्यापीठात नाट्यविषयक अभ्यासशाखा सुरू करण्याच्या दिशेने जें काम केले त्याबद्दल आभार व तें पूर्ण करावे अशी विनंती

(४) मुंबई विद्यापीठास अशीच अभ्यासशाखा निर्माण करण्याविषयी विनंती

(५) १९४३ मध्यें सांगली येथें मराठी रंगभूमीचा शतसांवत्सरिक उत्सव अखिल महाराष्ट्राच्या वतीने साजरा करावा व त्या उत्सवाची योजना ६ महिन्यांच्या आत निश्चित ठरवावी, अशी सूचना

(६) नगरपालिका व सार्वजनिक संस्था यांना नाट्यगृहें बांधून देण्या-विषयीं विनंती

(७) नवीन कार्यकारी मंडळाची निवड करण्यात यावी संमेलन संस्थेचे वर्ष १ जानेवारी ते ३१ डिसेंबर असे ठरविण्यात यावे

करमणूक

या संमेलनात 'मराठी रंगभूमीचे शतक' हा अत्यंत अभिनव व उद्बोधक कार्यक्रम श्री पुरोहित यांनी सादर केला यांत विष्णुदास भावे यांच्यापासून मराठी रंगभूमीवर जी वैशिष्ट्यपूर्ण नाटकें गाजली त्यांतील काही प्रवेश सादर करण्यात आले विष्णुदासकालीन ऐतिहासिक, पौराणिक, इ. सर्व प्रकारच्या नाट्यसृष्टीचे दर्शन घडावे अशी यांत योजना होती बरोबर नटांना बरोबर घेऊन आलेला, नाटक मंडळीचा एक मालक आपल्या विपन्नावस्थेची कहाणी सांगत आहे आणि त्याबरोबरच मराठी रंगभूमीच्या इतिहासाचे ओझरते दर्शन घडत आहे अशी याची पार्श्वभूमि निर्माण करण्यात आली होती या कार्यक्रमाची मूळ कल्पना श्री पुरोहित यांची असून संवाद लिहिण्याचे काम प्रा जोगळेकर यांनी केले होते

या शिवाय सौ इंदुमती चोवळ यांचे काव्यगायन आणि अभिजन मंडळाने सादर केलेला 'छापील संसार' हा नाट्यप्रयोग हे कार्यक्रमहि सादर करण्यात आले नाट्यप्रयोगात स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनींच केल्या होत्या

नाशिक अधिवेशनानंतर—

नाशिक अधिवेशनात महाराष्ट्र नाट्यसंमेलन या संस्थेस कायमचे स्वरूप प्राप्त झाले त्यापूर्वीच्या अस्थायी कार्यकारी समितीचे विसर्जन करून घटन-

नुसार नव्या कार्यकारी समितीची नियुक्ति व्हावी असे समेलनात ठरले होत यासाठी नागपूर येथे दि १२-४-१९४० ला जुन्या कार्यकारी मडळाची सभा भरून निवडणुकीच घोटनियम मजूर करण्यात आले आणि त्याअन्वये लवकरच कार्यकारी मडळाची निवड झाली त्यापैकी उपाध्यक्ष व ३ सभासद याची निवडणूक नियमाप्रमाणे समेलनातच करण्यात आली होती जुलै १९४० मध्ये पुढील कार्यकारी-मडळ सिद्ध झाले—

अध्यक्ष— प्रा श्री ना बनहट्टी, नागपूर ( ३ वर्षांकरिता)

उपाध्यक्ष— (१) श्रीमत बाळासाहेब राजबहादूर, मालेगाव (१ वर्षाकरिता)

(२) प्रि श्री ल पढरीपाड, ( २ वर्षांकरिता)

खजिनदार— श्री विष्णु मोरेश्वर जोशी नागपूर ( २ वर्षांकरिता)

चिटणीस— (१) डॉ न अ बरत, नागपूर ( ३ वर्षांकरिता)

(२) श्री वा श्री पुरोहित, नाशिक ( " )

सभासद— (१) रा सा श्री गो मा परशरामी सगमनेर (१ वर्षाकरिता)

(२) श्री स आ कुलकर्णी सागली ( " )

(३) प्रा र श्री जोगळेकर, नाशिक ( " )

(४) श्री ह ना नने, नागपूर (३ वर्षांकरिता)

(५) श्री पा वा गडकरी, नागपूर ( " )

(६) श्री य स गुप्ते, नागपूर ( " )

(७) श्री बा मो कर्वितकर नाशिक ( " )

यापैकी श्रीमत राजबहादूर याची समति न मिळाल्यामुळे व प्रा जोगळेकर याच्या आकस्मिक मृत्युमुळे दोन जागा रिकाम्या राहिल्या त्याची पुढील प्रमाणे फेरनिवडणूक झाली

उपाध्यक्ष— श्री केशवराव दाते

सभासद— श्री श्री त्र्य गोडबोले

## कार्यकारी मडळाचे कार्य

### (१) हीरक महोत्सव

मडळाची पहिली बैठक दि २१-७-४० ला झाली या वर्षी रगभूमीवर सगीत नाटक सुरू होऊन ६० वर्षे पूर्ण होत असल्याने सगीत नाटकाच्या हीरक महोत्सवाबद्दल विचार झाला

हा उत्सव दसऱ्यापासून नरकचतुर्दशीपर्यंत अथवा वर्षाच्या शेवटी करावा असें ठरलें. सभा व नाटयप्रयोग असे उत्सवाचे दोन भाग निश्चित होऊन नाटयप्रयोगाच्या उत्पन्नांतून १।१० इतका भाग शतसांवत्सरिक उत्सव-मंडळाकडे खर्चासाठी घ्यावा असेंहि ठरविण्यांत आलें.

*हा उत्सव महाराष्ट्रात सर्वत्र व्हावा म्हणून आदेश देणारें एक पत्रक* महाराष्ट्र नाटय संमेलनातर्फे प्रसिद्ध करण्यात आलें. त्याचप्रमाणें वृत्तपत्रांतूनहि याचा प्रचार करण्यांत आला होता.

(या आदेशाप्रमाणें नागपूर येथें दि. १३ व १४ डिसेंबर १९४० या दिवशीं हीरकमहोत्सव साजरा करण्यांत आला. 'संगीत सौभद्र' नाटकाचा प्रयोग होऊन त्याचे १।१० उत्पन्न ठरल्याप्रमाणें शतसांवत्सरिक मंडळाकडे धाडण्यांत आलें व उरलेलें नागपूरच्या अॅकॅडमी ऑफ ड्रॅमॅटिक आर्ट्स या संस्थेला देण्यांत आलें श्री. वा. म. जोशी याच्या अध्यक्षतेखाली सभा होऊन तींत अॅडव्होकेट तु. ज. केदार व श्री. वा. वा. भोळे याची भाषणें झाली.

नागपूरशिवाय इतरत्र या उत्सवासंबंधी हालचाल झाली नाही. नाशिक येथें दि. १८।८।४० रोजी भरलेल्या सभेंत पुढील कामकाज झालें.

### (१) *विद्यापीठांत नाटयशाखा*

नागपूर विद्यापीठात नाटयाच्या अभ्यासक्रमासंबंधी जो ठराव येणार होता त्यासंबंधीं सभासदाशी विचारविनिमय करण्यासाठी प्रा वनहट्टी, श्री. वा वा. भोळे व श्री. हिदायतुल्ला यांची एक समिती नेमण्यांत आली; परंतु या समितीने तयार केलेला अभ्यासक्रम विद्यापीठाच्या फॅकल्टी ऑफ आर्ट्स'-कडे विचारार्थ आला असता तो मजूर होऊ शकला नाही.

### (२) शिक्षणसंस्थांतून नाट्याभ्यास

शाळा-कॉलेजातून नाटयाभ्यास मडळें निर्माण व्हावीत व त्या सर्वांचें मिळून ५ सभासदाचे *एक मध्यवर्ति मडळ असावें असे ठरलें त्या मंडळाकडे* विद्यालयीन नाटयप्रयोगाची व जयचिन्हाची योजना सोपविण्यात आली.

परतु या समितीचे उत्साही सभासद प्रा जोगळेकर याच्या आकस्मिक *निधनामुळें समितीचे कार्य पुढे चालू शकलें नाही.*

पुढील नाटयसंमेलनासाठी आलेलें मुंबईचे आमंत्रण स्वीकारण्यात आलें

(३) अभिजन मंडळ

अभिजन मंडळाचा प्रचार करण्यासाठी श्री वामनराव पुरोहित यांना अधिकार देण्यात आला

नागपूरच्या अभिनव नाट्यमंदिराने अभिजन मंडळाच्या कल्पनेचा स्वीकार करून दोन नाट्यप्रयोगहि करून दाखविले

यापुढे कार्यकारी मंडळाच्या पुढील अधिवेशनापूर्वी आणखी चार सभा झाल्या या सभांतून मुख्यत्वेकरून शतसांवत्सरिक उत्सवाचा विचार झाला त्याशिवाय आगामी मुंबई अधिवेशनाकडे पाठवावयाच्या ठरावाचा आराखडा करणे, स्थानिक समित्यांचे नियम व पोटनियम करणे, व अप्रकाशित नाटकांच्या परीक्षणाचा उपक्रम सुरू करणे इत्यादींची चर्चा झाली शेवटच्या उपक्रमानुसार ५।६ नाटकें तपासून त्यावर सूचना व अभिप्राय देण्यात आले.

महाराष्ट्र नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष प्रा वनहट्टी यांनी उन्हाळ्याचे सुटीत बऱ्याच ठिकाणी हिंडून प्रचार केला रत्नागिरी येथे भरलेले महाराष्ट्र साहित्यसंमेलन व जमखिंडी येथील द महाराष्ट्र प्रांतीय संमेलन यांना उपस्थित राहून प्रा वनहट्टी यांनी शतसांवत्सरिक उत्सवासंबंधीचा ठराव मंजूर करून घेतले

या उत्सवासंबंधी स्थानिक कार्यास सुरुवात होण्यासाठी सांगलीच्या स्थानिक मंडळीचीच एक समिती नेमण्यात आली त्या समितीत श्री. बोडस, प्रा कानेटकर, रा सा वा ग भावे, स आ कुलकर्णी, श्री न ग कमतनूरकर प्रभृतींचा समावेश केला होता पुणे येथेंहि प्रा वा. म जोशी व रा सा र लु जोशी यांच्या साहाय्याने एक सभा घेण्यात आली

शतसांवत्सरिक उत्सवाच्या योजनेचे ३ स्थूल विभाग करण्यात आले—

(१) रंगभूमीचा इतिहास, स्मारकग्रंथ, नाट्यकोश, चित्रसंग्रह इ साठी प्रकाशन-समिति

(२) नाट्यप्रयोगासाठी प्रयोग-समिति

(३) द्रव्यसंपादन व विनियोग यासाठी अर्थ-समिति

या सर्व समित्यांवर देखरेख ठेवण्यासाठी व उत्सवाची परिपूर्ण तयारी करण्यासाठी पुढील समिति नेमावी असा ठराव करण्यात आला

अध्यक्ष —श्री न चि केळकर, चिटणीस — प्रा. वनहट्टी,

सभासद — श्री. भास्करराव जाधव, श्री. वरेरकर, प्रा. फडके, श्री. खांडेकर व सौ. क्षमाबाई राव.

ऑक्टोबर १९४०, एप्रिल १९४१ व डिसेंबर १९४१ या दिवशी भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभांतून उत्सवासंबंधीच प्रामुख्यानें विचार झाला. इतर कामकाज पुढीलप्रमाणें झालें:—

(१) मुंबई अधिवेशनासाठीं अध्यक्षपदासाठीं ३ नांवाचें पॅनेल सुचविणें.

(२) भावे स्मारकमंदिरासाठी सांगलीच्या राजेसाहेबांकडून जागा मिळविण्याची खटपट करणें व स्मारक मंदिराचा प्लॅन तयार करणें.

(३) रंगभूमि-विकास-दर्शन चित्रपटासंबंधी प्रसिद्ध बोलपट-संस्थांकडे विचारणा करण्यांत आली.

या दरम्यानचे काळांत प्रा. वनहट्टी यांच्या प्रयत्नानें नागपूर येथें नाटय-विद्यामंदिर ( Academy of Dramatic Arts ) या संस्थेची स्थापना होऊन नाटयशिक्षणाच्या दृष्टीनें पाहिले पाऊल टाकण्यांत आलें.

सर्वसाधारण सभा



अध्यक्ष प्रल्हाद केशव अत्रे

# ३२. मुंबई
## १९४१

मराठी विडंबन काव्याचे जनक विख्यात नाटककार, लोकप्रिय पटकथाकार आणि झुंजार संपादक.

मुंबई मराठी साहित्यसंघाच्या विद्यमाने ३२व्या संमेलनाचा सोहळा दि २८ ते ३१ डिसेंबर १९४१ असे चार दिवस विल्सन हायस्कूलच्या आवारातील मंडपात मोठ्या थाटामाटात पार पडला संमेलनाचे अध्यक्ष-स्थान आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यानी मंडित केले होत

दि २८ ला सकाळी ९ वाजता संमेलन सुरू झाले जुन्या सूत्रधारपद्धतीचा परतु नव्याने लिहिलेला प्रवेश सादर केल्यानतर संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री वर्तक याचे भाषण झाले लिखित भाषण वाचून न दाखविता श्री वर्तक यानी उत्स्फूर्त भाषण करून ' रगभूमि आणि बोलपट ' यासबधीचे आपले विचार माडले. बोलपटाच्या आगमनामुळें रगभूमीची अवनति झाली तरी रगभूमीच महत्व अबाधितच राहील हे पटवून देताना श्री वर्तक म्हणाले, " अल्पश्रमाच्या मोबदल्यात मिळणाऱ्या भरमसाट पगारामुळें नट-नटी व नाटचलेखनापेक्षा चित्रपटकथाना मिळणारा भारी मोबदला यामुळें लेखक बोलपट सृष्टीकडे वळले चित्रपटधद्याच रहस्य रगभमीच्या उपास-काना वेळीच न कळल्यामुळें या नवीन परिस्थितीशी टक्कर देण्यास ते असमर्थ ठरले

तथापि बोलपट हा त्याच्या मर्यादामुळें रसिकमनाचे पूर्ण समाधान करू शकत नाही बोलपटात कोणताहि सिद्धात मागोपाग माडणे शक्य होत

नाही, तेथें नट किंवा नटी याच्या कौशल्याला वाव नसता, अभिनय, विविध प्रसंगाची गुंफण आणि त्याचा परिणाम या सर्व गोष्टीकडे नट पहात नसून दिग्दर्शक पहात असतो, नाट्याची जबाबदारी तालमीच्या वेळी दिग्दर्शकाकडे असली तरी नट एकदा रंगभूमीवर आल्यानंतर दिग्दर्शक अदृश्य होतो व भूमिकेची निर्मिति आणि विकास या गोष्टी नटाला स्वावलंबनाने कराव्या लागतात या विकासाला कित्येक वेळा प्रक्षकहि कारणीभूत होतात हे चित्रपटात होऊ शकत नाही विविध दृश्यें व प्रसंग यावर बोल्पटाचा भर असून शब्द हा तेथें गौण आहे उलट रंगभूमीवर शब्दावर फार महत्त्व असून इतर गोष्टी गौण आहेत शिवाजी, टिळक नेपोलियन इ व्यक्तींचें संपूर्ण कार्य चित्रपटाच्या साहाय्यानें थोडक्यात दाखविता येईल, परंतु या व्यक्ति तीं तीं कार्यें करण्यास का उद्युक्त झाल्या, त्याच्यामागें कोणतीं तत्व प्रणालि होती हें दाखवून द्यायला रंगभूमीचाच आश्रय घ्यावा लागतो

असा फरक असल्यानें रंगभूमीचें महत्त्व स्वतंत्र आहे चित्रपटाच्या अस्तित्वामुळें रंगभूमि मरणें शक्य नाही" रंगभूमीची स्थिति सुधारण्यास नाट्यमंदिरें, भांडवल किंवा ध्येयवादी कंपनी आणि नित्य नव्या नाटकांचा पुरवठा या तीन गोष्टींची आवश्यकता आहे असें सांगून श्री वर्तक यांनी आचार्य अत्रे यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली

त्याला रेडिओ, ग्रामोफोन व बोलपट हे नवीन प्रतिस्पर्धी निर्माण झाले बोलपटांनीं इतर सर्वच करमणुकीच्या प्रकारावर मात केली नाट्य, चित्र, शिल्प, संगीत इ. सर्व नव्याजुन्या कलांचा आस्वाद सर्व थरांतील लोकांना अल्पखर्चात मिळू लागल्याने बोलपटाचा पगडा बहुजनसमाजाच्या मनावर तावडतोब बसला आणि त्यामुळें रंगभूमि आणि नाट्यकला सर्वस्वीं नाहीशा होतात की काय अशा तऱ्हेचे भीतिग्रस्त वातावरण निर्माण झाले ”

मराठी नाट्यवाङ्मय आणि नाट्य-सृष्टि यांच्या उत्कर्षाचा इतिहास सांगून आ. अत्रे म्हणाले, “मराठी रंगभूमीचा भाग्यशाली भूतकाल लक्षात घेतला म्हणजे वर्तमानकाळातील तिची दैन्यावस्था बघूनहि तिच्या तजस्वी भविष्याबद्दल मन निराश होण्याचे यत्किंचितहि कारण उरत नाही नाट्य-विषयाच्या, तंत्राच्या, अभिनयाच्या, वेषभूषेच्या, रंगभूमीवरील सजावटीच्या कोणत्याहि दृष्टीने मराठी रंगभूमीकडे पाहिले तरी त्या त्या बाबतीत आपण केवढातरी टप्पा गाठला आहे हें कळून येत ” यानंतर अध्यक्षांनी रंगभूमीच्या दैन्याची पुढील कारणे सांगितली—

(१) महायुद्धानंतर आमूलाग्र बदललेल्या प्रवृत्तींची दखल रंगभूमीने त्यावेळी घेतली नाही, रंगभूमीचं नावीन्य आणि तारुण्य अखंड टिकविण्याचा प्रयत्न नाटक मंडळ्यांकडून झाला नाही

(२) रंगभूमीला आधुनिक आणि वास्तववादी स्वरूप देण्यासाठी स्त्रियांनी रंगभूमीवर येणें जरूर होतें त्या अभावी रंगभूमीवरील वातावरण अनैसर्गिक, कृत्रिम आणि रोगट राहिले

(३) संगीताची अतिरिक्तता झाली

(४) आणि उत्तम नाट्यविषयक टीकाकार निर्माण झाले नाहीत

जीवनात नाट्याला जें श्रेष्ठ स्थान आहे त्या विषयी अध्यक्ष म्हणाले, “नाट्यलेखन ही कलावंताच्या निर्माणशक्तीची पराकाष्ठा आहे रंगभूमि हे केवळ करमणुकीचे विश्रांतिस्थान नसून तें लोकशिक्षणाचे आणि लोकजागृतीचे प्रभावी व्यासपीठ आहे प्रेक्षकांच्या मनावर दीर्घकाल टिकून रहाणाऱ्या परिणामाच्या दृष्टीनें बोलपटांना नाटकापुढें सर्वस्वी शरणागतीच पत्करावयाला पाहिजे बोलपटाच्या सृष्टीपेक्षा रंगभूमीवरची सृष्टि प्रेक्षकांना अधिक जिवंत आणि अधिक खरी वाटते पुरोगामी विचारसरणी प्रेक्षकांच्यापुढे

माडण्याच्या वावर्नात तर रगभूमि रुपेरी पडद्याला केव्हाहि हार जाणार नाही

नाटक ही एक स्वतत्र आणि स्वयपूर्ण कला आहे बोलपट ही निर्भेळ कला नसून अनेक कलाच्या यत्रीकरणाच्या आधारावर उभा असलेला ता धदा आहे त्याच्यात यात्रिक निर्दोषता असली तरी माणसाची बौद्धिक आणि आत्मिक तहान भागविण्याची ताकद नाही

शवटी अध्यक्षानी रगभूमीला पुन्हा नवचैतन्य प्राप्त व्हाव म्हणून पुढील उपाययोजना सुचविली—

(१) नाटक हें राष्ट्रीय भावनाचा सोहळा साजरा करण्याचे सामर्थ्यवान् साधन आहे हें जाणून समाजातील धार्मिक, सामाजिक राजकीय उत्सव व सण साजरे करण्याच्या कामी नाटकाचा सराम उपयोग व्हावयाला पाहिजे

(२) विद्यापीठीन अभ्यासक्रमात नाटयशास्त्राचा अभ्यास सुरू करणे

(३) व सावजनिक नाटयगृह बाधणे

'महाराष्ट्रात नाटय केव्हाहि मरणार नाही असा दृढ विश्वास व्यक्त करून अध्यक्षानी आपले भाषण सपविले

चर्चा

करून घ्यावा " चर्चेत श्री के नारायण काळे, ॲडव्होकेट केदार यानीहि भाग घेतला

समेलनात एकूण ७ ठराव मजूर करण्यात आले

पहिला ठराव दुखवटयाचा होता दुसऱ्या ठरावाने नाशिक येथें स्थापन झालेल्या व नागपूर, पुणें यथेंहि यशस्वी झालेल्या 'अभिजन मडळा' च्या योजनेस पाठिंबा देण्यात आला

तिसऱ्या ठरावाने मुबई, पुणे, नाशिक, उमरावती, नागपूर व सोलापूर या ठिकाणी सार्वजनिक नाटयगृह निर्माण होण्यासाठी प्रयत्न करण्याचा आदेश देण्यात आला तसेच मुबई व नागपूर विद्यापीठात नाटयाभ्यासशाखा सुरू करण्यासाठी होत असलेले प्रयत्न पुढेंहि चालू ठेवण्यासाठी ११ जणाची समिती नमण्यात आली

चौथा ठराव मराठी रगभूमीच्या शतसावत्सरिक उत्सवाचा होता तो प्रा द वा पोतदार यानी माडला तो ठराव पुढीलप्रमाणे —

नाशिक येथ भरलेल्या नाटयसमेलनाच्या ३१ व्या अधिवेशनात शतसावत्सरिक उत्सवासबधाने जो ठराव झाला होता त्याला अनुसरून कार्यकारी मडळाने विस्तृत स्वरूपात तयार केलेली योजना तीत योग्य ते फरफार करून कार्यवाहीत आणण्यासाठी, आणि हा उत्सव अखिल महाराष्ट्रातर्फे साजरा करण्यासाठी पुढील उत्सव मडळ नमण्यात येत आहे

(या मडळात श्री न चि केळकर, डॉ परांजपे, प्रो कानेटकर, श्री पुराणिक, प्रा गजेंद्रगडकर, श्री दाते, श्री पोतदार, श्री खाडेकर, श्री अत्रे, श्री वोडस, प्रा बनहट्टी (निमत्रक) इ महाराष्ट्रातील नामवत व्यक्तींचा समावेश आहे )

पाचवा, मराठी रगभूमीच्या पुनरुज्जीवनासबधीचा ठराव, श्री गोविंदराव टेंब यानी माडला तो असा —

" महाराष्ट्र रगभूमीची सध्याची मोडकळीस आलेली अवस्था लक्षात घेता, रगभूमीच्या पुनरुज्जीवनार्थ सध्याच्या परिस्थितीस अनुसरून व्यापक, पायाशुद्ध व सघटित प्रयत्न व्हावयास पाहिजेत असे प्रयत्न करण्यासाठी व नाटयकलेची दृढ पायावर पुन्हा स्थापना करण्यासाठी पुढील कार्यकर्त्यांनी आपापल्या मूर्त योजना तयार करून त्या शतसावत्सरिक उत्सवाच्या आधी अमलात

आणण्याचा प्रयत्न करावा

(१) श्री दाते (२) श्री चिंतामणराव कोल्हटकर, (३) श्री के ना काळे, (५) श्री टेंबे, (६) श्री पुरोहित, (७) श्री पार्श्वनाथ आळतेकर व (८) श्री अनंत काणेकर

एका ठरावान्वये उत्तमोत्तम नाटकांची देशी भाषेत भाषांतरें करवून घ्यावीत व त्यांचे प्रयोग करावेत असे सुचविण्यात आले

या अधिवेशनात श्री वरेरकर यांच्या 'उडती पाखरें' या नाटकातील ना० गो कृ गागले यांच्यासंबधीच्या उद्गाराबद्दल नापसंती व्यक्त करणारा ठराव श्री दाजीसाहेब तुळजापूरकर यांनी ७५ प्रतिनिधींच्या] सह्यांनिशी अध्यक्षांना सादर केला तथापि अध्यक्षांनी तो मांडण्यास संमति दिली नाही

प्रा कानटकर यांनी पुढील अधिवेशनासाठी दिलेले सांगलीतर्फेचे निमंत्रण मान्य झाल्यानंतर आभारप्रदर्शन होऊन अध्यक्षांनी समारोप केला

## करमणूक

या कार्यक्रमात कीचकवध, मत्स्यगंधा, प्रेमसंन्यास, तोतयाचे बंड, आसुरी लीला इ नाटकातील प्रवेश, नृत्य, नकला, मूकदर्शन, शाहीर नानिवडेकर आणि मंडळीचे लोकनाट्य व अनंत काणेकरकृत 'घरकूल' हा नाट्यप्रयोग असे विविध कार्यक्रम करण्यात आले

मा कृष्णराव यांनी 'वंदे मातरम्' गीत म्हटल्यानंतर हा संमेलनाचा सोहळा समाप्त झाला

## महाराष्ट्र नाट्य संमेलनाचे वार्षिक काम-काज

(१) मध्यवर्ति संस्थेच्या घटनेत सुधारणा करण्यासंबंधी जो ठराव मुंबईस करण्यात आला होता तद्विषयक समितीवर श्री वि गो दाटये व डॉ भालेराव यांना स्वीकृत करून घेण्यात आले सभासदांच्या सूचना मागविण्या कळवून, त्यावर त्यांची मते मागवून नंतर अखरची बैठक घ्यावी असे ठरले त्यानुसार या समितीची बैठक पुणे येथे दि १४-६-४० ला झाली प्रा वनहट्टी, डॉ भालेराव व श्री गोगटे या उपस्थित सभासदांनी आराखड्यातील ८ कलमांचा विचार केल्यानंतर सभा तहकूब झाली

(२) विद्यापीठात नाट्यशास्त्र सुरू करण्यासंबंधीच्या समितीसंबंधीत

सभासदांबरोबर पत्रव्यवहार करण्यांत येऊन डॉ. भा. ना. गोखले यांनी मुंबईकडील व प्रा. वनहट्टी यांनी नागपूरकडील कार्य करावें असें ठरलें.

(३) रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाच्या ठरावासंबंधी श्री. टेंबे व इतरांबरोबर पत्रव्यवहार झाला परंतु त्यातून काही निष्पन्न झालें नाही.

(४) ठिकठिकाणच्या नगरपालिकाना नाट्यगृहे बांधण्याची विनंती करण्यात आली. त्यापैकी फक्त मुंबई कॉर्पोरेशनने नाट्यगृहाची योजना विचारांत घेतली.

(५) सांगली येथील शतसांवत्सरिक उत्सवाच्या समितीला, ती अधिक प्रभावी होणें कार्याच्या दृष्टीने सोयीस्कर असल्याने, योग्य ते अधिकार देण्यात आले. महाराष्ट्र साहित्यसमेलन, नाट्यसमेलन व शतसांवत्सरिक उत्सव हे तीनहि समारंभ एकमेकाना जोडून व एकाच मंडपात भरवावे असे ठरून त्याप्रमाणें सांगली समितीस आदेश देण्यात आला



अध्यक्ष वि दा सावरकर

# ३३. सांगली

१९४३

टिळक-युगातील क्रान्तिकारक देशभक्त—महान् कवि, नाटककार आणि समाज-सुधारक.

१८४३ मध्ये सांगलीच श्री विष्णुदास भावे यानी सांगलीचे अधिपति श्रीमंत आप्पासाहेब सांगलीकर यांच्या प्रोत्साहनानं 'सीतास्वयंवर' या मराठी नाटकाचा प्रयोग करून दाखविला या प्रयोगानं आधुनिक मराठी रंगभूमीच्या इतिहासाची प्राणप्रतिष्ठा झाली या क्रांतिकारक उपक्रमाला १९४३ मध्ये एक शतक पूर्ण होत आहे या शुभप्रसंगानिमित्त मराठी रंगभूमीच्या पहिल्या शतकाची सांगता करणारा एक भव्य महोत्सव साजरा करावा अशी कल्पना नागपूरच्या (१९३९) संमेलनात प्रथम मुखरित होऊन पुढील संमेलनातून ती अधिकाधिक स्पष्ट होत गेली निरनिराळ्या समित्या स्थापन झाल्या आणि त्यांच्या कार्याची सूत्रं झपाट्याने फिरू लागली सांगली ही मराठी नाट्यकलेची गंगोत्री असल्यानं शतसांवत्सरिक उत्सव तेथेंच व्हावा आणि त्यालाच जोडून नाट्यसंमेलनाचं ३३ वं अधिवेशन भरवावं अशी योजना पुढं येऊन मध्यवर्ति महाराष्ट्र नाट्यसंमेलनानें ती मान्यहि केली या दोन उत्सवांना जोडूनच मराठी साहित्य संमेलनाचं अधिवेशनहि प्रा श्री म माटे यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलं नाट्यसंमेलनाशी साहित्य संमेलनाचा प्रत्यक्ष संबंध नसल्यामुळं त्या संमेलनाचा परामर्श घेण्याची आवश्यकता नाही परंतु रंगभूमीचा शतसांवत्सरिक महोत्सव नाट्यसंमेलनाच्या आदेशावरूनच साजरा झाल्यामुळें नाट्यसंमेलनाचंच एक उपांग म्हणून संमेलनाच्या इतिहासात त्याला स्थान देणं क्रमप्राप्तच ठरतं

## शतसांवत्सरिक महोत्सव–सांगली

दि ५ नोव्हेंबर १९४३ ला सकाळी चौघडा व सनईच्या निनादात या उत्सवाला प्रारंभ झाला या उत्सवाचे अध्यक्षस्थान स्वातंत्र्यवीर वि दा सावरकर यांनी मंडित केले होते

समारंभाच्या सुरवातीलाच एक ल्हानसा अपघात होऊन सर्व समारंभाचा विरस होतो की काय अशी शंका निर्माण झाली परंतु थोड्याच अवधीत स्थिरस्थावर होऊन स्वागतगीताचे मंगलस्वर ऐकू आले

स्वागतगीतानंतर समारंभाचे स्वागताध्यक्ष श्री रा सा बा गो भावे सर्वांचे स्वागत करून म्हणाले 'देशातील अस्थिर परिस्थितीमुळे हा उत्सव अधिक मुदतीचा करणे शक्य नाही, त्यामुळे हा अल्पावधीचा कार्यक्रम सर्वांनी गोड मानून घ्यावा मराठी नाट्यकला सांगलीच्या राजाश्रयानेच सुरू झाली आणि आजहि ती त्याच्याच आश्रयाने भरभराटीस येणार आहे आजच्या श्रीमंताच्या पूर्वजांनी आपल्या आश्रित मंडळींना नट म्हणून कै विष्णुदासाच्या साहाय्यास दिले, त्याचप्रमाणे दागदागिने, शेले, पैठण्या व इतर वस्त्रेंहि दिली तशीच चिरंतन अधिक आठवणीत भरणारी गोष्ट म्हणजे श्रीमंत राजेसाहेबांनी नाट्यविद्यामंदिरासाठी नुकतीच आपली जागा दिली ही होय

भाषणाच्या शेवटी स्वागताध्यक्षांनी स्वा. सावरकर यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली. त्याच्या सूचनेला अनुमोदन मिळाल्यानंतर अध्यक्ष स्थानापन्न झाले.

अध्यक्षांना पुष्पहार समर्पण होऊन संदेशवाचन आणि महाराष्ट्र रंगभूमि शतसांवत्सरिक उत्सव समितीचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांचे भाषण हे कार्यक्रम झाले. श्री. केळकर यानी उत्सवाच्या कल्पनेची प्रारंभापासूनची हकीकत सांगून सांगलीच्या राजेसाहेबाना नाट्यविद्यामंदिराचा शिलान्यास करण्याची विनंती केली त्याप्रमाणे विद्यामंदिराची पायाभरणी झाल्यानंतर श्रीमंतांचे भाषण होऊन शतसांवत्सरिक उत्सवाचे अध्यक्ष स्वा सावरकर यांच्या भाषणास प्रारंभ झाला.

*चित्रपट हा नाटकाचा विकास*

ऐतिहासिक आधाराने मराठी रंगभूमीच्या मूळपीठिकेचा मागोवा घेऊन स्वा. सावरकर म्हणाले, "विष्णुदास भावे, अण्णासाहेब किर्लोस्कर व श्री. फाळके या तिघांच्या नावात रंगभूमीची सर्व स्थित्यंतरें सामावलेली आहेत.

नाट्य मेले असा जो सध्या समज होत चालला आहे, तो चुकीचा आहे. चित्रपट हा नाटकाचा विकास आहे. चित्रपटाने नटाची कृति अमर होते... केवळ आनंदनिर्मिति हे नाटकाचे कार्य नाही. संसाराचे यथातथ्य प्रतिबिंब म्हणजेहि नाटक नव्हे. संसार कसा असावा हेंहि नाटकाने दाखविले पाहिजे.

## सन्माननीयांचा सन्मान

अध्यक्षांच्या भाषणानंतर त्यांच्याच हस्ते रंगभूमीचे आद्य जनक कै विष्णुदास भावे यांच्या, रा सा भावे यांनी लिहिलेल्या चरित्राचे प्रकाशन करण्यात आले

या उत्सवातील एक उल्लेखनीय कार्यक्रम म्हणजे मराठी रंगभूमीच्या आणि महाराष्ट्राच्या इतिहासात थोर कर्तृत्व दाखवणाऱ्या काही ज्येष्ठ आणि श्रेष्ठ मानकऱ्यांचा सांगलीच्या सौ राणीसाहेबांच्या हस्ते करण्यात आलेला सन्मान ही होय या सन्माननीयांची नावे –(१) नाट्याचार्य खाडिलकर, (२) साहित्यसम्राट न चिं केळकर, (३) रियासतकार गो स सरदेसाई, (४) श्री भा वि वरेरकर, (५) कर्मवीर वि रा शिंदे, (६) नटसम्राट बालगंधर्व व (७) नटश्रेष्ठ केशवराव दाते

रात्री मराठी रंगभूमीवरील प्रथम श्रेणीतल्या कलावंतांनी एकत्र येऊन सादर केलेल्या 'शारदा' नाटकाच्या प्रयोगानें शतसांवत्सरिक उत्सवाची सांगता झाली या नाट्यप्रयोगाने मराठी रंगभूमीच्या पहिल्या शतकातील अविस्मरणीय अशा गायनाभिनयाचे उपस्थित रसिकांना साक्षात् दर्शन घडले या प्रयोगातील प्रमुख भूमिका अशा होत्या श्रीमंत– श्री चिंतोबा गुरव, नटी व इंदिराकाकू – श्री बालगंधर्व, कांचनभट – श्री गणपतराव बोडस, कोदंड – श्री लोंढे, भद्रेश्वर – श्री चिंतामणराव कोल्हटकर, शारदा, – मा नरेश व सुवर्णशास्त्री – श्री केशवराव दाते

## उत्सवाची फलश्रुति

सांगलीसारख्या ठिकाणी शतसंवत्सरिक उत्सवाचा महोत्सव शंभर टक्के यशस्वी होणे कठीणच होते हा उत्सव, नाट्य-संमेलन व साहित्य-संमेलन असे तीन कार्यक्रम एकाच वेळी आल्यामुळे स्थानिक कार्यकर्त्यांची तारांबळ उडाली नसती तरच नवल आणि म्हणूनच 'हा उत्सव प्रचंड अव्यवस्थेने साजरा झाला' असे उद्गार जाणत्या माणसाच्याहि तोंडून निघाले तथापि या नैमित्तिक उत्सवाला हृ गालबोट लागले तरी या उत्सवापासून रंगभूमिविषयक विविध प्रयत्नांना जी चाल मिळाली त्या दृष्टीनच या शतसांवत्सरिक उत्सवाचे यशापयश मोजले पाहिजे या उत्सवानें काय साधले याचे वर्णन

करताना प्रा बनहट्टी म्हणतात, "हा उत्सव एकाच ठिकाणापुरता सीमित ठेवावा अशी अखिल महाराष्ट्रीय उत्सवमंडळाची मूळातच कल्पना नव्हती हा उत्सव गावोगाव व्हावा आणि त्यातून रंगभूमीविषयीचे मराठी जनतेचे प्रेम तर व्यक्त व्हावेच पण रंगभूमीविषयक कार्यालाहि चालना मिळावी, असा मंडळाचा हेतु होता त्याप्रमाणे सुमारें ७५ गावी उत्सव साजरे झाले आणि अपेक्षेप्रमाणें पुष्कळ ठिकाणी नाट्यविषयक कार्याला चालना मिळाली काही ठिकाणी या उत्सवातून नाट्यमंडळें निघाली काही ठिकाणी सालोसाल तर काहीं ठिकाणी वर्षा अधिक कालांतरानें नाट्यमहोत्सव करण्याची प्रेरणा उत्पन्न झाली त्यातून नवीन नाटकें रंगभूमीवर आणली गेली जुन्या गाजलेल्या नाटकांचे पुनरुज्जीवन किंवा नवीनकरण करण्यात आले रंगभूमीकडे समाजाचे पुन्हा लक्ष वेधण्याचा हेतु फार चांगल्या रीतीने सिद्धीस गेला [1]"

## नाट्यसंमेलन

शनिवार दि ६ नोव्हेंबर १९४३ ला नाट्यसंमेलनाच्या ३३ व्या अधिवेशनाला प्रारंभ झाला संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री ना वि कुलकर्णी हे होते. स्वागताध्यक्ष श्री न ग कमतनूरकर यांनी सांगली या मराठी रंगभूमीच्या आदिपीठाने रंगभूमीसाठी अव्याहतपणें आणि अनेक परींनी जे परिश्रम केले, बीज सांभाळले व तिला संपन्न केले त्याचे सविस्तर वर्णन केले श्री देवल, श्री वाडस आणि श्री शिरगोपीकर यांच्या नाट्यसेवेचा उल्लेख करून स्वागताध्यक्षांनी नाट्यविद्यामंदिराच्या स्थापनेचाहि निर्देश केला चित्रपट व नाटक यांच्यातील फरक दाखवताना ते म्हणाले, "नाटकाला जिवंत माणसाचा आधार असतो तर चित्रपटाला निर्जीव यंत्राचा व्यापारी दृष्टीने पाहिले तरी चित्रपटाची सर्व साधनं परदेशी असल्याने भांडवलाचा बराच मोठा भाग परदेशी पाठवावा लागतो, उलटपक्षी नाटकाच्या व्यवहारात, पैसा या देशातच राहतो या दृष्टीने नाटकाचा धंदा राष्ट्रीय दृष्ट्याहि किफायतशीर आहे—बोलपट हे प्रभावान नाटकाहून श्रेष्ठ ठरणे अशक्य असल्याने त्यांनी आज जरी मराठी रंगभूमीवर आक्रमण केले असले

१ मराठी नाट्यकला आणि नाट्य वाङ्मय, पृ २०२–२०३

तरी त अल्पजीवीच ठरणार आह नाटयलखनासवधी ते म्हणाऽ लाको पयोगी व अभग अशी नाटक निर्माण करताना नाटकाच्या बाहयागात सुधारणा करण भाग असल्यास ती अवश्य करावी बहुजनाच्या दु खाना इच्छाना व आशाना ताड फोडणारी नाटके लिहिली जातील तर आमच्या नाटयकलेला उमाप आश्रय मिळण्यास अडचण पडणार नाही शवटी विचारवतानी नाटयकलेचे गमावलेले धर (नाटयगृह) तिला परत कसे मिळल याचा विचार करावा असे सागून श्री कमतनूरकर यानी श्री ना वि कुलकर्णी याना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनति कली त्याच्या सूचनेला अनुमोदन मिळून अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर त्याना विविध सस्थाच्या वतीने पुष्पहार समपण करण्यात आले

समेलनाचे चिटणीस डा बरवे यानी मागील समेलनापासून वषभरात यालेल्या कार्याचा वृत्तात सादर केला स्थानिक व प्रादेशिक समित्या घटनासमिति याच काय अप्रकाशित नाटकाच्या परीक्षणाचा उपक्रम विद्या पीठात नाटयशाखाची स्मापना व शतसावत्सरिक उत्सवाच्या विविध समि त्याच्या कामाचे वत्त डा बरवे यानी सादर केले[१] प्रकाशन समितीच्या कार्यासवधी चिटणिसानी सागितल की मराठी रगभूमीचा सागोपाग इतिहास महाराष्ट नाटयकोश व नाटयविषयक लेखसग्रह असे तीन ग्रथ उत्सवाच्या निमित्ताने प्रसिद्ध व्हावयाचे असून त्यापैकी पहिल्या दोन ग्रथाच काम कार्याध्यक्ष प्रा बनहट्टी याच्या देखरेखीखाली चालू आहे तिसऱ्या ग्रथाचे सपादकत्व श्री के नारायण काळे यानी पत्करिले आहे कार्याध्यक्षानी अनेक ठिकाणा जाऊन नाटयविषयक सशोधन केले असून गली दोन वर्षे माहिती जमविण्याच काम चालू आहे आज महाराष्ट्रात इतरत्र कुठहि नसल एवढा नाटयविषयक माहितीचा सग्रह समेलनापाशी जमला आहे

## रगभूमीचे मराठपण

चिटणिसाच्या अहवालानतर समेलनाचे अध्यक्ष श्री ना वि कुलकर्णी याचे भाषण झाले ते म्हणाले गल्या शभर वर्षांतील महाराष्ट्राच्या जीवनास

१ हे वृत्त पूर्वी ३२ व्या समेलनाच्या हकीकतीनतर दिले आहेच

वैचारिक दृष्टिकोणात, इतकेच नव्हे तर पापास वगैरेंतहि कमालीचे फरक पडले आहेत ते इष्ट का अनिष्ट हा आजचा प्रश्न नाही परंतु आमच्या रंगभूमीने आणि नाटयाने अस्सल महाराष्ट्रीयत्व अबाधित राखले आहे दुर्दम्य आशावाद, आक्रमक झुंजारवृत्ति, कमालीचा चिवटपणा, प्रखर बुद्धिवादित्व हे महाराष्ट्राचे स्वभावविशेष आहेत मराठी नाटयात या स्वभाव विशेषाचे पडसाद दिसत असून त्याचा परिपोष अखंडपणे होत आला आहे"

किर्लोस्करांच्या युगापासूनचे देवल, खाडिलकर इ पूर्वीचे व आजचे गडकरी रांगणेकर, मामासाहेब गोखले, वसंत कानेटकर इ नाटककार यांच्या नाटय-वाङमयातून झुंजार व आशावादी महाराष्ट्रीय वृत्तीच प्रगट झालेली आहे असे सांगून श्री कुलकर्णी यांनी नट व नाटककार यांच्यातील संबंधाचे स्पष्टीकरण केले ते म्हणाले, "नाटककार व अभिनेता ( आणि अभिनेत्री ) हे परस्परपूरक आहेत नाटककाराचे माध्यम शब्द तर अभिनेत्याचे माध्यम अभिनय दोघांचीहि कलानिर्मिति सारख्याच मोलाची दोघांनाहि विविध स्वरूपाच्या जनमनाशी समरस व्हावे लागते आदर्श नाटककार जसा व्यक्तिनिष्ठ राहून चालत नाही तसेच नटांचेहि आहे' मराठी रंगभूमीवरील बालगंधर्व, भाऊराव कोल्हटकर, गणपतराव जोशी, बोडस, पोतनीस, टिपणीस, दाते पेंढारकर इ अभिनयसंपन्न नटांचा गौरव केल्यानंतर श्री कुलकर्णी यांनी ही परंपरा खंडित का झाली यासंबंधी आपले मत सांगितले ते म्हणाले, ' आमच्यामधील कलावंतांनी संपत्ति आणि कीर्ति यांच्या मोहापासून अलिप्त राहण्याची तत्त्वनिष्ठ वृत्ति राखावी तशी राखली नाही नट व्यक्तिनिष्ठ झाले स्वतःची कीर्ति लहरी, मालकांच्या भावना यांची विषारी रोपटी फोफावून रंगभूमीचा दर्जा व कलेची प्रतिष्ठा ही दुय्यम ठरली'

मराठी नाटयवाङमय व रंगभूमि यांना लाभलेल्या टीकाकारांचे लेखन अत्यंत उपकारक झाल्याचे मान्य करून वृत्तपत्रे व नियतकालिके ही मात्र असावीत तशी दक्ष व तत्वनिष्ठ नाहीत असे मत अध्यक्षांनी व्यक्त केले प्रेक्षक हा जो नाटयाचा सर्वांत मोठा टीकाकार, त्याच्या कार्याविषयीहि नापसंती व्यक्त करून महाराष्ट्र महिलांनी मात्र अभिरुचीची शुद्धता राखली त्याचा अभिप्राय अध्यक्षांनी व्यक्त केला अस्थिर वातावरण हे नाटयाच्या प्रगतीस अनुकूल नाही हे मत आपल्याला मान्य नसल्याचे सांगून शेवटी

अध्यक्षानी रंगभूमीचे दैन्य नाहीसे होऊन तिला स्थिरता यावी या दृष्टीने व्यापक पायावर योजना आणण्याची आवश्यकता आहे असे सांगून आपले भाषण संपविले

ग्रंथप्रकाशन—कै धुंडिराज गोविंद फाळके यांचे चरित्र—ले श्री गाडे व श्री जक्कल यांनी लिहिलेल्या नाटकाचे प्रकाशन जाहीर करण्यात आले

## चर्चा व ठराव

या संमेलनात एकूण पाच ठराव मंजूर झाले, त्यापैकी पहिला ठराव दुखवट्याचा होता

दुसऱ्या ठरावात नाटककार श्री मामा वरेरकर यांनी ८१ व्या वर्षात पदार्पण केले म्हणून त्यांना अभिनंदन करण्यात आले

हे दोन्ही ठराव अध्यक्षांनी मांडले तिसरा एक ठरावहि अध्यक्षांनीच मांडला त्याचा आशय, 'राष्ट्राच्या एकीकरणाच्या दृष्टीने सर्व भेदांकडे दुर्लक्ष करून बहुजन समाजाची एकजूट करण्याचा प्रयत्न प्रभावी नाट्य-वाङ्मयाच्या साहाय्याने मराठी नाटककारांनी करावा' असा होता

श्री के ना काळे यांनी पुढील ठराव मांडला—विद्यमान असलेल्या मराठी रंगभूमीवरील नटांचा व त्यांच्या व्यक्ति-वैशिष्ट्यात्मक गुणांचा परिचय होऊन त्यांची स्मृति चिरकाल राहावी म्हणून नाटचप्रसंगाचे चित्र-पटाच्या रूपाने चित्रीकरण करण्यात यावे हे कार्य करण्यासाठी पुढील गृह-स्थांची एक समिति असावी–(१) श्री. टेंबे, (२)श्री वरेरकर, (३) श्री कोल्हटकर, (४) श्री दाते, (५) श्री के ना काळे, (६) श्री श्री वा रानडे, (७) श्री पार्श्वनाथ आळतेकर, (८) श्री भालजी पेंढारकर व

सभासद — (१) श्री. टेंबे (निमंत्रक), (२) श्री. ना. वि. कुलकर्णी, (३) श्री. के. ना. काळे (चिटणीस), (४) श्री. दाते, (५) डॉ. भालेराव, (६) श्री. ना. तु. ठाकूर, (७) श्री. वरेरकर, (८) श्री. भालजी पेंढारकर, (९) श्री. पुरोहित, (१०) प्रा. वनहट्टी व (११) श्री. बापुराव जक्कल.

अध्यक्षीय समारोप व आभारप्रदर्शन होऊन संमेलन संपलें.

## करमणूक व प्रदर्शन

शतसांवत्सरिक उत्सव व नाट्यसंमेलन या निमित्तानें करमणुकीचे अनेक कार्यक्रम सांगली येथें झाले. त्यात सांगली येथील हौशी कलावंतानी बसविलेलें कमतनूरकरकृत 'शस्त्रसंन्यास' हे नाटक, नागपूरच्या अभिनव नाट्यमंदिराने सादर केलेलें श्री. वरखेडकरकृत 'पूर्वग्रह' हें नाटक व विविध नाट्यप्रवेश या कार्यक्रमाचा निर्देश करणें जरूर आहे.

याच सोहळ्यानिमित्त नाट्यविषयक साहित्य व चित्रकला याचें प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें, त्याचें उद्घाटन स्वा. सावरकर यांच्या हस्तें झालें. प्रदर्शनांतील श्री. आर. डी धोपेश्वरकर यांच्या नाट्यविषयक भारतीय पद्धत या चित्राला स्पर्धेत पहिला क्रमांक मिळून रौप्यपदक देण्यात आलें.

## मध्यवर्ती संमेलनाचें काम-काज

नोव्हेंबर १९४३ ते डिसेंबर १९४६ या कालावधीत कार्यकारी मंडळाच्या ३ सभा झाल्या. या सभांतून ३४ व्या संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी तीन नावाचें पॅनेल सुचविणें व घटनाविषयक किरकोळ निर्णय घेणें एवढाच कार्यभाग झाला. संमेलन संस्थेचें एक मासिक असावें ही श्री. कमतनूरकर यांची सूचना पुढें विचारांत घ्यावी असें ठरलें.



अध्यक्ष मा ना जोशी

# ३४. जळगांव

१९४४

'विनोद' आणि 'स्थानिक स्वराज्य' या स्वतंत्र शैलीच्या विनोदी नाटकाचे लेखक.

हे संमेलन जळगाव येथील नटवर नाट्यगृहात १९४४ च्या दि २८ ते ३० डिसेंबरपर्यंत स्थानिक नाट्यसमितीच्या वतीने भरविण्यात आले होते विनोदकर्ते श्री माधवराव जोशी यांची संमेलनाचे अध्यक्ष म्हणून निवड झाली होती श्री बालगंधर्व हे संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते

दि २८ रोजी सकाळी १० वाजता वेदोक्त मंत्रघोषात संमेलनाला प्रारंभ झाला स्थानिक समितीच्या कार्याध्यक्ष सौ गिरिजाबाई केळकर यांचे प्रास्ताविक भाषण झाले संमेलनाचे नियोजित उद्घाटक श्री तात्यासाहेब केळकर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे उपस्थित राहू न शकल्याने त्यांनी लिहून पाठविलेले भाषण सौ गिरिजाबाई केळकर यांनी वाचून दाखविले आपल्या भाषणाच्या प्रारंभी रंगभूमीच्या नव्या स्वरूपातील संसाराविषयी जे विविध प्रकारचे प्रश्न उभे राहिले आहेत त्यांची एक प्रश्नमालिका श्री केळकरांनी नमूद केली होती त्यातील काही प्रश्न असे—नाट्यकलेला समाजजीवनात अवश्य असे स्थान आहे की नाही? असल्यास ही कला जिवंत ठेवण्यास काय केले पाहिजे? नव्या अभिरुचीला अनुसरून नाट्यकलेच्या तंत्रात काही सुधारणा करणे प्राप्त आहे की काय? धंदेवाले नट व हौशी नट यांच्या तील भेद दिवसेंदिवस कमी होईल की नाही? कुलीन स्त्रियांनी नाटकात कामे करावी की नाही? स्त्रियांच्या शीलाप्रमाणे पुरुषांच्या शीलालाहि

महत्त्व आहे असें मानावयाचें की नाही? नाट्यप्रयोग होऊं न शकले तरी नाटकांना वाङ्मयात योग्य स्थान मिळेल की नाही? इ. इ.

श्री. केळकरांना या प्रश्नाची जी उत्तरें सुचतात त्याचा ढोबळ निष्कर्ष त्यांनी असा सांगितला–, "नाट्य ही अति प्राचीन कला आहे; मात्र तिची निरनिराळी रूपांतरें झालेलीं आहेत. इतर कलांच्या मानानें नाट्याला थोडा कमीपणा देण्यांत येतो, याचें कारण असें असावें की कृत्रिमता आणावी लागते; म्हणून नटाचें कौतुक झाले तरी त्याची कला थिल्लरपणात जमा होते. जें हुंमू निर्माण करते ते स्वत. हास्यास्पद होते. तथापि नाट्यकलेचें श्रेष्ठत्व तीत मनुष्यस्वभावदर्शन चांगलें होतें यांत आहे. इतर कलांत जीवनाच्या एखाद्या वैशिष्ट्याचें अनुकरण आढळेल परंतु नाटकात अनेक कलांना प्रकट होण्याची संधि मिळते." आपल्या भाषणाच्या शेवटी, श्री. केळकर यांनी नाट्यगृहे उभारण्याची सूचना केली होती.[१]

स्वागताध्यक्ष श्री. बालगंधर्व यानी आपल्या बाळपणच्या जळगांव येथील वास्तव्यातील आठवणी सांगून कै. देवल व खाडिलकर याच्यासारखे नाट्य-शिक्षक लाभल्यामुळेंच आपण रंगभूमीवर यश संपादन करूं शकलो असे कृतज्ञतापूर्वक सांगितले. रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाच्या प्रश्नासंबंधी बोलताना ते म्हणाले, "हल्ली नाटक कंपन्याना थिएटरें नाहीत. जी मिळतात त्यांचें भाडें परवडत नाही. यासाठी जागोजाग, मोठमोठ्या शहरांतून नगर-पालिकांनी व धनिक व्यापाऱ्यांनी नाटक मंडळ्यांसाठी व हौशी कलवांसाठी नाटकगृहें बांधून ठेवणें आवश्यक आहे... सरकारनें करमणुकीवर भयंकर कर लादल्यामुळें आमच्यासारख्यांचें जीवन मोठें कठीण होऊन बसले आहे. .

आपले भाषण संपविले सदस्यवाचनानंतर सकाळचा कार्यक्रम संपला

दुपारच्या खुल्या अधिवेशनात प्रा बनहट्टी यांनी अध्यक्षीय नावाची सूचना मांडली तिला अनुमोदन मिळून अध्यक्ष स्थानापन्न झाले अध्यक्षांचा सत्कार व त्यांच्या हस्ते श्री मो द अळ्हे यांच्या एका नाटकाचे प्रकाशन हा कार्यक्रम होऊन अध्यक्षांनी आपले भाषण वाचून दाखविले

धजत नगत त्या वेळी पुरुषांनी कांहीं कांहीं कामें इतकी हुबेहूब केली की त्याचा अभिनय पाहून स्त्रियाहि चकित होत. याचें मूर्तिमंत उदाहरण म्हणजे आजचे स्वागताध्यक्ष हे होत! पण आता ते दिवस गेले. आता कुलीन स्त्रियांनी कामें करावी कां नाहीं हा वाद निर्माण झाला आहे.

या वाढत्या सुधारणेच्या काळांत चौफेर, सिनेमातून स्त्रियांची कामें स्त्रियाच करीत असल्याने रंगभूमीवर त्याचा कां प्रसार होऊं नये? अवश्य व्हावा. स्त्रियाचा अभिनय, वाणी, अंगलट, कोमलता यांनी पुरुष कितीहि नटला तरी तें लोकांना कसें आवडणार? फक्त थोडासा वाद आहे तो 'कुलीन स्त्री' या शब्दप्रयोगाचा. ज्या स्त्रीस आपले शील खंबीर राखण्याची ताकद असेल, नवरसात्मक रंगभूमीवरील वातावरणात आपण कोणत्याहि रसात मोहित होणार नाहीं, *वळी पडणार नाहीं अशी मनाची गंभीरता असेल* तिनें खुशाल नाटक कपनीत शिरावें.

## नट व नाटककारांची तपश्चर्या

नाटकांतील विविध भूमिका समजावून घेऊन, त्या भूमिकेत एकरूप होऊन ती यशस्वीपणे वठविणें हें काम सोपें नव्हे. त्यासाठी नटासहि एक प्रकारचा अभ्यास करावयास पाहिजे. कोणीहि स्वयंभू नट होऊं शकत नाहीं. कै. गणपतराव जोशी, भागवत, बालगंधर्व इ. नामवंत नटानी मुद्दाम बुद्धिपुरस्सर कुशल नाटककारांनी लिहिलेली नाटकें किती यशस्वी करून दाखविली हें सर्व महाराष्ट्रास विदित आहेच.

नाटक सहेतुक लिहिलें पाहिजे. तें जर तसें नसेल तर कोणता हेतु सफल करून दाखविण्यासाठी नटानें आपलें अभिनयकौशल्य दाखवावें! नाटककारांस यशस्वी नाटयकार होण्यासाठी निदान ८।१० वर्षांच्या अभ्यासाची जरुरी आहे. होतकरू नाटककारानी प्रथम आपल्या संतकवींची आणि नतर आजच्या साहित्यिकांची पायधरणी केली पाहिजे. कीर्तिवंताच्या सरस्वतीचा होतकरू नाटककारानें जर प्रामाणिकपणानें अभ्यास केला तर त्याचीदेखील वाणी चैतन्ययुक्त, ओधवती व तेजःपुंज झाल्याविना राहणार नाहीं. त्यानंतर त्यानें पाश्चात्य कवींची नाटकें जरूर अभ्यासली पाहिजेत.

नाटकाचा विषय असा असावा कीं तो बहुजन समाजाचें रंजन करील;

मग तो पौराणिक असो, सामाजिक असो वा ऐतिहासिक असो स्वभाव-वैचित्र्य व भाषावैचित्र्य यानी नटलेले कथानक आणि त्यात मधूनमधून पेरलेली सस्मरणीय सुभाषिते यानी सजलेले नाटक नटाच्या कडेवर न बसता ते नाटकच नटाना आपल्या खाद्यावर घेते

हल्लीच्या समाजाच्या गोंधळलेल्या स्थितीत राष्ट्र निर्माण करणारी नाटयनिर्मिति झाली पाहिजे लोकानी निवडून दिलेल्या सभासदानी, लोककल्याणार्थ लोकानी स्वाधीन केलेली सत्ता कशी वापरावी याचे चित्र यथातथ्य दाखविणे, मग ते उपहासात्मक, विडबनाने दाखवलेले का असेना, त्यासच मी राष्ट्र निर्माण करणारी नाटके म्हणतो

## अवनति व उन्नति

बोलपटामुळे नाटके मागे पडली ही हाकाटी व्यर्थ आहे बोलपट हा नाटकावर केव्हाहि मात करू शकत नाही नाटककपन्या बुडाल्या याला माझ्या मते, नाटयगृहाची वाढती दुर्मिळता, सध्याची महर्गता, नटाचा गाफिलपणा व बेदरकारपणा ही कारणे आहेत

माझ्या मतान रगभूमीच्या पुनरुज्जीवनाची जबाबदारी आता जागोजाग असलेल्या हौशी मडळीवर आहे त्यानी चागले प्रयोग बसवून घेऊन, त्याचे जागोजाग प्रयोग करावेत फड व देणग्या जमा करून त्यातून नगरपालिकेच्या मदतीने थिएटरे उभारावीत व ती नाटककपन्याना अल्प भाड्यान द्यावीत

## विषयनियामक समितीचे काम

मानाचा गौरव, गुणदोषासंबंधी चर्चा, मराठी रंगभूमीच्या नव परिस्थिती-संबंधी विचार, नाट्य-दर्शन व उपस्थित पाहुण्याचा परिचय इत्यादींचा समावेश व्हावा"

या योजनेचा विचार होऊन तसा आशयाचा ठराव खुल्या अधिवेशनात मांडावा असे ठरले

श्री देशमुख यांची संघटनाविषयक योजना पुढीलप्रमाणे होती —"समाईक भांडवलाचे, मर्यादित जबाबदारीचे 'महाराष्ट्रीय नाट्यमंडळ' स्थापण्यात यावे संकल्पित भांडवल २ ते ३ लाखांचे असावे संघटना चालविण्याकरता बोर्ड ऑफ डायरेक्टर्स असावे संघटनेची एक आर्थिक व नाट्यप्रयोग समिति असावी नाटकाची निवड करणे, प्रायोगिक संघ चालविणे, नटांना शिक्षण देणे इ कामे प्रयोगसमितीने करावीत इ इ" श्री देशमुखांनी आपली योजना समजावून सांगितल्यानंतर त्यातून उद्भवणाऱ्या प्रश्नांचा साधकबाधक विचार करून पुढे केव्हातरी ती योजना विचारार्थ मांडावी असे ठरले

*चिटणीस डॉ वरवे, यांनी वार्षिक अहवाल सादर केला त्यात स्थानिक* समित्या, घटना समिति, शतसांवत्सरिक उत्सव मंडळ यांच्या कार्यांचा वृत्तांत सादर केला होता महाराष्ट्रभर साजरे झालेले शतसांवत्सरिक उत्सव, रंग-भूमीच्या इतिहासलेखनाची आजवर झालेली तयारी, नाट्यविद्यामंदिराचे कार्य यासंबंधीचे निवेदन केल्यावर संमेलनाच्या शतसांवत्सरिक उत्सवाला

पदें नादमधुर व काव्यमय असली तरी सोपी होती देवलांनी तीच प्रथा चालवली परंतु कोल्हटकरांच्या संगीतावर उर्दू नाटकाची बरीच छाप पडल्यामुळें त्यांच्या पदांच्या चाली नाविन्यपूर्ण असल्या तरी पदें मात्र क्लिष्ट व संस्कृतप्रचुर झाली पुढें खाडिलकरांनी गायकी पदांची सुरुवात केल्यामुळें त्यांच्या नाटकांचे जलसे होऊं लागले नाटकांतील संगीत प्रमाणशीर व योग्य प्रसंगीच घातलेले असावें अस्वाभाविक व प्रसंगाचा विरस करणारें नसावें

चर्चेत भाग घेताना स्वागताध्यक्ष श्री बालगंधर्व म्हणाले, ' संगीतामुळें कलेचा व रंगभूमीचा ऱ्हास झालेला नाही त्यास इतर कारणें आहेत काही नट तानबाजीमुळें रसाचा अपकर्ष करतात हें मात्र खरें आहे आपणाच्या अखेरीस रसानुकूल संगीत कसें असावें याचें प्रात्यक्षिक म्हणून श्री बालगंधर्वांनी शारदा व शाकुंतल नाटकांतील काही चरण म्हणून दाखविले

श्री ब्रह्मे यानी संगीतामुळेंच रंगभूमि जगली हें सौभद्रापासून कुलवधू नाटकापर्यन्तचा आढावा घेऊन सांगितलें प्रा द रा गोमकाळे यांनी, ' भावना परिपोषासाठी संगीत अवश्य आहे असें प्रतिपादन करून त्याच्या समर्थनासाठी त्यानी ' एकच प्याला ' नाटकांतील सुधाकरानें दारू सोडल्यानंतर हर्षभरित झालेल्या सिंधूच्या तोंडून बाहेर पडणाऱ्या पदाचें उदाहरण दिलें चर्चेत श्री निजसुरे, श्री गंध सौ सुमतीबाई कोल्हटकर यांची भाषणें झाल्यानंतर डा घारपुरे यानी चर्चेचा समारोप केला

## कुलीन स्त्रिया व रंगभूमि

संमेलनात या विषयावरील चर्चेचा कार्यक्रम अतिशय रंगला कुलीन स्त्रियांनी रंगभूमीवर जाणें अनिष्ट आहे या मताचा हिरिरीनें प्रचार करणाऱ्या पुण्याच्या श्री कृष्णराव मराठ्यांनी चर्चेला प्रारंभ केला प्रथम त्यांनी ' कुलीन या शब्दाची महाभारत कालापासून जी व्याख्या रूढ आहे त्या अन्वयें ' समाजधारणेतील कुलीन स्त्रीचें जें अनन्यसाधारण महत्त्व आहे तें तसेंच राहण्यासाठी कुलीन स्त्रीनें रंगभूमीवर केव्हाहि पाऊल टाकता कामा नये असें आग्रहपूर्वक सांगितलें रंगभूमीच्या आवारांतील वातावरणाची मोहिनी नीतिमत्तेला बाधक ठरल्याशिवाय राहणार नाही हें श्री कृष्णराव मराठ्यांनी अनेक उदाहरणें देऊन सांगितलें

या विषयाची दुसरी बाजू मांडताना मुंबईचे प्रा आळतेकर म्हणाले, " स्त्रिया रंगभूमीवर गेल्या की त्या बिघडतात असे म्हणण्यात आपण स्त्रियांची बदनामी करीत आहोत सिनेमात स्त्रियांना १२ तास तोंडाला रंग लावून बसल्यानंतर प्रणय करावयास वेळच नसतो हा स्वतंत्र धंदा आहे इतर धंद्याइतकेच यातहि धोके आहेत मग याच धंद्यावर कटाक्ष का ? " सौ इंदिराबाई बापट म्हणाल्या, ' खंबीर मनाच्या व दृढ वृत्तीच्या स्त्रियांनीच रंगभूमीवर पदार्पण करावे कायेन व वाचेन शुद्ध ती कुलीन अशी कुलीन शब्दाची व्याख्या गृहीत धरून, हे कुलीनत्व टिकवणे शक्य असेल तर स्त्रियांनी रंगभूमीवर जावे " सौ इंदिराबाई पाटणकर म्हणाल्या, ' भगिनींना रंगभूमीवर काम करण्यास पुढे यावे असे जर बधुवर्गास खरोखरीच वाटत असेल तर, कलेच्या उत्कर्षासाठी तेथे जाणाऱ्या स्त्रीच्या शीलास किंचितहि धोका उत्पन्न होणार नाही अशी हमी बंधुवर्गाने दिली पाहिजे " श्री र घा कर्वे म्हणाले, " मी या प्रश्नाचा नीतिमत्तेच्या दृष्टीने विचार करीत नाही परंतु कलेच्या दृष्टीने स्त्रियांची कामें स्त्रियांनीच करणे इष्ट आहे पुरातन स्त्री भूमिका करणाऱ्या तरुण मुलांना खच्ची करण्याची अमानुष प्रथा काही ठिकाणीं असूनहि त्यांची कामें स्त्रियांसारखीं होत नसत तेथे जेव्हा स्त्रिया पुढें आल्या तेव्हा त्यांची रंगभूमि वैभवास चढली " श्री रा पु सगदेव यांच्या भाषणानंतर श्री के नारायण काळ म्हणाले विकारवश होऊन या प्रश्नाचा विचार होऊ नये सुरक्षित वातावरणाची हमी द्या असे आता सांगण्यात आले पण ही हमी कोण देणार ? आज तरी भाडवल्याने धनिक

रंगभूमीवर जाऊ नये हा पक्ष मांडला, तर श्री गोमकाळे व श्री ग वि गोखले यांनी स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीच केल्या पाहिजेत या मताचा पुरस्कार केला अध्यक्ष श्री माधवराव जोशी यांनी चर्चेचा समारोप करताना ही सुधारणा, कुलीन-अकुलीन असा वाद न माजवता तारतम्याने घडवून आणली पाहिजे असे आपले मत सांगितले

## संमेलनातील ठराव

प्रथमतः दुखवट्याचा ठराव अध्यक्षांनी मांडला व तो मंजूर झाला

आंतर शालेय नाट्यमंडळाची स्थापना, नाट्यसेवेबद्दल विद्यार्थीवर्गाचे अभिनंदन व ' रंगभूमि महोत्सव दिन ' साजरा करण्याचे आवाहन ' असे आणखी तीन ठराव संमेलनाच्या पहिल्या दिवशी मंजूर झाले

दुसऱ्या दिवशी (१) स्थानिक नगर संस्थांनी नाट्यगृहे बांधावीत, (२) नाट्यमहोत्सव करणाऱ्या संस्थांचे अभिनंदन करावे व (३) महाराष्ट्रीय रंगभूमीचे पुनरुज्जीवन करण्यासाठी ज्या योजना पुढे येत आहेत त्यांचा विचार करून अशा त हेची एक योजना तयार करण्यासाठी समिति नेमण्यात यावी असे तीन ठराव मंजूर करण्यात आले

अध्यक्ष श्री माधवराव जोशी अत्यंत भावनापूर्ण शब्दांत समारोप करताना म्हणाले, " नाट्यकला ही बहुजनसमाजाचे मनोरंजन करणारी कला आहे तिचे संवर्धन करण्यासाठी सर्वांनी कष्ट केले पाहिजेत "

हार-तुरे व आभारप्रदर्शन होऊन संमेलन समाप्त झाले पुढील वर्षाकरिता अहमदनगरचे आमंत्रण स्वीकारण्यात आले

## मध्यवर्ती संस्थेचें वर्षभरातील कार्य

(दि २१ डिसें १९४४ ते ३० एप्रिल १९४६)

या सुमारें १। वर्षांच्या कालावधीत मध्यवर्ती महाराष्ट्र नाट्यसंमेलनाच्या तीन सभा भरल्या होत्या

या काळांत देशांतील वातावरण अत्यंत तंग झालें होतें आणि त्याची उग्रता दिवसेंदिवस वाढतच होती कार्याध्यक्षांनाहि नागपूर ते अमरावती व तेथून पुन्हा नागपूर असें स्थलांतर करावें लागलें तथापि अशा परिस्थितीतहि संमेलन-संस्था तगवून तिचें काम त्यांनी चालू ठेवलें व जळगाव येथील संमेलनांत मंजूर झालेल्या ठरावांची यथाशक्य अमलबजावणी करण्याचा प्रयत्न केला

पुढचें अधिवेशन नगर येथें भरवावें की करवीर येथें यासंबंधीं बराच पत्रव्यवहार होऊन नगर येथील निमंत्रण कायम झालें व ३६ वें संमेलन करवीर येथें ठरवावें असें ठरविण्यांत आलें संमेलनाच्या स्थानाप्रमाणें अध्यक्षपदासंबंधींहि कांहीं वादळ निर्माण झालें मध्यवर्ती समितीनें आपलें अध्यक्षीय नावांचें पॅनेल सुचविण्याच्या दरम्यान नगरच्या स्थानिक मंडळींनी श्री. केशवराव दाते यांच्याशीं पत्रव्यवहार केला त्यामुळें श्री दाते यांना अडचणींत टाकल्यासारखें झालें शेवटीं मध्यवर्ती मंडळानें रीतसर खुलासा केला श्री दाते यांनीं आपला नकार कळविला आणि अध्यक्षपदासाठीं श्री चिंतामणराव कोल्हटकर अविरोध निवडून आल्याचें जाहीर करण्यांत आलें

याच काळांत (१) घटना-दुरुस्तीसाठीं नेमलेल्या समितीनें आपलें काम



अध्यक्ष • चिंतामणराव कोल्हटकर

# ३५. नगर

## १९४६

*सुप्रसिद्ध नट आणि दिग्दर्शक—बलवंत नाटक मंडळीचे एक संस्थापक—साहित्य आणि अभिनय या दोन्ही विषयात 'राष्ट्रपति पारितोषिक' मिळविणारे एकमेव नट आणि लेखक.*

नाट्यसंमेलनाचे ३५ वे अधिवेशन नगर येथील नाट्योत्तेजक मंडळाच्या विद्यमाने दि ४, ५ व ६ मे १९४६ या दिवशी मॉडर्न हायस्कूलच्या आंगणात उभारलेल्या राजविलास नाट्यमंदिरात साजरें झालें संमेलनाचे अध्यक्ष नटश्रेष्ठ श्री चिंतामणराव कोल्हटकर हे होते पूर्वीच्या संमेलनानंतर हें संमेलन भरण्यास ११ वर्षांचा कालावधि लागला याचे कारण संमेलनाच्या तारखा तेथील प्लेगमुळें लांबणीवर टाकाव्या लागल्या. मध्यवर्ती संमेलनाच्या दुरुस्त घटनेवर शिक्कामोर्तब करणारें हे संमेलन परकीय राजवटीतील अखेरचे संमेलन होतें.

मुख्य अधिवेशनापूर्वी मध्यवर्ती संमेलनाच्या साधारण सभेची बैठक होऊन चिटणिसांनी अहवाल सादर केला 'शतसांवत्सरिक-इतिहास प्रयासवर्धी कार्याध्यक्ष प्रा बनहट्टी यांनी एक स्वतंत्र पत्रक काढलें असून उत्सव-मंडळाच्या आजतागायतचा जमाखर्चहि छापून प्रसिद्ध केला आहे' असाहि खुलासा चिटणीस डॉ बरवे यांनी केला

### रंगभूमि व जनताभिमुखता

दुपारी ५॥ वाजता ईशस्तवनानें अधिवेशनास प्रारंभ झाला संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री रावसाहेब पटवर्धन आपल्या भाषणात म्हणाले, "रंगभूमि जनताभिमुख झाल्यावाचून तिचा उत्कर्ष होणे शक्य नाहीं सध्या एक मोठी क्रांति होत आहे ह्या क्रांतीचे परिणाम सर्व जगावर होत आहेत

सास्कृतिक मूल्यें बदलत आहेत जुना जमाना पार नाहीसा होत आहे ते भारी पडदे, भरजरी पडदे जुनी नाटक, जुने नाटककार आजच्या जगाला उपयोगी नाहीत त मार्गे पडत आहेत आजच्या कलावतानी आजच्या अभ्यानी व फडक्यानी भावताली होणाऱ्या क्रातीशी एकजीव झाल पाहिजे ऋतीचे पडसाद त्याच्या कलाकृतीत उतरल पाहिजेत नाटक अगर नाटच विषय हा सग्रामातून उत्पन्न होतो बचाळीमच्या रुढचान महाभारत निमाण केले आह हजारो कण, भीम अजुन दिसत आहेत त्याच्या जीवनावर नाटके आधारावयास पाहिजेत कलावत जनताभिमुख झाल तरच रगभूमीला

कामगिरी तिला करता आली. मराठी नाटकाप्रमाणे हिंदी, उर्दू आणि गुजराथी नाटकेसुद्धा बसवून दिल्ली-जगन्नाथपुरी-कलकत्यापासून तो मगरूळ बेल्लारीपर्यंत मुसाफिरी करून मराठी नाट्यकलेने आपलें प्रभावी अस्तित्व परप्रांतातहि जाहीर केलें इतकेंच नव्हे तर प्रयागसारख्या क्षेत्रात संस्कृत-नाटक बसविण्याचा विक्रमहि तिने केलेला आहे मराठी रंगभूमीच्या अशा चौफेर कामगिरीची आठवण झाली म्हणजे मराठी रंगभूमीइतकी लोकोत्तर नाट्यसेवा भारतवर्षातील दुसऱ्या कोणत्याहि रंगभूमीने केली नाही असे विधान करण्यात मला दिक्कत वाटत नाही

## बदलत्या काळाचा आघात

अशी आमची रंगभूमि काही वर्षांपूर्वी कायमची वनवासी झाली, कायमची मेली-असे सूर सर्वत्र ऐकू यऊ लागले तिच्या दुरवस्थेचे खापर नेमकें आम्हा जुन्या नाट्यसेवकांच्या कपाळावर फोडण्यात आले नाट्यकलेच्या संसाराचा खेळखंडोबा होण्यास अव्यवहारीपणा, गैरहिशोबीपणा किंवा बेपरवाईसारखे आमचे काही चुकलेले अंदाज कारणीभूत झाले असले तरी त्या दोषाचे हक्क

आता ही रंगभूमि वनवासी राहिलेली नसून आपल्या हक्काच्या जागी—म्हणजे शहरात परतली आहे तरीसुद्धा तिच्या भविष्यासंबंधीची काळजी माझ्या सारख्या जुन्या नटांना वाटू लागते नाट्यकलेचे भवितव्य डळमळीत आहे याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत —

(१) रसिकांचे लक्ष वेधून घेतील आणि नव्या नटांना जन्म देतील असा नाटककाराचा अभाव

(२) *नाट्यशिक्षकाच्या अभावी नाटकाचा* रसपूर्ण उत्कर्ष रंगभूमीवर दिवसेंदिवस दुर्मिळ होत चालला आहे

(३) ठिकठिकाणची नाटकगृहें चित्रपटाच्या कबजात गेल्यामुळें नाट्यव्यवसायिकांना निवाराच नाहीसा होऊन नाट्यकलेची सर्वत्र नाकेबंदी झाली आहे

(४) रंगभूमीच्या रोजच्या प्रसाराला अवश्य अशी प्रसिद्धि वृत्तपत्रें तिला देत नाहीत

## संमेलनातील घटनादुरुस्ती

मध्यवर्ती संमेलनाची घटना तयार करण्यासाठी एक आटोपशीर समिती नेमावी अशी सूचना प्रा बनहट्टी यानी केली ती मान्य होऊन श्री चिंतामण राव कोल्हटकर, प्रा बनहट्टी, डॉ वरवे, श्री सहस्रबुद्धे, श्री हिंगणगावकर आणि डॉ घारपुरे याची एक समिति नियुक्त झाली त्या समितीने संस्थेला अधिक व्यापक आणि प्रातिनिधिक स्वरूप देण्याच्या दृष्टीने पुढील महत्त्वाचे बदल सुचविले — (१) अखिल महाराष्ट्राचे ५ विभाग करून प्रत्येक विभागाला कार्यकारी मंडळावर १ जागा मिळावी (२) अध्यक्षीय पॅनेल तयार करण्याचा अधिकार सर्व सभासदाना मिळावा (३) संमेलनाध्यक्ष हा साधारण सभेचाहि अध्यक्ष असावा (४) संमेलनाची कचेरी नागपूरहून हालवावी असा एक मतप्रवाह असला तरी कार्यकारी मंडळ ठरवील तेथेच कचेरी राहावी इ. इ

## कुलीन स्त्रिया व रंगभूमि

या विषयावरील चर्चा गेल्या जळगाव संमेलनात चांगली रंगली होती. याहि संमेलनात श्री कृष्णराव मराठे यानी तशाच आशयाचा ठराव मांडून संमेलनात पुन्हा खळबळ उडवून दिली विषयनियामक समितीमध्ये हा ठराव नामंजूर झाल्यामुळे श्री मराठ्यानी जाहीर अधिवेशनात तो पुन्हा मांडण्याची सूचना ( Requisition ) आणली मात्र यदाच्या ठरावातून त्यानी 'होमे-

ठराव

संमेलनात मंजूर झालेले महत्त्वाचे ठराव पुढीलप्रमाणे —

(१) रंगभूमीच्या व्यवसायास शैक्षणिक दर्जा मिळवून देण्याचा जो प्रयत्न चालला आहे त्यास 'मुंबई, नागपूर व महाराष्ट्र विद्यापीठात स्थान मिळावे अशा आशयाचा ठराव करून' संमेलनाने आपला पाठिंबा व्यक्त केला.

(२) ठिकठिकाणी नाट्यगृह निर्माण करण्यासाठी नगरपालिकासारख्या सार्वजनिक संस्थांना जाग्या करून कार्यप्रवृत्त करण्याचा एक ठराव मंजूर झाला.

(३) घटना समितीचा अहवाल सभेपुढे मांडण्यात येऊन दुरुस्त घटना वाचून मंजूर करण्यात आली.

करमणूक

सुशिक्षित व हौशी कलावंतांनी सादर केलेल 'उद्याचा संसार', धडवाईक कलावंतांनी सादर केलेले 'सौभद्र' व 'ववदशाही' हे नाट्यप्रयोग आणि श्री गोपाळराव भोंड यांच्या नकला हे मनोरंजनाचे कार्यक्रम झाले. सौभद्र नाटकात श्री बालगंधर्व (अर्जुन) सौ हिराबाई बडोदेकर (सुभद्रा) श्री पेंढारकर (नारद) इ. कलावंतांनी भाग घेतला होता.

यानी गृहमंत्री श्री मोरारजी देसाई व स्थानिक-स्वराज्य मंत्री श्री वर्तक यांच्याकडे शिष्टमंडळ नऊन पुढील विषयावर चर्चा केली

( i ) बंगाल प्रांताप्रमाणे 'नाटक' हा विषय, ज्यावर करमणुकीचा कर आकारला जातो अशातून वगळण्यात यावा किंवा

( ii ) कराची आकारणी कमी करावी

( iii ) मुंबई इलाख्यात एकदा पास झालेले नाटक पुन पास करून घ्यावे लागू नये

( vi ) ज्या ज्या ठिकाणी नगरपालिका असतील त्या त्या ठिकाणी नाट्य गृह बांधली जावीत

या चर्चेनंतर उभय मंत्र्यांनी, कर सर्वस्वी माफ करणे देशाच्या वाढत्या जबाबदारीमध्ये शक्य नसले तरी विशिष्ट परिस्थितीत लोकशिक्षणाच्या दृष्टीने योग्य नाटकावरील कर माफ करण्याचे आश्वासन दिले [ त्याप्रमाणे पुढे त्याची अमलबजावणीहि झाली ]

(२) नाट्यविषयावरील अभ्यासक्रमाचा आराखडा तयार करण्यात येऊन पुणे येथील महाराष्ट्र कलोपासक संस्थेने नाट्याभ्यास शाखा सुरू केली

(३) नगरपालिकांनी नाट्यगृह बांधण्याच्या बाबतीत नागपूरच्या नगर-पालिकेने नाटकासाठी एक जागा द्यावी असा प्रयत्न करण्यात आला

## कार्यकारी मंडळाची निवड

पुढील ३६ व्या संमेलनापर्यंत काम करण्यासाठी पुढील कार्यकारी मंडळ निवडण्यात आले

अध्यक्ष— श्री चिंतामणराव कोल्हटकर ( मुंबई )
कार्याध्यक्ष— प्रा श्री ना बनहट्टी ( नागपूर )
उपाध्यक्ष— (१) प्रि श्री ल कऱ्हाडपांडे ( नागपूर )
(२) श्री रा व हिवरगावकर ( नगर )
खजिनदार—प्रा वि दि घाटे ( नागपूर )
चिटणीस— (१) डा न अ बरवे ( नागपूर )
(२) श्री वा श्री पुरोहित ( नाशिक )

सस्था-सभासद—

(अ) (१) श्री दि व पडित — प्रतिनिधि, ॲक्ट्मा आफ ड्रमॅटिक आर्ट्स नागपूर ( अभिनव नाट्यमदिर )

(२) श्री मा ग पेंडसे—प्रतिनिधि सहकारी सस्था (नागपूर)

(३) श्री जी सा कारखानीस—प्रतिनिधि, चा का प्र मोगल सस्था ( नागपूर )

(आ) (१) डॉ भा ग रानडे ( हैदराबाद )

(२) श्री माधव मनोहर ( मुबई )

यापैकी श्री माधव मनोहर याची समति न आल्याकारणाने त्याचे नाव वगळण्यात आले व ती जागा रिकामीच ठवण्यात आली



अध्यक्ष चिंतामणराव कोल्हटकर

# ३६. कोल्हापूर

१९४९

सुप्रसिध्द नट आणि दिग्दर्शक– बलवंत नाटकमंडळीचे एक संस्थापक– साहित्य आणि अभिनय या दोन्ही विषयांत राष्ट्रपति पारितोषक मिळविणारे एकमेव नट आणि लेखक.

छत्तिसावे संमेलन वास्तविक १९४७ मध्येंच भरावयाचे आणि महोत्सवाच्या बरोबरच ते झालेंहि असते परंतु १९४८ च्या पूर्वार्धात कोल्हापूर यथील राजकीय वातावरण अनेक कारणामुळें अत्यंत प्रक्षुब्ध झाल्यानें असल्यानें त्या वर्षी संमेलन न बोलावण्याचा निर्णय घेण्यात आला पुढें मुंबइच्या नाट्यमहोत्सवामुळं संमेलन आणखी लांबले अखेरीस तीन वर्षांच्या विश्रांतीनंतर १९४९ च्या प्रारंभी संमेलन भरण्याचे निश्चित होऊन कार्यकर्ते तयारीला लागले स्वातंत्र्य प्राप्तीनंतरचे नाट्यसंमेलनाचे हे पहिलेच अधिवेशन असल्याने कार्यकर्त्यांना विशेष उत्साह वाटत होता संमेलनाचे अध्यक्ष म्हणून मागील संमेलनाचे सूत्रधार श्री चिंतामणराव कोल्हटकर यांचीच पुन्हा निवड करण्यात

हे सामर्थ्य असणार नाही. रंगभूमीच्या उद्धाराला रंगभूमीला वाहिलेले नटच पाहिजेत तरच रंगभूमि चिरस्थायी होऊन तिला वैभव प्राप्त होईल

## लोकशिक्षण आणि नाट्यकला

मराठी रंगभूमीचे जाणकार हे महाराष्ट्राची वृत्ति लढाऊ आहे, सुखासीन नाही असे म्हणतात महाराष्ट्रात लोकप्रिय झालेले प्रत्येक नाटक प्रचारात्मक आहे 'काहीतरी सांगण्या'च्या वृत्तीतून त्याचा जन्म झाला आहे असेच नाटक लोकशिक्षण देत असत स्वातंत्र्यानंतरच्या काळात अशा प्रचारात्मक व लोकशिक्षण देणाऱ्या नाटकाची फार जरुरी आहे नाटकमंडळ्या आज अस्तित्वात नसल्याने प्रभावी नट व नाटककार तयार करणे विश्वविद्यालयानेच आता हाती घेतले पाहिजे सरकारनेहि हातकरू नटांना परदेशी पाठवून तेथील नाट्याचा अभ्यास त्याच्याकरवी करविला पाहिजे "

आपल्या भाषणाच्या शेवटी जागोजाग नाटकगृह निर्माण झाली पाहिजेत असे सांगून अध्यक्षांनी आपले भाषण संपविले

## निबंधवाचन

या संमेलनात पुढील विषयावर निबंध मागविले होते

(१) नव्या-जुन्या नाट्यतंत्राचे तुलनात्मक परीक्षण

(२) मराठी रंगभूमीचे सामाजिक क्षेत्रात केलेले कार्य

(३) मराठीतील कोणत्या नाटकाचा उत्कृष्ट चित्रपट होऊ शकेल ?

यावर निबंध किती आले व त्यांचे पुढे काय झाले हे समजले नाही

## विषयनियामक समितीचे निर्णय

संमेलनाच्या मध्यवर्ती समितीचे कार्याध्यक्ष प्रा बनहट्टी व चिटणीस डॉ वरद हे आपल्या व्यवसायानिमित्त नागपूर सोडून दूर गेल्याने त्यांनी आपल्या जागाची त्यागपत्रे दिली, ती स्वीकारण्यात आली कार्याध्यक्षाचे काम संमेलनाध्यक्ष श्री कोल्हटकरानीच पहावे असे ठरले चिटणीस म्हणून श्री. ग वि ऊर्फ नानासाहेब गोगले यांची निवड झाली

नगर येथील संमेलनात मंजूर झालेली घटना प्राप्त परिस्थितीत अमलात आणणे फार अवघड असल्याने ती परिस्थित्यनुरूप अधिक कार्यक्षम करण्याच्या

दुष्टीन संमेलनान श्री कोल्हटकर, श्री ग वि गाम्वे व प्रा भुपटकर याची एक समिति नियुक्त करून तिने तीन महिन्यात घटना तयार करून साधारण सभेला सादर करावी असे ठरविले, तापर्यंत अध्यक्षानी एक कार्यकारी मंडळ नेमून संमेलनाचे काय चालू ठवावे असा त्याना अधिकार देण्यात आला

## ठराव

संमेलनात ११ ठराव मजूर करण्यात आले त्यापैकी महत्त्वाचे ठराव असे —

(१) दुखवट्याचा ठराव

(२) कार्याध्यक्ष प्रा बाहट्टी व व चिटणीस डॉ वरवे यानी आजवर केलेल्या कार्याबद्दल त्याचे आभार मानणारा ठराव संमत करण्यात आला

(३) सांगलीच्या नाट्यविद्यामंदिरास तेथील राजसाहेबानी शहरात मध्यवर्ती ठिकाणी एक मोठी जागा दिली याबद्दल संमेलनान त्याचे अभिनंदन करणारा व या ठिकाणी एक भव्य विद्यामंदिर उभारण्यासाठी जनतेन सढळ हाताने मदत करावी अशी प्रकट विनंती करणारा ठराव मजूर केला

(४) पुणे विद्यापीठात 'नाट्य' विषयाचा अंतर्भाव व्हावा यासाठी पुढील ६ जणाची एक समिति नेमण्यात आली

(i) डॉ र पु पराजपे (ii) श्री गो रा पराजपे (iii) श्री मालजी पेंढारकर (iv) श्री गोविंदराव टेंबे, (v) श्री चिंतामणराव कोल्हटकर व (vi) भ श्रि पंडित (आमंत्रक)

(५) कोल्हापूर संस्थान विलीन झाल्यानंतर तेथील पॅलेस नाट्यगृह चित्रपट संस्थानी मागितले व ते भाड्याने देण्यासाठी कोल्हापूरच्या प्रशासकानी जाहिरातहि दिली होती अनेक ख्यातनाम नाटकमंडळ्यानी आपल्या नाट्यप्रयोगानी गाजविलेले महाराष्ट्रातील हे एकमेव उरलेले नाट्यगृह नाटकासाठीच राखून ठेवावे अशी संमेलनाच्या वतीने आग्रहाची मागणी करणारा ठराव स्वत अध्यक्षानीच मांडला व तो मजूर झाला

(या ठरावानुसार कोल्हापूरच्या प्रशासकाची श्री कोल्हटकर याच्या नेतृत्वाखाली शिष्टमंडळाने भेट घेऊन संमेलनाची मागणी त्याच्या कानावर घातली प्रशासकानीहि ती मान्य करण्याचे आश्वासन दिले आणि त्याप्रमाणे पॅलेस नाट्यगृह हे केवळ नाटकासाठीच राखून ठेवण्यात आले)

अध्यक्षीय समारोप व आभारप्रदर्शन झाल्यानतर समेलनाचा कार्यक्रम सपला

## करमणूक

समेलनात करवीर नाटचमडळाने समेलनाकरिता बसविलेला 'भाव-बधन' हा नाट्यप्रयोग सादर केला समेलनाला जोडूनच दि १५ ते १७ जानेवारीपर्यंत एक नाटचमहोत्सव साजरा करण्यात आला समेलनाच्या दुसऱ्या दिवशी लोकनाटचाचा कार्यक्रम ठेवण्यात आला होता.





अध्यक्ष खाडिलकर

## ३७. पुणें

१९५४

राम गणेश गडकरी यांचे शिष्य— "श्री" नाटकाचे कर्ते— मराठी रंगभूमीशी यांचा जुना आणि जिव्हाळ्याचा संबंध आहे.

जावे असे प्रयत्न आरंभिले संमेलनाचे चिटणीस श्री गोखले यांनीहि या प्रयत्नात पुढाकार घेतला याच सुमारास पुण्याच्या सोशल क्लब या सुप्रसिद्ध हौशी नाट्यसंस्थेच्या हीरक महोत्सवाची तयारी चालू असल्याने त्या संस्थेच्या कार्यकर्त्यांनी संमेलनाची कल्पना उचलून धरली व हीरक महोत्सवाला जोडून संमेलनाच अधिवेशन भरण्याचे निश्चित झाले, आणि अशा त ऱ्हेने जीवन्मृत झालेल्या संमेलनपरंपरेला पुन्हा संजीवनी मिळाली.

(या वर्षी सांगलीच्या देवल क्लबानेहि संमेलन भरविण्याची इच्छा प्रदर्शित केली होती परंतु पुणे येथे अगोदरच तयारीला प्रारंभ झाला असल्याने सांगलीकरांना मंजुरी करण्याची विनंती कार्यकारी मंडळाकडून करण्यात आली व त्यांनीहि ती मान्य केली)

## दहा दिवसांचा सोहळा

सोशल क्लब संस्थेच्या वतीने झालेल्या नाट्यसंमेलन, हीरकमहोत्सव व हौशी नटसंमेलन या त्रिविध सोहळ्यासाठी १० दिवसांचा कार्यक्रम आखण्यात आला होता त्यांपैकी दोन दिवस नाट्यसंमेलनाच्या अधिवेशनासाठी राखून ठेवण्यात आले होते दि १५ एप्रिल १९५४ पासून या 'दश-दिनी' नाट्योत्सवाला प्रारंभ झाला

दि १७ व १८ एप्रिल या दिवशी सांगलीच नाटककार श्री नरहर गणेश कमतनूरकर यांच्या अध्यक्षतेखाली नाट्यसंमेलन भरविण्यात आले.

हिंदी बोलपटसृष्टीतील प्रथितयश कलावंत श्री पृथ्वीराज यांनी संमेलनाचे उद्घाटन केले त्यांनी आपल्या भाषणात आपल्याला अभिनयाची गोडी कशी लागली हे सांगून अभिनयाचा खरा विकास चित्रपटापेक्षा रंग-

४७,००० रुपयाची मदत, मध्यवर्ती सरकारच्या आश्रयाने झालेली नाटय व संगीत अॅकॅडेमीची स्थापना आणि त्या समितीवर झालेली 'नाटयभीष्माचार्य' श्री मामासाहेब वरेरकर याची नेमणूक या घटनाचा स्वागताध्यक्षानी उल्लेख केला

नाटयवाचन

रगभूमीवरील प्रयोग आणि नाटयवाचन याच अपेक्षित स्वरुप वर्णन करताना प्रा बनहट्टी म्हणाले, "प्रयोग करताना नट हा मूळ नाटककाराने निर्माण केलेल्या भूमिकेच जे स्वरूप त्याच्या मनात उतरल असेल किंवा दिग्दर्शकाने उतरविले असेल त रगभूमीवर अभिनयद्वारा प्रकट करण्याचा प्रयत्न करीत असतो म्हणजे नाटककाराच्या मूळ भूमिकेचा आविष्कार दिग्दर्शक व नट या माध्यमाच्या द्वारें झालेला असतो या माध्यमामुळें मूळ भूमिका कमीजास्त प्रमाणात परिवर्तित झालेली असते नाटयवाचन म्हणजे नट व दिग्दर्शक ही माध्यमें शक्य तितकी नाहीशी करून नाटककाराने योजिलेले केवळ शब्द परिणामकारक वाचनाच्या द्वारा आस्वादकाला ऐकविणे असे मी समजतो मूळ नाटककार आणि आस्वादक याची साक्षात् गाठ घालून देण्याचा हा एक प्रयत्न होय आणि असा तो असेल तरच तो नाटयास्वादाचा एक निराळा मार्ग म्हणून चालू शकेल"

पुण्यात नुकत्याच स्थापित झालेल्या आकाशवाणी केंद्राचा उल्लेख केल्या नतर प्रा बनहट्टी यानी कालिदासाच्या नाटयविषयक भव्य आणि व्यापक कल्पनेचा 'देवानामिदमामनन्ति मुनय 'या श्लोकाधारें परिचय करुन दिला 'नाटय हा यज्ञ (म्हणजे श्रेष्ठ त्याग) तर आहेच परतु तो सर्वांना हवासा वाटणारा असा मोहक यज्ञ आहे नाटयात, रुद्र आणि उमा याच्या स्वरूपाप्रमाणें जीवनातील गाभीर्य आणि लालित्य या दोन्ही अगाचे समिश्रण झालेले असतें आणि सत्त्व–रज–तम या तिन्ही गुणाच्या खळातून उद्‌भवलेलें आणि नाना रसानी नटलेले लोकचरित नाटयात दृष्टीस पडत असा त-हेचे हृ एकच साधन सर्व त-हेच्या जनसमुदायाचा सतोष साधणारें आहे"

आपल्या भाषणाच्या शवटी श्री न ग कमतनूरकर याच्या नावाची सूचना करून प्रा बनहट्टी यानी आपले भाषण सपविले अध्यक्ष स्थानापन्न

झाल्यानतर त्याना निरनिराळ्या सस्थातर्फे पुष्पहार अपण करण्यात आले समेलनाचे चिटणीस श्री नानासाहेब गोखले यानी समेलनाला आलेले सदेश वाचून दाखविले आणि नाटचसमेलन हू गेल्या तीन वर्षांत किती प्रकारच्या अडचणीतून गेले याची खुलासेवार माहिती देऊन समेलनाची घटना कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने सुटसुटीत करणे प्राप्तपरिस्थितीत अवश्य आहे असे त्यानी सुचविल श्री गोखले याच्या भाषणानतर अध्यक्षीय भाषणाचा कार्यक्रम झाला

, १९३० पासून रगभूमीला जी उतरती कळा लागली त्यासबधी अध्यक्ष श्री वमतनूरकर म्हणाल, "बोलपट हेच एकमेव, १६ आणे सत्य कारण आहे अस म्हणता येणार नाही बोलपटाचा प्रभाव हू शेवटच व प्रत्यक्ष कारण झाले खरे परतु त्या झडीखाली यण्याच्या पूर्वी कितीतरी लहान-मोठ्या भगा मराठी नाटचाच्या बाधणीत पडलेल्या होत्या त्या भगाकडे नाटचव्यावसायिकानी जाणूनबुजून लोकाच्या विचारास वळू दिले नाही बोलपटाच्या आक्रमणासबधी चाललेल्या हाकाटीत त्यानी आपल तारस्वर मिसळले आणि मूळ दोषावर पाघरूण घातले

## या काळातले नाटच वीर

तथापि या घसरगुडीच्या अवस्थेतहि रगभूमि पूणपणे अधारास बुडाली अस नाही 'आचार्य अत्रे, रागणेकर याच्यासारख नाटककार व जोत्स्ना भोळे, दुर्गाबाई खोटे यासारख्या नटी याच्या कामगिरीचा निर्देश करून अध्यक्ष म्हणाले," व्यावसायिक कपन्या बुडाल्या तथापि त्या मडळीतील श्री दाते, घोडस, बालगधव, कोल्हटकर हू कलावत मिळेल, दिसेल त्या आघाडीवर अजूनहि प्रकर्षाने रुढताना दिसत आहेत चितुबुवा गुरवासारखा ८० वर्षांचा सोलारमामा, 'मराठी रगभूमि मेली' अशी अवास्तव ओरड करणाऱ्याना आपल्या वसलेल्या कलेची रग दाखवून क्षणमात्र का होईना स्तभित करतोच आहे होशी सस्थाकडूनहि रगभूमीचा राबता अखड ठवण्याचे प्रयत्न चालूच आहत "

नव केलेले प्रचारयंत्र खेडोपाडी हिंडवण्याचे जारीने यत्न चालू झाले आहेत 'प्राचारिक व्यासपीठ' इतकीच रंगभूमीची व्याप्ति समजणारे हत्यारा पुराण नाटककारहि या लोकनाटयाच ढोलक गळयात अडकवून घेऊन त्याच तराळ बनू लागले आहेत म्हणूनच नाटयसंमेलनाने संघटितपणे ग्रामीण नाटयाचे मार्गदर्शन स्वत कड घेतले पाहिजे नाहीतर, नाटयकला व प्रचार कला यातील तफावत ग्रामीण जनतेला कधीहि उमगणार नाही

आत्मस्फूर्तीने बहुजनातील जाणता भाग नाटयाभिमुख होत आहे त्याला जर वेळीच यथार्थ नाटयकलादर्शन घडले नाही तर त्याचा उत्साह दिखाऊ आणि आकर्षक अशा नकली लोकनाटयात बुडून गल्यावाचून राहणार नाही सहकारी तत्त्वावर या ग्रामीण नाटयाच्या आर्थिक व व्यावहारिक बाजू आखून दिल्या जातील तर त्या रोपटयाचे वृक्ष होऊन त्याची सावली सर्वत्र पसरावयास फारसा वेळ लागणार नाही व अशा सहकारी तत्त्वानी सुबुद्ध झालेल्या उद्योगाना सरकारकडून अर्थसाहाय्य मिळवणे फारसे जड जाणार नाही

## सरकारी धोरण

मराठी रंगभूमावरील रूपांतरित नाटक आणि नाटयविषयक टीका वाङमय या दोन्हीबद्दल 'निराशाजनक' असे आपले मन व्यक्त करून अध्यक्षानी रंगभूमीला मिळणाऱ्या साहाय्याचा उल्लेख केला ते म्हणाले, नाटयविषयाला उत्तेजन देण्यासाठी मुंबई सरकार व केंद्र सरकार यानी एक योजना तयार केली आहे संस्कृति निदर्शनाची एक निशाणी व सर्वांगीण सुधारणाचे एक प्रभावी साधन या दृष्टीने मुंबई सरकारचे व केंद्र सरकारचे कळकळीचे व सक्रिय लक्ष गलेले आहे ही एक मौलिक घटना आहे याबद्दल सरकारचे आपण अभिनदन करू या

मात्र मदतीच्या करारनाम्यात सरकार सांगेल तीं नाटक बसविण्याची व सरकार फिरवील तिकडे जाण्याची अट नाटयस्वातंत्र्याला जाचक होइल अशी भीति वाटते तसेच नाटकावरील करातील उत्पन्नातून ही मदत केव्हाहि पुरी पडणार नाही तेव्हा तो कर रद्दच करून टाकावा हेंच फायदेशीर होईल

## धंद्याची नवी मांडणी

नाटयाच्या धंद्याची आमूलाग्र नवी मांडणी झाली तरच यापुढें हा धंदा टिकाव धरू शकेल सरकारचें भांडवल व सहकारी तत्त्वावरच धंद्याचा कारभार चालेल तरच पुढच्या काळात नाटयव्यवसायाच्या तरणोपाय आहे कायदेशीररीतीनेंच धंद्यात सहकार तत्त्व पत्करलें म्हणजे सरकारी दक्षतेचाहि धाक आपोआप मार्गे लागेल

नाटयाच्या बाबतीत तरी भारताने महाराष्ट्राला गुरु केले पाहिजे अशी आतापर्यंत स्थिति आहे ती पुढच्या काळातहि कायम राहील याबद्दल दक्षतेने, श्रमाने व त्यागानें धडपड करण्याचे फार अवघड असे काम आपणा-सर्व महाराष्ट्रनाटयाभिमानी जनतेपुढे आहे "

## नवें कार्यकारी मंडळ

चालू वर्षाच्या मध्यवर्ति संस्थेच्या कार्यासाठी म्हणून एक तात्पुरतें कार्यकारी मंडळ बनविण्यात आलें. तें पुढीलप्रमाणे—

अध्यक्ष—श्री न ग कमतनूरकर

उपाध्यक्ष—श्री बापुभाई रतनचंद

कार्यवाह—सौ सरोजिनीबाई कमतनूरकर

सभासद—सर्वश्री एस ए कुलकर्णी, प्रा. चनहट्टी, श्री नानासाहेब गोखले, राजाभाऊ वैद्य, चिंतामणि आपटे, डॉ बरवे, पु ल देशपांडे, डॉ ज. म. आठवले व बाळासाहेब भट

पुण्याच्या सोशल क्लबचे व 'नाटयवाचना' चे नवे नाटयास्वादक साधन निर्माण केल्याबद्दल 'सकाळ'काराचे अभिनंदन करण्यात आले

(३) नगरपालिकांनी आपल्या हद्दीत आधुनिक सुखसोयींनी सुसज्ज असे एक थिएटर नाटयाकरिताच राखून ठेवावे किंवा बांधून द्यावे व तें नाममात्र भाडयानें सांस्कृतिक कार्यक्रमांसाठी व नाटयप्रयोगासाठीच देत जावे

(४) नाटयविद्यामंदिराच्या उपक्रमाचा पुरस्कार करण्यात येत आहे व हे नाटयविद्यापीठ असल्याने सर्वांनी त्याला मदत करावी अशी संमेलनाची शिफारस आहे

(५) दिनांक ५ नोव्हेंबर हा 'रंगभूमिदिन' म्हणून प्रतिवर्षी साजरा करीत जावा व महाराष्ट्र नाटयसंमेलनानें या कार्यांत योग्य ते मार्गदर्शन करावे

(६) महाराष्ट्राबाहेरील मराठी भाषिकांना मराठी रंगभूमिविषयक कार्य करताना सौकर्य व प्रातिनिधिक स्वरूप यावे म्हणून नाटयसंमेलनाचे 'महाराष्ट्र नाटय-संमेलन' हें नांव बदलून 'मराठी नाटय-संमेलन' असे नांव ठेवावे अशी इंदूरच्या महाराष्ट्र साहित्य सभेच्या प्रतिनिधींची शिफारस आहे

(७) दिल्ली येथें भरणाऱ्या पहिल्या राष्ट्रीय नाटयोत्सवात केली जाणारी मराठी नाटकें 'महाराष्ट्र नाटय-संमेलन' या प्रातिनिधिक संस्थेच्या विद्यमानें केली जावीत अशी संमेलनाची इच्छा आहे या कार्यासाठी पुढील गृहस्थांची समिती नेमण्यात येत आहे

( i ) श्री कमतनूरकर, ( ii ) श्री बनहट्टी, ( iii ) श्री के नारायण काळे, व ( iv ) श्री पु ल देशपांडे

(८) संमेलनाच्या घटनेची पुनर्रचना करण्यासाठी कोल्हापूर संमेलनांत जी समिती नेमली होती तिचे कार्य अपुरें राहिले असल्याने तें पूर्ण करण्यासाठी पुढील गृहस्थांची समिती नेमण्यात येत आहे —

( i ) श्री के ना काळे, ( ii ) श्री बाबुराव गोखले, ( iii ) श्री राजाभाऊ वैद्य, ( iv ) श्री चिंतामणी आपटे व ( v ) सौ. सरोजिनीबाई कमतनूरकर

(९) पुढील अधिवेशनासाठी सांगलीच्या नाटय सिनेविद्यापीठाच्या आमंत्रणाचा स्वीकार करण्यात येत आहे



अध्यक्ष प्रल्हाद केशव अत्रे

# ३८. बेळगांव

## १९५६

मराठी विडंबन-काव्याचे जनक, विख्यात नाटककार लोकप्रिय पटकथाकार आणि झुंजार संपादक.

## महाराष्ट्र संमेलनाचें वार्षिक कार्य

पुणे यथील संमेलनात मंजूर झालेल्या ठरावाची अमलबजावणी करण्याचे काम संपल्यानंतर संमेलन सम्थन दिल्ली यथील भारतीय नाट्य महोत्सवाकरिता नाट्यप्रयोग निश्चित करण्याच काम हाती घतल पुणे यथील नाट्योत्सवात महाराष्ट्र नाट्यसंमेलनात सादर केलला प्रयोग ' शारदा ' व मुंबईच्या नाट्योत्सवात मुंबई मराठी साहित्यसंघान सादर केलेला ' भाऊबंदकी ' या दोन नाटकाचे प्रयोग दिल्ली नाट्योत्सवात करण्यात आले भाऊबंदकी नाटकाचा प्रयोग दि ५ नोव्हेंबर १९५४ ला होऊन त्याला

आर्थिक दृष्टया 'शारदा' नाटकाचे प्रयोग समेलनाला फायदायी ठरले नाहीत मुंबई येथील प्लाझा चित्रपटगृहात आणखी एक प्रयोग करूनहि एकदर दिल्लीवारी तोटयाचीच ठरली तथापि ही केवळ आर्थिक दृष्टि झाली अखिल भारतीय नाटयोत्सवात महाराष्ट्र समेलनाने मराठी नाटकाचे प्रतिनिधित्व केले हा यातील गौरवाचा व अभिमानाचा भाग होता आणि त्याच भूमिकेतून या प्रयोगाचे यशापयश ठरविले पाहिजे

नाटयोत्सवाची गडबड सपल्यानतर समेलनाने नियुक्त केलेल्या घटना मडळाच्या वैठकी होऊन घटनेची पुनर्रचना करण्यात आली व ती कार्यकारी, मडळाच्या अखेरच्या सभेत माडण्यासाठी पाठविण्यात आली या घटनेवरून इग्रजीत एक आराखडा (Memorandum of Association) तयार करून सस्था (मार्च १९५५ मध्ये) रीतसर नोदविण्यात आली

पुणे येथील समेलनात सागलीच्या नाटय सिनेविद्यापीठाचे आमत्रण स्वीकारण्यात आले होते समेलन सस्थेच्या घटनेनुसार आमत्रक सस्था मध्यवर्ती सस्थेला जोडून घेणे आवश्यक असत सागलीची ही सस्था तशी जोडलेली नसल्याने अधिवेशनापूर्वी तसे करण्याबद्दल सदर सस्थेला अनेक वेळा सुचविण्यात आले परतु कार्यकारी मडळाची ही सूचना या सस्थेने विचारात घेतली नाही इतकेच नव्हे तर 'समेलन भरविण्याचा आमचा हक्क आहे' अशा प्रकारचे उद्गार काढून समेलन भरविण्याचा निर्धार वृत्तपत्रातून प्रकटहि केला समेलनाच्या चिटणीस सौ कमतनूरकर यानी सस्थेला अशा प्रकारचा अधिकार नसल्याचे जाहीर करून वृत्तपत्र प्रतिनिधीची एक सभाहि बोलावली या सस्थेचे कार्यवाह श्री बाळासाहेब भट ह्या सभेला उपस्थित झाले पण सभेतून काहीहि निष्पन्न होऊ शकले नाही अखेरीस समेलनाध्यक्ष श्री न ग कमतनरकर यानी पन्हा पत्रकाराना

समजून अध्यक्ष श्री वसंतनूरकर यांनी इतरत्र संमेलन भरवण्याची खटपट सुरू केली बेळगाव येथील कलोपासक मंडळाने संमेलन बोलावण्याचे मान्य करून कार्यकारी मंडळाकडे आमंत्रण पाठविले कार्यकारी मंडळाने आपली संमति कळविल्यानंतर कलोपासक मंडळाच्या कार्यवाहांनीं दि २८।१०।१९५५ च्या 'केसरी'त आपल्या मंडळातर्फे बेळगाव येथें ३८ वे संमेलन भरणार असल्याचे घोषित केले संमेलनाच्या घटनेप्रमाणे आपली संस्था संमेलनाला जोडून घेतला व कार्यकारी मंडळाच्या सल्ल्याने संमेलनाची मोठ्या उत्साहानें तयारी सुरू केली

## नाट्य-संमेलन

बेळगाव येथील राणी पार्वतीदेवी महाविद्यालयाच्या खुल्या नाट्यगृहात कलोपासक मंडळाच्या विद्यमाने दि ५ ते ८ जानेवारी १९५६ या दिवशी नाट्यसंमेलनाचे ३८ वे अधिवेशन भरविण्यात आले संमेलनाचे अध्यक्षस्थान आचार्य प्र के अत्रे यांना देण्यात आले होते

हे संमेलन सुरू होण्यापूर्वी नटवर्य केशवराव दाते यांनी वृत्तपत्रांतून नाट्य सेवकांना केलेल्या तळमळीच्या आवाहनामुळें व वृत्तपत्रांच्या पुरस्कारामुळें संमेलनाचा मोठ्या प्रमाणात गाजावाजा झाला होता नवीन मंडळ पुनरच-

व हिंदी या भाषातील नाटके मी वाचली आहेत आणि त्याच्या वाचनानंतर ' त्या भाषातील नाटकापेक्षा आपली रंगभूमि अधिक प्रगतिशील आहे ' असे मी निश्चित सांगू शकतो आपल्या मराठीला कै भावे, किर्लोस्कर, खाडिलकर, वरेरकर, केळकर, रांगणेकर अशी नाटककारांची मोठी परंपरा आहे. या नाटककारांनी साहित्य व सामाजिक जीवन यामध्यें फरक केला नाही, या कारणामुळें त्यांची नाटकें उच्च दर्जाची झाली आहेत

नाटककार हा सामाजिक जीवन व घटना यावरून नाटके लिहितो या दृष्टीने भारतीय स्वातंत्र्य लढा, गोवा मुक्ति लढा हे सुद्धा मागें पुढे नाटय-विषय होतील संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती ही देखील एक अशी घटना होईल की जिच्यामुळें हजारो कवींना स्फूर्ति मिळेल निखंड महाराष्ट्र आता द्विखंड होण्याच्या मार्गावर आहे, यामुळें नाट्यकलेला उर्जितावस्था प्राप्त होईल. मराठवाडा, नागपूर व मुंबई या तिन्ही ठिकाणच्या साहित्यामध्यें वेगवेगळें वैशिष्टय आहे ही सर्व वैशिष्टयें एकत्र आल्याने महाराष्ट्र संस्कृतीच्या दृष्टीने एक चांगली गोष्ट होईल

सिनेमाच्या प्रचारामुळें नाटकाना विशेष अर्थप्राप्ति होत नाही, ही गोष्ट खरी असली तरी नाटककारानी आपली उच्च परंपरा सोडू नये ते एका अर्थाने इतिहासकारच आहेत त्यानी नाटकामध्यें उदात्त घटना रंगवाव्यात आपल्या प्रतिभेला आकाश हीच एक मर्यादा मानून त्यांनी पतंगाप्रमाणे भराऱ्या मारायला हरकत नाही पण पतंगाची दोरी मात्र त्यांनीं आपल्या

## नाटकाचें अंतरंग

नाट्यवाङ्मयाच्या स्वरूपाविषयी बोलताना श्री. नाईक म्हणाले, 'नाटकांत किंवा प्रहसनात्मक एक प्रवेशी किंवा अनेक प्रवेशी सामाजिक प्रश्न हाताळणारा किंवा मनोविश्लेषण करणारी अशी अनेक रूपें असलेलीं नाटकें मराठींत आहेत. परंतु हीं सर्व नाटकाचीं बाह्यांगें आहेत. जीवनामधील संघर्षांना व त्यांतील अनुभवांना वाचा फोडणें हा नाटकाचा प्राण आहे, आणि ज्या प्रमाणांत नाटककार आपणास आलेल्या जीवनाच्या आत्मप्रत्ययामध्यें वाचकांना अगर श्रोत्यांना भागीदार करून घेईल त्या प्रमाणांत नाटकाची यशस्विता अवलंबून आहे. मराठी नाट्यवाङ्मयाला नवजीवन प्राप्त करून देण्याचा एक मार्ग म्हणजे नाटककारांनी आपल्या प्रतिभेला अधिकाधिक जीवनाभिमुख करणें हा होय.

## नाट्यवाङ्मयातील नवमतवाद

यानंतर श्री. नाईक यांनी पाश्चात्य आणि मराठी नाट्यवाङ्मयातील नवमतवादाचें सविस्तर विवेचन केलें. जॉर्ज ब्रँडिस, इब्सन, स्ट्रिंडबर्ग, बर्नार्ड शॉ व इटालियन नाटककार पिरँडेलो यांच्या नाटकांतून नवमतवादी प्रवृत्तीचें कसकसें प्रतिबिंब उमटलें आहे याचीं श्री. नाईक यांनी उदाहरणें दिलीं. व्यक्तिमनांतील चांगलें व वाईट यांचा संघर्ष, व्यक्ति व समाज यांच्यांतील द्वंद्व, मानवाचा जातिरता व प्रवाहपतितत्व, अंतर्मन व बहिर्मन यांच्यांतील झगडा हीं नवमतवादाचीं मूलतत्त्वें पाश्चात्य नाट्यवाङ्मयांत कशीं उमटलीं आहेत याचें वर्णन केल्यानंतर श्री. नाईक मराठी नाट्यवाङ्मयाकडे वळले. ते म्हणाले, 'गेल्या २०।२५ वर्षांत मराठी लेखकांनीं नवमतवादाचा हिरीरीनें पुरस्कार केला आहे. 'नवमतवादी वाङ्मय हेंच पुरोगामी वाङ्मय होय' असें समीकरणहि मांडण्यांत आलें होतें. मात्र जुन्या परंपरा तोडून नवी सृष्टि उभारणें या अर्थानें मराठी नाट्यसृष्टींत हा नवमतवाद आलेला नाहीं असें मानावें लागतें. वाङ्मयाचीं कांहीं शाश्वत मूल्यें असतात. कालमानानें तीं बदलत नाहींत. या मूल्यांना डावलून रचलेली नाट्यसृष्टि क्षणभंगुर ठरल्यावाचून राहणार नाहीं.

मराठी नाटककारांनीं जनतेच्या भावनांशीं व कल्पनांशीं समरस होऊन

महाराष्ट्रीय समाजाची जीवनचित्रे यथातथ्यपणे रगविली पाहिजेत तरच मराठी मन त्यात रगू शकेल

शेवटी रगभूमीच्या पुनरुज्जीवनाच्या दृष्टीने जे उद्योग सुरू आहेत त्यात सुसूत्रता येण्यासाठी आणि नाट्यविषयक समस्या सोडविण्यासाठी नट, नाटककार, दिग्दर्शक, नाट्यसस्थाचे चालक, नाट्यप्रेमी रसिक या सर्वांनी एकत्र जमून नव्या मार्गाची आखणी करावी अशी विनती करून श्री नाईक यानी आपले भाषण सपविले

प्रा निकुब यानी आचार्य अत्रे याना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनती केली, त्याप्रमाणे अध्यक्ष स्थानापन्न झाल्यानतर त्याचा विविध सस्थानर्फे सत्कार करण्यात आला

समेलनाच्या चिटणीस सौ सरोजिनीबाई कमतनूरकर यानी समेलनाला आलेले सदेश वाचून दाखविले व मध्यवर्ती नाट्यसमेलनाच्या वर्षभरातील कार्याचे निवेदन केले

आपल्या अध्यक्षीय भाषणाच्या प्रारभी तत्कालीन प्रक्षुब्ध राजकीय वातावरणाचा उल्लेख करताना आ अत्रे म्हणाले, "आजच्या महाराष्ट्राच्या परिस्थितीत म. ना समेलन भरविण्याच्या मन स्थितीत महाराष्ट्र नसला तरी बेळगावच्या पोटनिवडणुकीत सयुक्त महाराष्ट्राच्या बाजूने कौल दिलेला असल्याने आणि मुख्य म्हणजे बेळगाव हे मराठी नाट्याचे उगमस्थान असल्यामुळे बेळगाव हे महाराष्ट्रातच आहे हे सागण्यासाठीच येथे नाट्यसमेलन भरत आहे

## मराठी नाट्याची भरती ओहोटी

सघर्षातूनच नाट्याची निर्मिति होते आणि महाराष्ट्र म्हणजे सघर्षाचे परिसरच महाराष्ट्राच्या निरनिराळ्या क्षेत्रात पूर्वी अग्रभागी असलेल्या अगर आज असलेल्या कोणाचेहि जीवन जसच्या तसेच रगवा की अमर नाट्यकृति निर्माण झालीच म्हणून समजा. महाराष्ट्राच्या रामरोमात नाट्य भिनलेले आहे म्हणूनच महाराष्ट्रात नाट्यकलेचा जास्तीत जास्त उत्कर्ष झालेला आहे.

अण्णासाहेब किर्लोस्करानी मराठी रगभूमीचा पाया घातला. देवल-कोल्हटकरानी खाब व भिंती उभारल्या, खाडिलकरानी मदिराचा घुमट

मन शांति लेखकाला हवी असते तीच आज दुर्मिळ झाल्यामुळें प्रभावी नाटयं लिहिली जात नाहीत महाराष्ट्राच्या आजच्या सामाजिक व राजकीय. परिस्थितीत प्रभावी नाटककाराची व रंगभूमीच्या द्वारा खडयापाडयात नव समाजरचनेचा संदेश पोंचविणाऱ्या नटाची खरी गरज आहे त्यासाठी संयुक्त महाराष्ट्राची निर्मिति प्रथम झाली पाहिजे तेच आमचे एक आशास्थान आहे'

## घटनेची पुनर्घटना

या संमेलनातील महत्त्वाचे कार्य म्हणजे घटना सिद्धि हे होय घटना-सुधारणा-समितीचा वृत्तान्त कार्यकारी मंडळ व सर्वसाधारण सभेंत मान्य झाल्यावर विषयनियामक समितीत त्या आराखडयावर चर्चा झाली आणि घटना राबविण्यासाठी त्या आराखडयात आणखी योग्य त्या दुरुस्त्या करून व्यापक योजना तयार करण्यासाठी सौ कमतनूरकर, श्री बा र सुठणकर, श्री गो म वाटवे व डॉ न अ वरवे यांची समिति नेमण्यात आली या समितीनें संमेलन संपण्यापूर्वीच आपला अहवाल विषयनियामक समितीला सादर केला आणि तेथें तो एकमताने संमत होऊन खुल्या अधिवेशनात मांडण्याचें निश्चित झाले

## ठराव

संमेलनात एकंदर १५ ठराव मंजूर झाले त्यापैकी महत्त्वाचे ठराव पुढीलप्रमाणें—

(१) दुखवटयाचा ठराव

(२) कोणत्याहि नाटयसोहळयाच्या प्रारंभी सांगलीचे राजकवि कै साधु दास यांनी रचलेले नटराजस्तवन' म्हणावे अशी शिफारस करण्यात आली

(३) नाटयगृह बांधण्यास आर्थिक साहाय्य नाटयस्पर्धांचे आयोजन, हौशी नटाना पारितोषिके, उत्तम नाटककाराना पारितोषिके इ प्रकारानी सरकारकडून नाटयकलेच्या अभिवृद्धीस जें साहाय्य मिळत आहे त्याबद्दल सरकारचे अभिनंदन करण्यात आले

(४) प्रयोगाच्या परवानगी बाबतच्या अडचणी दूर कराव्यात व कर संपूर्णपणें रद्द करावा असा शिफारसवजा ठराव करण्यात आला

(५) मराठी साहित्य संस्कृति आणि नाटयकला यांच्या विकासासाठी

मुंबई, विदर्भ, बेळगाव, कारवार, निपाणी या भागासह सर्व संलग्न मराठी प्रदेशाचा मिळून एक अखंड महाराष्ट्र तावडतोब निर्माण करण्यात यावा अशी मागणी करणारा ठरावहि मंजूर झाला

(६) नाट्य विषयाच्या अभ्यासासाठी मुंबई, पुणें व नागपूर या विद्यापीठांनी स्वतंत्र विद्यासनें ( Chairs ) निर्माण करावीत अशी संमेलनाच्या वतीने शिफारस करण्यात आली

(७) मराठी नाट्यपरिषदेला आर्थिक स्थैर्य लाभावें यासाठी महाराष्ट्रात होणाऱ्या प्रत्येक नाट्यप्रयोगामागें परिषदेला 'धर्मभावनेनें' १ रुपया देणगी द्यावी अशी विनंती एका ठरावानें सर्व नाट्यसेवकांना करण्यात आली

(८) विषयनियामक समितीनें मंजूर केलेली दुरुस्त घटना[1] संमेलनानें मान्य करण्यात आली या घटनेनुसार संमेलनाच्या स्थायी समितीचें 'महाराष्ट्र नाट्य-संमेलन' हें पूर्वीचें नाव बदलून 'मराठी नाट्य-परिषद' असें तिला व्यापक नाव देण्यात आलें नवीन घटना कार्यान्वित करण्यासाठी पुढील कार्यकारी मंडळ नियुक्त करण्यात आलें

समेलनाध्यक्ष— आचार्य प्र के अत्रे ( पदसिद्ध सभासद )
कार्याध्यक्ष— डॉ के वा गाठ ( बेळगाव )
कार्योपाध्यक्ष— डॉ न अ वरव ( तळगाव दाभाड, जि पुणें )
कोषाध्यक्ष— श्री वा र सुठणकर ( बेळगाव )
चिटणीस— श्री गा म वाटवे ( बेळगाव )
सहचिटणीस— श्री आत्मारामपंत भेंडे ( मुंबई )
सभासद— (१) श्री के नारायण काळे, पुणें, (२) श्री के भ दात, मुंबई, (३) श्रीमती दुर्गाबाई खाटे, मुंबई, (४) श्री श्री ना बनहट्टी, पुणें, (५) श्री नाना जोग, नागपूर (६) श्री भा गो रानडे हैदराबाद, (७) श्री दा गा पटवर्धन सोलापूर (८) श्री लि भी नाईक, बेळगाव व (९) श्री ह श्री शणोलीकर, बेळगाव

१ मराठी नाट्य परिषदेची ही नवी घटना पुढें दुसऱ्या परिशिष्टांत संपूर्णपणें देण्यांत आली आहे

## सत्कार व मनोरंजन

करमणुकीच्या कार्यक्रमात दि ५ ला समेलनाध्यक्ष आचार्य अत्रेकृत 'घराबाहेर' या नाटकाचा प्रयोग करून दाखविण्यात आला त्यांतील पपूशेठ व कमर या भूमिका स्वत श्री आचार्य अत्रे व प्रा अनंत काणेकर यानी केल्या होत्या

दि ६ ला बेळगावच्या 'कलोपासक मंडळ' या हौशी नाट्य संस्थेने रांगणेकरकृत 'एक होता म्हातारा' हे नाटक करून दाखविले समेलनाला जाडूनच मुंबईच्या मराठी साहित्य संघाने 'होनाजी बाळा' व 'भाऊबंदकी' हे आपले गाजलेले प्रयोग सादर केले 'होनाजी बाळा'चे नाटककार श्री चिं य मराठे हे मूळचे बेळगाव जिल्ह्यातलेच असल्याने समेलनाचे औचित्य साधून त्यांच्या सत्काराचा कार्यक्रम करण्यात आला

## नाट्यपरिषदेच्या उद्योगपर्वास प्रारंभ

बेळगाव समेलनापूर्वी श्री केशवराव दाते यांच्या लेखातून त्यासंबंधी जी अपेक्षा व्यक्त केली होती त्यात 'कालानुसार पडझड झालेल्या या जुन्या संघटनेची फळी सुनिश्चित व हौशी कलावंतानी पुन चांगली मजबूत केली पाहिजे' असे उद्गार काढले होते बेळगाव समेलनात मध्यवर्ती स्थायी समितीची जी नवी घटना समंत झाली त्या घटनेने या संघटनेसाठी एक भरभक्कम पाया सिद्ध करून दिला असे यथार्थपणे म्हणता येईल नाट्य परिषदेचा उपयोग हा केवळ नाटकवाल्यांसाठी नाही नाटक हे आपल्या सांस्कृतिक जीवनाचे महत्त्वाचे अंग आहे आणि म्हणून नाट्य परिषदेचे कार्य हे साऱ्या समाजाला उपकारक असे स्वरूपाचे आहे ही विचारसरणी विशेष जाणीवपूर्वक साकार करण्याचा विचार या कालखंडापासून सुरू झाला असे म्हणावे लागेल स्थायी समितीचे जे नामांतर केले त्यातहि याच युगांतराचा हेतु सूचित झाला आहे नाट्याच्या विविध अंगांचा समावेश होईल असा सर्वव्यापक उद्देश या समेलनापासून परिषदेने आपल्यासमोर ठेवला काही मंडळींच आणि कार्यक्रमांच 'समेलन' ही मर्यादित चाकोरी सोडून समेलनाचा रथ चौफेर मार्गावर घोडदौड करण्याची मनीषा बाळगून मार्गक्रमण करण्यास उद्युक्त झाला जनता आणि शासनसंस्था या दोघांच्याहि मनात नाट्यकलेविषयी आस्था

निर्माण करणे आणि नाटयविषयक कार्य करणाऱ्या हौशी व व्यावसायिक सस्थाना एकत्र आणून नाटय परिषदेला मराठी रगभूमीची एकमेव प्रातिनिधिक सस्थेचा दर्जा प्राप्त करून देणें हे परिषदेचे ध्येय निश्चित झालें यापुढील परिषदेच्या कार्याचे स्वरूप पाहिले म्हणजे परिषदेच्या कार्यकर्त्यांनीं आपली पावले याच दिशेने टाकण्यास सुरवात केली असे निर्विवादपणे म्हणता येते

## परिषदेचें वार्षिक कार्य

(दि ८ जाने १९५६ ते २२ डिसें १९५६)

बेळगाव येथील समेलन आटोपल्यानतर लगेच थोडया दिवसानी राज्य-पुनर्रचना समितीचा अहवाल प्रसिद्ध झाला त्यातील महाराष्ट्रविषयक निर्णयामुळें सर्व महाराष्ट्रभर असतोष धुमसू लागला अशा सतप्त वातावरणात परिषदेचे काम नेटाने चालू ठेवणे हे पहिल्या ५।६ महिन्यात तरी अशक्यप्राय झाले होते

या वर्षात कार्यकारी मडळाच्या पुणें व सोलापूर येथें एकूण तीन बैठकी झाल्या पहिली २२ एप्रिलची बैठक पुण्याला व दुसऱ्या दोन अनुक्रमें १९ ऑगस्ट व २१ डिसबरला सोलापूर येथें झाल्या

## शाखा व सभासद

बेळगाव समेलनाहून परतलेल्या मुबईच्या प्रतिनिधींनी मुबई येथें नाटय-परिषदेची स्थापना करून शाखेचे सघटनात्मक कार्य चालू केले अध्यक्ष केशवराव दाते व कार्यवाह आत्माराम भेंड याच्या प्रमुखत्वाखालील या शाखेने श्री वि य मराठे कृत 'लोकाचा राजा' या नाटकावरील चर्चेचा कार्यक्रम घडवून आणला त्याचप्रमाणे इब्सेनच्या ५० व्या पुण्यतिथीच्या निमित्तानें प्रा काणकर याचे व्याख्यान झाले

मुबईची शाखा स्थापन झाल्यानतर कार्यकारी मडळाच्या पहिल्या बैठकीत या शाखेला मजुरी देण्यात आली त्याचप्रमाणे शाखांसाठी पोट नियम तयार करून ते मजूर करण्यात आले

समेलनानतर महाराष्ट्रातील २६ नाटयसस्था परिषदेला सलग्न करून घेण्यात आल्या साधारण सभासदाच्या सख्येंतहि वाढ होऊन परिषदेचे एकदर ३०० सभासद नोंदविण्यात आले

## कार्यकारी मंडळांत फेरबदल

१९ ऑगस्टच्या बैठकीत कार्याध्यक्ष श्री. साठे यांनी दिलेला राजीनामा स्वीकृत करण्यात येऊन त्यांच्या जागी बेळगावचे श्री. लि. भी. नाईक यांची योजना करण्यात आली. श्री. नाईक यांच्या रिकाम्या जागेवर सोलापूरचे डॉ. शि. ज. दिवाडकर यांची नेमणूक करण्यात आली.

## रंगभूमिदिन व प्रकाशनें

संमेलनाच्या आदेशाप्रमाणे ५ नोव्हे. १९५६ ला सांगली, पुणे, कोल्हापूर अमरावती, मिरज इ ठिकाणी 'रंगभूमि दिन' साजरा करण्यात आला. सांगली येथील समारंभाच्या वेळी श्री वसंत शांताराम देसाई यांनी लिहिलेला 'नट, नाटक व नाटककार' हा ग्रंथ मराठी नाट्य-परिषदेचे प्रथम प्रकाशन म्हणून प्रसिद्ध करण्यात आला. श्री. पु. श्री. काळे यांनी लिहिलेले व श्री. भालचंद्र पेंढारकर यांनी प्रकाशित केलेले 'ललितकलेच्या सहवासात' हें पुस्तक मुंबई-शाखेस देणगी म्हणून मिळालें. श्री. केशवराव दाते यांनीहि सांगलीच्या वारीला उपस्थित राहून अनंत काणेकरांची 'घर' ही एकांकिका सादर केली. श्री. आत्माराम भेंडे व श्री भालचंद्र पेंढारकर यांनी अनुक्रमें 'फोन नं. ३३३३३' व 'स्वामिनी' ही आपल्या संस्थांची नाटके करून दाखविली.

या वर्षी परिषदेने एक अधिकृत 'वार्षिक' प्रकाशित करण्याचा संकल्प केला होता. परंतु त्यासाठी नाट्यसंस्थांकडून पुरेशी माहिती न आल्यामुळें हें प्रकाशन होऊं शकलें नाही.

## सन्मान्य सभासद

सर्वश्री बालगंधर्व, केशवराव दाते, चिंतामणराव कोल्हटकर, गणपतराव बोडस, आचार्य अत्रे, मामा वरेरकर, नेपथ्यकार पु श्री काळे व मा कृष्णराव यांना मराठी नाट्यपरिषदेचे सन्मान्य सभासद करून घेण्यात आले.

## दुखवटा

वृत्तांत वर्षांत आनंद संगीत मंडळीचे श्री. गो. ग. शिरगोपीकर, नटश्रेष्ठ श्री. चिंतोबा गुरव (दिवेकर), महाराष्ट्र ना म चे अध्वर्यु श्री. आण्णासाहेब कारखानीस, वीर वामनराव जोशी व श्री श्र. श्री. राजहंस हे नाट्यसेवेत

दिवगत झाले त्याच्या शोचनीय निधनाबद्दल दुखवटा व्यक्त करून तो सवधित आप्ताकडे पाठविण्यात आला

## अभिनंदन

श्री मामा वरेरकर याची भारतीय राज्यसभवर नियुक्ति झाल्याबद्दल त्याचे अभिनदन करून केंद्रीय सरकारला धन्यवाद देण्यात आले त्याचप्रमाण श्री गणपतराव बोडस याना सगीत नाटक ॲकॅडमीच अभिनयाचे पारितोषिक मिळाले याबद्दल त्याचेहि अभिनदन करण्यात आल व ॲकॅडमीस धन्यवाद देण्यात आले हौशी नटाच्या प्रयोगावरील करमणुकीचा कर माफ केल्या बद्दल मुबई सरकारचे अभिनदन करण्यात आल

## मराठवाडा नाट्य समेलन

दि १२ जानवारीला नादड यथे 'कलामदिर या सस्थच्या वतीन श्री गणपतराव बोडस याच्या अध्यक्षतखाली मराठवाडा नाट्य समेलन भरले होते इतर महाराष्ट्राबरोबर राजकीय क्षत्राप्रमाण सास्कृतिक दृष्टिनेहि एकरूप होऊ पाहणाऱ्या मराठवाड्यातील ह पहिलच समेलन अनेक दृष्टींनी फार सस्मरणीय झाल

समेलनाच स्वागताध्यक्ष श्री दिगबरराव बिंदु यानी आपल्या भाषणात मराठवाड्याच्या सुमारें एक शतकाची परपरा असलल्या नाट्यसवेचा आढावा घतला समेलनाचे उद्दिष्ट सागताना ते म्हणाले, ' मराठवाडा मागासलेला असला तरी रगभूमीच्या सेवत अतिशयच मागे म्हणज अगदी हाकच्याहि दूर आहे अस वाटू नये इतपत जरी या समेलनाने काय केले तरी पुष्कळ मिळविले अशी आमची भावना आह

समेलनाच उद्घाटन करताना श्री बाबुराव पेंढारकर म्हणाले "यावेळी आपण मराठवाड्यातील नाट्यप्रमी जनता आणि नाट्यसस्था मराठी नाट्य-परिषदच्या सहकार्याने यऊन रगभूमीच्या अडीअडचणी एकमुखान सरकार-पुढ माडल्या तर मी स्वानुभवान सागतो की रगभूमीच्या मार्गातील अडचणी अगदी लवकरच दूर होतील

## समाजमनाला रुचणारी नाटकें हवींत

समेलनाच अध्यक्ष श्री गणपतराव बोडस यानी प्रारभी मराठी रग-

भूमीच्या स्थित्यंतराचा तपशीलवार परामर्श घेतला पूर्वीच्या नाट्यप्रयोगासंबंधी ते म्हणाले, "पूर्वी नाटक मंडळ्यातून नाटकाच्या तालमी बिनचूक होत असत त्यामुळे नाट्यप्रयोगात सुव्यवस्थितपणा होता आज अभिनयकलेची तपश्चर्या करणारे दुर्मिळ झाले आहेत" नव्या रंगभूमीबद्दल बोलताना श्री वाडेकर म्हणाले, "केवळ नवनाट्य म्हटल्याने काही साध्य व्हावयाचे नाही मराठी रंगभूमीचा उत्कर्ष व्हावयाचा असेल तर मराठी मनाला पटेल व रुचेल अशा तऱ्हेची नाटके रंगभूमीवर यावयाला पाहिजेत हल्ली नवीनच रंगभूमीवर आलेले 'होनाजी बाळा' हे नाटक मराठी मनाला जुन्या जमान्यात नेऊन सोडते म्हणून इतर कोणत्याहि नाटकापेक्षा त्याचे प्रयोग रंगभूमीवर जास्त होत आहेत जुन्या नाटकाची मोहिनी अजून जनतेच्या मनावर आहेच नवीन नाटके करू नयेत असे माझे म्हणणे नाही नवीन नाटक करता करताच कुणीतरी आपल्या समाजाला आवडेल, त्याच्या अभिरुचीला पसंत पडेल, असे नाटक लिहू शकेल जुनी नाटके हा मराठी रंगभूमीचा पाया आहे, तो राखून नवीन नाटके समाजमनाला पटतील अशी केल्यास रंगभूमी उज्ज्वल होईल 'सौभद्र'सारख्या संगीतप्रधान जुन्या नाटकातील चाली अधिकृत म्हटल्या जाव्यात यासाठी त्यांची नोटेशन्स करून ठेवावीत . नाटकातील पद्ये रसपरिपोषाकरिता असतात निव्वळ गायकीसाठी नव्हेत, हे गाणाऱ्याच्या ध्यानी येईल तो सुदिन !'

शेवटी, नाट्य परिषदेसंबंधी बोलताना ते म्हणाले, "यापुढे मराठी नाट्य व रंगभूमि यासंबंधीचे कार्य संघटित रीत्या होणे अगत्याचे आहे ते करणारी 'मराठी नाट्य परिषद' बलशाली करणे सर्वांचे कर्तव्य आहे '

या संमेलनात एकूण सात ठराव मंजूर झाले मराठवाड्याच्या सर्वांगीण

र. भिडे यांनी ' मराठी रंगभूमीवरील तीन पतिव्रता ' या आपल्या व्याख्यानात सिंधू, निर्मला व भानुमती या तीन सर्वपरिचित नायिकांच्या स्वभावरेखांचे विवेचन करून मराठी स्त्रीमनामध्ये कसकसे परिवर्तन होत आहे याचे विवरण केले कुसुमाग्रजांचे ' मराठी रंगभूमीचे भवितव्य ' या विषयावर व्याख्यान झाले

मनोरंजनाच्या कार्यक्रमातील उल्लेखनीय कार्यक्रम म्हणजे प्रा गाडगीळ व श्री अण्णासाहेब गुंजीकर यांच्या सहकार्याने सादर करण्यात आलेला *' मराठी रंगभूमिदर्शन '* हा होय *विष्णुदासांच्या ' सीता-स्वयंवरा ' पासून मराठी रंगभूमीच्या विकासाचे प्रातिनिधिक प्रवेशांच्या द्वारें मनोरम दर्शन घडविणारा हा संगीतमय कार्यक्रम अत्यंत यशस्वी रीत्या आखण्यात आला* होता श्री बाबुराव पेंढारकरांनी ' झुंझारराव ' नाटकातील एक प्रवेश करून या कार्यक्रमाला अधिक रंगत आणली

संमेलनाला जोडून मराठवाड्यातील निरनिराळ्या नाटयसंस्थांच्या वतीने सहा नाटयप्रयोगांचा एक नाटयोत्सव साजरा करण्यात आला

मराठी रंगभूमीविषयी आस्थेवाईकपणाने कार्य करणाऱ्या मराठवाड्यातील नाटयप्रेमी मंडळींनी या संमेलनाला नाटय-परिषदेच्या अधिवेशनाचे स्वरूप प्राप्त करून दिले होते संमेलनाच्या सर्व कार्यक्रमांना श्रोत्यांनीहि फार आपुलकीने सहकार्य दिले होते मराठवाड्याच्या नाटय-जीवनात नवें चैतन्य निर्माण करण्याचे बहुमोल कार्य या संमेलनाने साधलें असें निश्चितपणे म्हणता येईल

---

# ३९. सोलापूर

१९५७



अध्यक्ष पार्श्वनाथ आळतेकर

रेजिस्नार, मराठी नाटयाचे एकनिष्ठ सेवक, नाटय-शिक्षणाचे व अभिनयाचे वर्ग चालविले. नव्या व प्रागतिक दृष्टीचे दिग्दर्शक.

मराठी नाटय समेलनाचे ३९ वे अधिवेशन सोलापूर येथील अभिनय साधना-मदिराच्या वतीने दि २२ व २३ डिसे १९५७ या दिवशी श्री पार्श्व-नाथ आळतेकर याच्या अध्यक्षतेखाली साजरे झाले

दि २२ ला नटराजस्तवनाने समेलनाला प्रारभ झाला नाटय परिषदेच्या सोलापूर शाखेचे अध्यक्ष श्री के प मगळवेढेकर याच्या प्रास्ताविक भाषणा-नतर श्री केशवराव दाते याच्या हस्ते समेलनाचे उद्घाटन झाले आपल्या उद्घाटनाच्या भाषणात श्री केशवराव दाते म्हणाले, "मराठी नाटय-समेलनास आयुर्मानाच्या दृष्टीने ३९ वर्षे झाली असली तरी कार्याच्या दृष्टीने ते अजून लहानच आहे आपण सर्व आस्थेने व कळकळीने येथे जमलो आहात, तेव्हा सघभावनेने आपण आपले काम करू

रंगभूमीपासून करमणूक होत असेल, पण ती एक लोककला आहे- त्यामुळेंच रंगभूमीवर येणाऱ्या नाट्यप्रयोगाचा जनमनावर काय परिणाम होतो इकडे लक्ष देणें आवश्यक आहे. जनमनाला तयार करण्याचें महत्त्वाचें कार्य रंगभूमीच्या अत्यंत प्रभावीपणानें करतां येतें असें मला वाटतें. रंगभूमीचें हें सामर्थ्य ओळखून तिला समाजसेवेकरितां राबवायची हें पूर्वीच्या नाट्यव्यवसाय करणाऱ्या लोकांनी केलें नाही. त्याची कारणमीमांसा आज उगाळीत बसण्यांत अर्थ नाही. कारण आतां त्या कंपन्या गेल्या आणि ती पिढीहि गेली. आज जमलेले प्रतिनिधि नव्या पिढीचे आहेत, सुशिक्षित व सन्मान्य नागरिक आहेत आणि रंगभूमीची हौसेनें सेवा करण्यास निघालेले आहेत. रंगभूमिद्वारा, बहुजनसमाजाचें कल्याण करणारे समाजसेवक आहेत.

परिषदेच्या कार्याची इमारत उभारणें आता आपल्या हातीं आहे; व ही इमारत उभारण्याच्या कामगिरीस आपण आतां तत्परतेनें सुरुवात केली पाहिजे." यानंतर परिषदेच्या भावी कार्यासंबंधी एका 'विमर्शपरिषदे'ची योजना तात्डतोब हातीं घ्यावी असे सांगून अध्यक्षाच्या हातीं अधिवेशनाचीं सूत्रें देताना श्री. दाते म्हणाले, "आजच्या अधिवेशनाचे अध्यक्ष श्री. पार्श्वनाथ आळतेकर हे थोर अभ्यासू आहेत. अभिनयाच्या प्रत्येक अंगाचा त्यांनी गाढ अभ्यास केला आहे. त्यांच्या नियंत्रणाखाली हे अधिवेशन अत्यंत यशस्वी रीतीनें पार पडेल आणि त्यांच्या कारकीर्दीत परिषदेच्या भव्य मंदिराचा पाया घातला जाईल यात मला शंका वाटत नाही. तेव्हां त्यांना प्रणाम

कलेसाठीच कला अमली पाहिजे हे पूर्णत खरें नाही समाजाचें नीतिजीवन समृद्ध करणे यातच कलेचें सार्थक आहे "

अध्यक्ष श्री आळतेकर स्थानापन्न झाल्यानतर त्याचा विविध सस्थातर्फे पुष्पहार घालून गौरव करण्यात आला चिटणिसानी अहवालवाचन व सदेशवाचन केल्यानतर अध्यक्षीय भाषण झाले

## भारताची पुरातन रगभूमि

रगभूमीच्या आरभापासूनचा तिचा इतिहास सागताना श्री आळतेकर म्हणाले, "भारतीय रगभूमि ही २००० वर्षांची पुरातन असावी नाटय हा पाचवा वेद ब्रह्मदेवान निर्माण केला अशी भरतमुनीची साक्ष आहे या नव्या वेदासाठी ऋग्वेदाने 'कथा' दिली, सामवेदाने 'सगीत' दिले, यजुर्वेदान 'अभिनय' दिला व अथर्ववदान 'रस' दिले अशी ही जुनी नाटयकला।

तेराव्या शतकातील कळसूत्री बाहुल्याचे खेळ त्याचे छाया नाटय व नतरची दशावतारी नाटक याप्रमाणे प्रगति होऊन कै विष्णुदास भावे यानी रगभूमीची पहिली पद्धतशीर घटना करण्याचा मान मिळविला तथापि या सप्रदायाला नवें वळण लागून १८८० साली मराठी रगभूमीचा सप्रदाय निर्माण करण्याचे श्रय कै आण्णासाहेब किर्लोस्कराचेंच होय तेव्हापासून १९३० पर्यंत रगभूमीचा सतत उत्कर्ष होत गेला किर्लोस्कर, देवल, खाडिलकर, कोल्हटकर, गडकरी, वरेरकर व अत्रे या सप्तर्षींच्या सामर्थ्यसपन्न नाटकानी रगभूमीला जागविले"

जिथें ' रंगमंदिरें ' होती तिथें ' चित्रमंदिरें ' उभीं राहिलीं. करमणुकीच्या कराचें ओझें वाहात, रंगभूमीला, स्वतःचें हक्काचें घर नसल्यानें ' वनवासी ' व्हावें लागलें. चित्रपटांशी स्पर्धा करण्यासाठी रंगभूमि बदलण्याची धडपड सुरू झाली. तीन तासांची नाटकें निघाली, नाटिका अवतरल्या. नाटयमन्वंतरनें बदलत्या कालानुरूप आधुनिक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. माझ्यासारख्यानें नॅशनल थिएटर ॲकादमीसारख्या संस्थेची स्थापना करून व लिटर थिएटरच्या धर्तीनें नाटयप्रयोग सादर करण्याचा प्रयत्न केला. "

## अभिनयाचें शस्त्र व शास्त्र

भारत सरकारनें नाटयकलेला उत्तेजन देण्यासाठीं चालविलेल्या विविध योजनांचा उल्लेख करून श्री. आळतेकरांनीं बोलपटांपेक्षां रंगभूमीचें सामर्थ्य वरचढ ठरल्याचें बंगाली नाटकाची उदाहरणें देऊन दाखवून दिलें. असें *असतानाहि मराठी रंगभूमि हतप्रभ कां झाली याचें विवेचन करतांना* ते म्हणाले, " जुन्या रंगभूमीला चेहरा ' मोलका ' करणें जरूरीचें आहे असें वाटलेच नाहीं. नाटयाचा प्रायोगिक आविष्कार यथायोग्य झाला तरच रंगभूमि खऱ्या अर्थानें जिवंत राहणार आहे. अभिनय हें नटाचें शस्त्र आहे, म्हणून त्याने त्याचें ' शास्त्र ' अभ्यासिलें पाहिजे.

एकाद्या भूमिकेचा अभिनय यशस्वी तऱ्हेनें करणें ही कठिण कला आहे. संवेदनाप्रमव व प्रत्यक्ष असी नटाची भावाविष्कृति ही स्वतंत्र कला आहे. अभिनय करणारा नट म्हणजे केवळ चार घटका करमणूक करणारा कलावंत नव्हे, तो एक सर्जनशील कलावंत आहे. जनतेला सुसंस्कृत करणारा, रंजविणारा नट म्हणजे कलावंत आहे.

एकात्मता निर्माण करावी लागते, त्यासाठी नाट्याच्या तात्त्विक अंगाचा अभ्यास करावा लागतो

आजच्या रंगभूमीने आपले ताांत्रिक अंग सुधारले पाहिजे सजावटीची साधनं, प्रकाशयोजना, फिरते रंगमंच, रंगभूषा, वेषभूषा, केशभूषा इ बाबतीत अद्यावतपणा या गोष्टी आणण्याची आज आवश्यकता आहे

## जिझिया कर आणि ठेकेदारीचा गळफास

श्री आळतेकर यांनी रंगभूमीच्या आर्थिक दुर्दशेला कारणीभूत झालेला नवा जिझिया कर – करमणूककर – सरकारने संपूर्ण माफ करावा आणि 'प्रयोगनिर्मिती 'ची मूल्ये दुर्लक्षिणाऱ्या ठेकेदारीच्या व्यवसायाला पायबंद बसावा अशा सूचना केल्या अभिनय-शिक्षणासंबंधी ते म्हणाले, " हौशी नटमंचातून अभिनयशक्ति असणारे नट हेरून त्याना नाट्याभिनयाचे, निर्मितीचे शास्त्रशुद्ध शिक्षण देण्याचे कार्य करणाऱ्या अॅकॅडमी 'ची फार जरुरी आहे नाट्याभिनयाच्या शाळावाचून नव्या अभिनयसंपन्न नटाची परंपरा निर्माण होणार नाही, नाट्यव्यवसाय चालणार नाही आणि रंगभूमीला उत्तेजन देणाऱ्या सर्व सरकारी योजनाहि निष्प्रभ ठरतील म्हणून नाट्य-परिषदेने अशा नाट्यशाळा स्थापन करून पहाव्या "

आपल्या भाषणाच्या शेवटी, मुंबई, पुणे नागपूर या विद्यापीठांनी रंगभूमीचा वारसा जतन करून तो वाढविण्यासाठी नाट्यशास्त्राची स्वतंत्र शाखा (Faculty) निर्माण करावी सरकारी मदतीने बांधली जाणारी नाट्यगृहे अद्ययावत् साधनांनी सुसज्ज असावीत, सरकारने नाट्यव्यवसायाची चौकशी करण्यासाठी कमिशन नेमावे नाट्यविषयक सर्वांगीण साहित्य उपलब्ध व्हावे, आणि या सर्वांसाठी नाट्यपरिषदेची सभासदसंख्या वाढवून तिला आर्थिक साहाय्य करावे अशा अनेक सूचना करून श्री आळतेकर यांनी आपले भाषण संपविले

होता कारण त्याच्या मते, "व्यावसायिकांचे जीवन नाटकावर अवलंबून असल्यामुळे त्यांना नाटचप्रयोग शक्य तितके उत्तम करावे लागतात हौशी नटांपेक्षा रंगभूमीचा उत्कर्ष व्यावसायिकच करू शकतील म्हणून त्यांना सरकारने आर्थिक माहाय्य व इतर सर्व सवलती दिल्या पाहिजेत" श्री पेंढारकर यांनी आपल्या निबंधात नाटचप्रयोगाच्या खर्चाची आकडेवारी व सरकारी निर्बंधांचे तपशील मांडून नाटचगृहांची आवश्यकता प्रतिपादन केली व विशिष्ट दर्जा राखणाऱ्या नाटचसंस्थानाच सरकारी मदत मिळावी असे मत व्यक्त केले या निबंधावर चर्चा होऊन त्यात श्री के नारायण काळे, डॉ द् का मत, श्री प्रभाकर जोगळेकर, श्री नाना जोग व श्री रतनचंद हिराचंद यांनी भाग घेतला

श्री काळे यांनी आपल्या भाषणात, पूर्वीप्रमाणे फिरत्या व्यावसायिक नाटक मंडळयांचे पुनरुज्जीवन होणे अशक्य व अनिष्ट असल्याचे सांगून नाटचव्यवसायाची पुनर्घटनाच केली पाहिजे हा विचार मांडला श्री रतनचंद म्हणाले, "नाटकासारखी उच्च करमणूक जनतेने थोडक्यात विकत घेणे नामुश्कीचे असून संपन्न नागरिकांनी भांडवल उभारून रंगभूमीला मदत करावी गैरवाजवी पैसे मागणाऱ्या नटनटींनीहि त्याग करावा" श्री पेंढारकर यांनी चर्चेला उत्तर दिल्यानंतर हा कार्यक्रम संपला

संमेलनाच्या दुसऱ्या दिवशी 'हौशी नटांचे रंगभूमीच्या इतिहासात स्थान' या विषयावर परिसंवाद झाला या परिसंवादाची सुरुवात श्री के नारायण काळे यांनी केली, व त्यात श्री बाबुराव पेंढारकर, श्री केशवराव दाते, श्री. आत्माराम भेंडे प्रभृतींनी भाग घेतला परिसंवादातील काही वक्त्यांवरून संमेलनात 'हौशी विरुद्ध व्यावसायिक' असा सामना उभा राहिला, तर काही वक्त्यांनी या दोहोंचा समन्वय करावा असे सुचविले उत्तम निर्मिति हे दोघांचे ध्येय असावे, दोघांनीहि त्यासाठी पूर्वतयारी करावी व त्याने अवश्य ते ज्ञान मिळवावे असे मुद्दे चर्चेत मांडले गेले

१

२

यानंतर विषयनियामक समितीत मान्य झालेल्या ठरावावर भाषणें होऊन ते संमत करण्यात आले. यांतील प्रमुख ठराव असे —

(१) प्रथम अध्यक्षांनी दुखवटयाचा ठराव माडला व सर्वांनी उभें राहून तो मंजूर केला. या ठरावांत ३० व्या नाटयसमेलनाचे अध्यक्ष नाटयमहर्षि अण्णासाहेब कारखानीस, श्री. चिंतोबा गुरव, थोर वामनराव जोशी, श्री. शिरगोपीकर, या नाटयक्षेत्रांतील थोर व्यक्तीच्या दु:खद निधनाचा उल्लेख होता.

(२) दुसऱ्या ठरावात एकभाषिक निर्मितीसाठी ज्यांनी आपलें बलिदान केलें त्याना संमेलनाच्या वतीनें श्रद्धांजलि अर्पण करण्यात आली.

यापुढील ठराव शिफारसवजा होते —

(३) मुंबई सरकारप्रमाणेच भारतातील इतर राज्यसरकारानींहि हौशी नाटयस्पर्धा भरवाव्या व त्यासाठी संगीत-नाटक-ॲकॅडेमीनें प्रयत्न करावा.

(४) नाटयपरिषदेच्या वार्षिक अधिवेशनाला उपस्थित राहणाऱ्याना रेल्वे प्रवासाच्या सवलती मिळाव्यात

(५) बेळगाव, कारवार वगैरे मराठी भाषिक प्रदेश मुंबई राज्यात समाविष्ट करण्याबद्दल 'विभागीय मंडळा'ने लक्ष घालावें न त्याच्याकडून हें कार्य न झाल्यास भारत सरकारने त्यांत लक्ष घालावें.

(६) सलग मराठी — भाषिक प्रदेशाचें एक राज्य करण्यात यावें.

(७) सरकारने करमणूक कर माफ करावा.

नाटयविषयक पुढील कार्यासंबंधी पुढील ठराव होते —

(८) दि. ५ नोव्हेंबरला मराठी नाटयाची पढरी 'सागली' येथें 'रंगभूमिदिन' साजरा व्हावा व त्याला सर्वांनी उपस्थित राहावें

(९) नाटयपरिषदेच्या कार्यासाठी लागणाऱ्या आर्थिक तरतुदीसाठी 'कायमनिधि' जमा करण्यास एक समिति नेमावी. याशिवाय नाटयविषयक ग्रंथ, मासिक पत्रिका, वार्षिक अहवाल, परिसंवादाचे आयोजन, संदर्भ-सूचि इ. संबंधीच्या शिफारसींनाहि मान्यता देण्यात आली.

या ठरावांपैकी 'कायमनिधि' जमविण्याचा ठराव फार महत्त्वाचा होता. परिषदेचा वार्षिक खर्च ज्यातून भागू शकेल एवढा निधि उभा करण्याचे या संमेलनांत ठरविण्यात आले. संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री. रतनचंद हिराचंद

यांनी ५०१ रुपयांचा पहिला आकडा टाकून निधीला प्रारंभ केला श्री दादासाहेब फिर्पेकर यांनी निधीला रु २५ ची देणगी दिली

मुख्यत नाट्यप्रयोगाच्याद्वारा हा निधि जमवावा असे ठरले या कार्यासाठी पुढील समिति नेमण्यात आली—अध्यक्ष श्री आळतेकर, श्री केशवराव दाते, श्री के नारायण काळे, श्री बापूराव पेंढारकर, श्री रतनचंद हिराचंद, श्री नाना जोग, डॉ भा गो रानडे, व श्री गो म वाटवे (निमंत्रक)

श्री पार्श्वनाथ आळतेकर यांनी अत्यंत कळकळीच्या शब्दात अध्यक्षीय समारोप केला त्याच वेळी पुढील अधिवेशनासाठी साताऱ्याचे आमंत्रण स्वीकारण्यात आल्याचे जाहीर करण्यात आले आभारप्रदर्शन होऊन संमेलन समाप्त झाले

करमणूक

संमेलनात अभिनय-साधनामंदिराच्या वतीने 'उद्याचा संसार' व मुंबईच्या इंडियन नॅशनल थिएटरतर्फे 'फोन नं ३३३३३' असे दोन नाट्यप्रयोग सादर करण्यात आले

नाट्य परिषदेचे वर्षभरातील कामकाज

( दि १ जाने १९५७ ते २८ डिसें १९५७ )

सन्माननीयांचे सत्कार

थिएटर नाट्यसंस्थानी अनुक्रमें ' अमलदार ' व ' फोन न ३३३३३ ' हे दोन यशस्वी नाट्यप्रयोग करून दाखविले [१] दि. १४ सप्टेंबरला, त्या वेळचे जिल्हा न्यायाधीश श्री वि अ नाईक याच्या अध्यक्षतेखाली श्री आळतेकर याच्या सत्कारसमारंभाचा मुख्य कार्यक्रम मोठ्या उत्साहान साजरा करण्यात आला.

## खडाळ्याची विमर्श परिषद

सोलापूर-समेलनात ठरल्याप्रमाणे मे महिन्याच्या १८ व १९ तारखास खडाळा येथील आचार्य अत्रे याच्या बगल्यावर परिषदेच्या कार्यकारी मडळाची बैठक व त्याम जोडूनच एक विमर्श-परिषद बोलावण्यात आली सर्वश्री के नारायण काळे, प्रभाकर गुप्ते, मा कृष्णराव, प्रा शेणोलीकर, आत्माराम भेंडे, लि भि नाईक, ला कृ आयरे, डॉ वरवे व गो म वाटवे ही मडळी उपस्थित होती बैठकीत परिषदेच्या कार्यासबधी थोडी अनौपचारिक चर्चा होऊन पुढील कार्यक्रमासबधी एक अँडहॉक समिटी नेमण्यात आली

## रगभूमि दिन

परिषदेच्या आदेशाप्रमाणे सागली येथे दि ५ नोव्हेंबरला रगभूमिदिन साजरा करण्यात आला या वेळीच परिषदेच्या कार्यकारी मडळाची दुसरी बैठक होऊन आगामी सातारा-समेलनातील कार्यासबधी चर्चा झाली

रगभूमि दिनाच्या कार्यक्रमाला परिषदेचे अध्यक्ष श्री पार्श्वनाथ आळतेकर उपस्थित होते त्यानी आपल्या अध्यक्षीय भाषणात परिषदेच्या कार्याची माहिती सागून नाट्याभिनयाचे महत्त्व वर्णन करून सागितले या कार्यक्रमानतर ' ललितकलादर्श 'च्या वतीने श्री पु भा भावे कृत ' स्वामिनी ' नाटकाचा प्रयोग सादर करण्यात आला श्री आत्माराम भेंडे यानी ' एकेकाचा आजार ' ही एकाकिका करून दाखविली

---

१ या नाट्यप्रयोगाच्या उत्पन्नातून परिषदेला आर्थिक साहाय्य होईल या अपेक्षेनें हे प्रयोग करण्यात आले होते परतु पुण्यासारख्या ठिकाणी हे प्रयोग फायदेशीर न होता तनवट्याचेच ठरले आणि त्यामुळे आलेली तूट कर्ज भरून काढावा या विचारानें परिषदेचे कार्यकर्ते चिंताग्रस्त झाले '

गाऱ्हाण्यांची दाद लावण्याचा प्रयत्न '

सोलापूर संमेलनात श्री केशवराव दाते यांनी नाटयकलेच्या अवनतीसंबंधी एक ठराव मांडून तो मंजूर करून घेतला होता. व्यावसायिक रंगभूमीच्या उत्कर्षाच्या आड आज ज्या ज्या गोष्टी येत आहेत त्यांचे निरसन करून घेण्यासाठी कार्यकारी मंडळाने एक विस्तृत निवेदन तयार करून ते सरकारला सादर करावे असा आदेश या ठरावात देण्यात आला होता.

दि. ६ मे १९५७ ला शिक्षणखात्याच्या उपमंत्री श्रीमती निर्मलाराजे भोसले यांच्या निमंत्रणावरून नाटयपरिषदेच्या मुंबईशाखेतर्फे सर्वश्री चिंतामणराव कोल्हटकर, केशवराव दाते व आत्माराम भेंडे यांच्या शिष्टमंडळाने उपमंत्र्यांची भेट घेऊन त्यांना परिषदेच्या वतीने एक निवेदन सादर केले. 'मराठी नाटयपरिषद ' ही मराठी रंगभूमीची प्रातिनिधिक संघटना मानली जात असल्याने तिला मध्यवर्ती संघटना अशी मान्यता देऊन रंगभूमिविषयक निर्णय घेताना सरकारने या संघटनेचा सल्ला घेऊन आपले धोरण ठरवावे अशी विनंती या निवेदनात करण्यात आलेली होती.

या भेटीतून पुढे काहीहि निष्पन्न झाले नाही.

यानंतर सटाळा येथे परिषदेच्या कार्यकारी मंडळाची बैठक होऊन तीत सोलापूर संमेलनात मंजूर झालेल्या श्री दाते यांच्या ठरावाची अमलबजावणी करण्यासाठी सर्वश्री आळतेकर, कोल्हटकर, दाते, के. ना. काळे, प्रा. वनहट्टी व भेंडे यांची एक समिति नियुक्त करण्यात आली व त्या समितीने श्री. यशवंतराव चव्हाण यांची भेट घ्यावी असे ठरविण्यात आले. तदनुसार दि. १९ जुलैला या समितीने मुख्य मंत्र्यांची भेट घेऊन त्यांना एक निवेदन

आवश्यक असणारे परवाने एकाच कचेरीतून मिळण्याची व्यवस्था व्हावी. ( iii ) करमणुकीचा कर संपूर्णपणें माफ करण्यांत यावा. तसें करणें शक्य नसल्यास हा कर व्यवसायाला परवडेल असा माफक असावा. ( iv ) बंदिस्त नाट्यगृहें उभारण्याची योजना आखण्यात यावी. याबरोबरच सरकारी नाट्यस्पर्धासंबंधीहि परिषदेच्या वतीने अनेक सूचना करण्यात आल्या होत्या.

मुख्यमंत्र्यांच्या बरोबर परिषदेच्या शिष्टमंडळाने सुमारें ४० मिनिटें चर्चा केली. परिषदेच्या मागण्यांपैकी परवाने व तपासणीसंबंधीच्या अडचणी तावडतोब दूर करण्याचें मुख्य मंत्र्यांनी आश्वासन दिलें. इतर बहुतेक मागण्यांसंबंधी 'सरकार सहानुभूतीनें विचार करील', 'सूचना स्वीकारणें कठीण आहे', 'विचार चालू आहे,' अशा आशयाची उत्तरें मिळून त्या फेटाळण्यांत आल्या.

अशा प्रकारें हा प्रयत्न बव्हंशी निष्फळ ठरला असला तरी या बाबतीत तक्रार अर्जांना केराची टोपली दाखविण्याचा किंवा मासलेवाईक उत्तरांनीं बोळवण करण्याचा जुना पायंडा मोडून परिषदेच्या निवेदनाची दाद घेतल्याबद्दल समाधान मानून नाट्यपरिषदेच्या वतीने मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांना धन्यवाद देण्यांत आले.

# ४०. सातारा

१९५८



अध्यक्ष वि स खांडेकर

*मराठीतील श्रेष्ठ साहित्यिक नाटक, कथा, निबंध, कादंबरी, टीका वगैरे सर्व क्षेत्रात यानी असामान्य यश मिळविले आहे*

नाट्य-परिषदेचे ४० वे अधिवेशन सातारा येथील कला-मंदिराच्या विद्यमान दि २८ डिसेंबर, १९५८ ला श्री विष्णु सखाराम ऊर्फ भाऊसाहेब खांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते

## खुल्या अधिवेशनापूर्वी

दि २८ ला सकाळी कार्यकारी मंडळाची सभा होऊन गत वर्षाचा अहवाल मान्य करण्यात आला नवीन सभासद व सोलापूरची शाखा याच्या अर्जांना मंजुरी देण्यात आली परिषदेला झालेल्या कर्जाची फेड व कायम निधाची योजना यासंबंधी चर्चा झाली शाखा-कार्यालयाचे नियमावरहि थोडा विचार विनिमय होऊन ते किरकोळ दुरुस्तीनंतर मंजूर करण्यात आले

## नाट्य तपस्व्यांचे आवाहन

दुपारी ४ वाजता नगरपालिकेने उभारलेल्या खुल्या नाट्यगृहात संमेलनाला सुरुवात झाली स्वागत गीतानंतर संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री चिंतामणराव कोल्हटकर यानी आपल्या स्वागतपर भाषणात सातारा जिल्ह्यान केलेल्या मराठी रंगभूमीच्या अविस्मरणीय सेवेचा सविस्तर परामर्श घेतला सवश्री आगरकर महादेवशास्त्री कोल्हटकर वा ना आपटे अच्युतराव कोल्हटकर बाळ कोल्हटकर वि नी देशपांडे व शा गो गुप्ते हे नाटककार आणि

गणपतराव जोशी, मोरोबा वाघुलीकर, कृष्णराव गोरे, भडकमकर इ नट याच्या नाट्यविषयक लोकोत्तर कामगिरीचा त्यानी प्रामुख्यान उल्लेख केला शाहूनगरवासी, आळतेकर, कन्हाडकर, कवठेकर, इ नाट्यसस्थाचा निर्देश करून श्री कोल्हटकर म्हणाले, "आजच्या समेलनाच्या कार्यकर्त्यांची व सातारकर रसिकाची अभिरुचि अशा थोर कलावताच्या पुण्याईवर जोपासली आहे तेव्हा त्याचे पुण्यस्मरण आजहि निश्चित स्फूर्ति देणारेच होईल "

पूर्वीच्या नाट्यव्यावसायिकाच्या चुकाचा निर्देश करून नव्या व्यावसायिकाना आवाहन करताना ते म्हणाले, "नाट्यव्यवसायात माझी हयात गेली असल्यामुळे अशा समेलनप्रसगी माझ्यापुढे प्रश्न उभा राहतो तो व्यावसायिक प्रगतीचा पूर्वीच्या काळी सघटनेने, सहकार्याने काम करण्याचे महत्त्व आम्हास कळले नाही ही अक्षम्य चूक झाली या काळातील व्यावसायिकानी तरी ही चूक करू नये अशी माझी त्याना आग्रहाची विनती आहे नाट्यकलेच्या प्रगतीसाठी सरकारने शिष्यवृत्त्या ठेविल्या आहेत पण व्यवसाय भरभराटीचा नसेल तर शिष्यवृत्ति घेऊन उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांनी काय करावयाचे ? भरभराटीच्या व्यवसायाचे आमिष असल्याविना नुसत्या कलोपासनेसाठी आपल्या आयुष्याचा जुगार खेळावयास कोण तयार होईल ? म्हणून सरकारने व अशा समेलनानी व्यावसायिकाची दखल प्रथम घेतली पाहिजे "

शेवटी श्री कोल्हटकरानी सरकार व परिषद या दोघानाहि उद्देशून अनेक सूचना केल्या त्यात सरकार रगभूमीसाठी खर्च करीत असलेल्या पैशाचा योग्य आणि जास्तीत जास्त उपयोग होतो की नाही याचा परिषदेने तपास करून तो सरकारच्या कानी घालावा, सरकारी स्पर्धेत उत्तम ठरणारा प्रयोग महाराष्ट्रात सर्व महत्त्वाच्या शहरी दाखवला जावा, उघड्या नाट्यगृहाची खरी उपयुक्तता अजमवावी इ सूचना फार महत्त्वाच्या होत्या

स्वागताध्यक्षाच्या भाषणानतर श्री कमलादेवी चट्टोपाध्याय यानी समेलनाच उद्घाटन केले आपल्या उद्घाटनाच्या (इग्रजी) भाषणात त्यानी पुढील विचार व्यक्त केले, "आजच्या भारतीय नाट्याला कसलाच जातिवतपणा नाही जुन्या अभिजात सस्कृत परपरेशी धागा तुटलेला आहे आणि आपले 'नवे' म्हणून जे नाट्य आहे त्यातहि पाश्चात्याच्या अनुकरणापलीकडे भारतीय असे वैशिष्ट्य निर्माण झालेले नाही या त्रिशकूसारख्या परिस्थिती-

तून मार्ग काढायचा तर आपल्या परंपरेला पुन्हा एकदा वजन आणि एक-सूत्रीपणा आणली पाहिजे त्यासाठी जुन्या संस्कृत प्रयोगशैलीचाच आधार घ्यावा, मात्र हे पुनरुज्जीवन नक्ली, वरवरचे नसावे नाट्य हे केवळ जीवनाचे प्रतिबिंब नसून जीवनाचे उत्कट आणि अर्थघन दर्शन त्यात मूर्त घेतलेले असते नाटकाचा चागला प्रवेश हे नुसते वास्तववादी चित्र नसते तर ती एक प्रतिमा (Image) असते नाट्यामध्ये आपली स्वतंत्र भारतीय शैली आणि आपले स्वतंत्र मानदंड (Standards) निर्माण झाले पाहिजेत

आजचे आपले नाट्यतंत्रहि अत्यंत प्राथमिक अवस्थेत आहे भारतात आज खऱ्या अर्थाने सुसज्ज असे एकहि नाट्यगृह नाही प्रयोगाच्या तंत्राचे शास्त्रशुद्ध शिक्षण भारतातील कलावंताना मिळणे फार आवश्यक झाले आहे आज त्या बाबतीत सगळीकडे निष्काळजीपणाचे राज्य आहे नेपथ्यात भव्यतेपेक्षा औचित्य व सूचकता ही महत्त्वाची असतात अशा साध्या गोष्टींचीहि जाणीव आज दिसत नाही भारतीय नाट्यशास्त्रात प्रयोगतंत्राविषयी अत्यंत सूक्ष्म आणि तपशीलवार विचार आहे ती सूक्ष्मता अगी बाणली पाहिजे " भाषणाच्या शेवटी श्रीमती कमलादेवींनी 'भारतीय नाट्यसंघ' करीत असलेल्या नाट्यविषयक कार्याची माहिती दिली

उद्घाटनाचे भाषण झाल्यानतर परिषदेचे कार्याध्यक्ष श्री लि भि नाईक यानी नियोजित अध्यक्ष श्री खाडकर याना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनती केली त्याला श्री बाबुराव पेंढारकर, श्री पुरोहित, श्री गोमकाळे प्रभृतींनी अनुमोदन दिल्यानतर अध्यक्ष स्थानापन्न झाले परिषद व इतर सस्था याच्या वतीने अध्यक्षाना पुष्पहार अर्पण करण्यात आल्यावर सदेश-वाचन होऊन चिटणीस श्री वाटवे यानी गेल्या वर्षाचा अहवाल वाचून दाखविला, आणि अध्यक्षाच्या हस्ते 'समर्थ' साप्ताहिकाच्या नाट्य-विशे-षाकाचे प्रकाशन करण्यात आले श्री खाडेकरानी आपले छापील भाषण बाजूला ठेवून सुमारे २ तास उत्स्फूर्त भाषण केले व रगभूमीच्या विविध अगापागाचा सविस्तर परामर्श घेतला त्याच्या भाषणात पुढील महत्त्वाचे विचार होते —

### आत्म्याला आवाहन

नाटककार आणि नट याच्या प्रतिभाच्या सगमातून नाट्य निर्माण होते

भामिनीची भूमिका ही खाडिलकर आणि बालगंधर्व या दोन कलावतांनी उभी केली होती मराठी मनावर संस्कार करणाऱ्या कलामध्ये नाटच हा महत्त्वाचा घटक आहे 'भाऊबंदकी' नाटकाचा प्रयोग हा एक अविस्मरणीय अनुभव होता माजर जो दूध पाजील त्याचे होते, पण माणसाचा धर्म वेगळा आहे हे रामशास्त्र्यांने शिकविले या भूमिकेचा खरा परिणाम प्रयोगाच्या वेळी होतो मन कुठें तरी उच्च पातळीवर भरारत जाते आत्म्याला असे आवाहन करणारी ही नाटचकला आहे या प्रभावाच्या संदर्भात केवळ कलावादाची कसोटी उपयोगी पडत नाही, नाटकापाठीमागची प्रेरणा महत्त्वाची असते

## नाटक हें एक हत्यार आहे

सामान्य माणसाच्या सुखदु खाच्या संवेदना क्षणिक असतात, पण कलावताच्या संवेदना त्याचे काळीज भेदून जातात अशा प्रेरणेतूनच नाटकाला थोरवी आणि पातळी लाभते देवलाच्या 'शारदे'मागे अशीच अस्सल देशी प्रेरणा आहे सुरतेच्या वेबनावाचे दु ख खाडिलकराना झाले, त्यातूनच 'भाऊबंदकी' निर्माण झाली विद्यार्थ्यांच्या मोहवशतेचा परिणाम होऊन 'विद्याहरण' निर्माण झाले या निर्मितीचा उगम खाडिलकराच्या व्यक्तित्वात आहे येथें ते टिळकाचे शिष्य होते हे विसरून कसे चालेल ? हजारो व्यक्तीवर एकदम सस्कार करणारी ही कला असामाजिक नाही, ते एक हत्यार आहे आज नाटकाचा उपयोग हत्यारासारखाच करण्याची वेळ आहे पडद्यापुढें नटाने केलेले काम आपल्याला दिसते, पण ती भूमिका आत्मसात् करण्यासाठी त्याला रक्ताचे पाणी करावे लागत, सर्वस्वाचे दान करावे लागत पण त्यामुळेच गणपतराव जोश्यानी उभा केलेला हॅम्लेट टीकाग्रथाहून मनात खोल रुजत असे "

रीतीनें व शवच्छेदनाच्या पद्धतीनें केले जात आहे हे योग्य नाही परदेशी मालाच्या निकपावर पन्नास वर्षांपूर्वीची कलाकृति घासून पाहणे यासारखी दुसरी अरसिकपणाची गोष्ट नाही आपली संस्कृति, सामाजिक परिस्थिति, रजनाच्या पिढीजात कल्पना, वाङमयीन परपरा व पाश्चात्य नाट्यवाङमयाच्या परिचयान प्रतिभावताना मिळालेले आव्हान व चढलेले स्फुरण इ गोष्टीच्या सदर्भातच १८८० ते १९३० या अर्धशतकातील रगभूमीच्या विकासाचा आलेख आपण तयार केला पाहिजे 'वाङमयाची मुळें राष्ट्राच्या मानसिक भूमीत खोल गेलेली असतात त्याच्या शाखा, फुल व फळें राष्ट्राच्या मानसिक वातावरणाच्या विशिष्ट अवस्थेंतच उत्पन्न होऊन वृद्धि व क्षय पावतात ' हें एका विचारवताचे उद्गार नाट्यवाङ्मयाच्या बाबतीत सार्थ आहेत याचा अर्थ आपल्या परपरेबाहेरचे प्रवाह या आतरिक प्रवाहाला येऊन मिळालेले नाहीत किंवा मिळू नयेत असे नाहीत किंबहुना शारदेनतर १९२५ पर्यंत मराठी रगभूमीचा जो विस्तार व विकास झाला तो पूर्वीच्या नाटककारानी नवे प्रवाह आत्मसात् करण्याची जी शक्ति दाखविली त्यामुळेंच "

## व्यावसायिक रगभूमि

कोल्हटकरापासून माधवराव जोश्यापर्यंतच्या प्रमुख नाटककाराचीं वैशिष्ट्यें सागितल्यानतर श्री खाडेकरानी रगभूमीवरील चालू प्रयोग आणि प्रयत्न याचा निर्देश केला हौशी व व्यावसायिक याच्या परस्परपूरक स्थाना सबधी बोलताना ते म्हणाले, "नाटक ही केवळ कला नाही तो धदाहि आहे आज नाटकाचा धदा बसला त्यामुळें चागली नाटकहि जनतेपर्यंत पाचेनाशी झाली हौशी नटाना परगावी जाणे शक्य नसते, यासाठीच व्यावसायिक रगभूमि हवी 'धदेवाईक' या शब्दात वाईट काहीच नाही, त्याचप्रमाणे 'हौशी' या शब्दात कौतुकास्पद असं काही नाही '

जिला व्यावसायिक रगभूमि म्हणता यईल तिचा पुनर्जन्म कसा होईल हा १९४३ साली आपल्यासमोर 'आ' वासून उभा राहिलेला प्रश्न अजून तसाच उभा आहे गुरुमुख आणि प्रत्यक्ष अभ्यास याच्या अभावी नट आणि नाटककार याच्या परपरा तुटत चालल्या आहेत नवी रगभूमि निर्माण करण्याचं किंवा आजच्या रगभूमीला १९२५ पूर्वीचे वैभव प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य

हौशी रंगभूमीत नाही. हौशी नाट्यसंस्था नाट्यकलेची आवड टिकवूं शकतील, तिच्याविषयी आदर निर्माण होईल असे नवे नवे प्रयोग करु शकतील, पण रंगभूमीचें सर्वस्पर्शी अस्तित्व टिकविणे अशा संस्थाना स्वभावत च शक्य नाहीं. उत्कटता हा त्याच्या कार्याचा आत्मा आहे. विस्तार हा नाही ! त्या विस्तारासाठी व्यावसायिक रगभूमीच जिवंत राहिली पाहिजे !'

## चांगले आणि वाईट

१९४३ पासून पुनर्जन्म झालेल्या रगभूमीवर उदयाला आलेले चि. य. मराठे, पु. ल. देशपाडे, तेंडुलकर, कानेटकर याच्यासारखे नाटककार, नाट्यनिकेतन, ललितकलादर्श, साहित्यसघ, प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन, कलोपासक याच्यासारख्या व्यावसायिक व हौशी नाट्यसस्था, नाट्यविषयक वृत्तपत्रें व टीकावाङ्मय याचा आढावा घेऊन खाडेकरानी तथाकथित विनोदी नाटके, जुन्या नाटकाची ठेकेदारी प्रयोगात चालणारी विटबना, आणि आजचा बिघडलेला प्रेक्षक या विषयाचा विचार केला. रगभूमीवर लादलेला करमणुकीचा भयकर कर रद्द करण्याची आवश्यकता आणि प्रत्येक जिल्ह्यात सोयीस्कर नाट्यगृह उभारण्याची योजना या गोष्टीकडे सरकारने लक्ष दिले पाहिजे अशी त्यानी विनती केली.

## पुनरुत्थानासाठीं तपश्चर्या

रगभूमीच्या उत्कर्षासाठीं सर्वांनीच हातभार लावणे अगत्याचे आहे हे सागताना श्री. खाडेकर म्हणाले, " रंगभूमीच्या पुनरुत्थानाची चळवळ आपल्यालाच केली पाहिजे व ती पद्धतशीरपणे केली पाहिजे. जिल्ह्याजिल्ह्यानून परिषदेच्या शाखा असणे व एकतरी नाट्यगृह असणे यासाठी जनतेपुढें गेले पाहिजे. नाट्यपरिषदेच्या कार्यकर्त्यांबरोबर निधि गोळा करण्यासाठी जायला मी तयार आहे रगभूमि-दिन उगीच साजरे करण्यापेक्षा त्या दिवशी प्रतिज्ञेने कामें पार पाडली पाहिजेत. आपले भाग्य आपल्या मनगटात आहे ...तपश्चर्या हेंच महाराष्ट्राचे मोठें बळ आहे

## अस्सल प्रेरणा आणि जीवनमूल्यांवरील श्रद्धा

पाश्चात्यामधून नवे नवे प्रयोग अवश्य घ्यावेत; आपली कला त्यामुळें अक्षय्य प्रगतिपथावर राहील. पण प्रेरणा देशी असाव्यात त्या तिरडून

घेण्याची जरुरी नाही....कारण आपली मनोभूमिका बनली आहे ती उपनिषदें, रामायण, महाभारत यांनी; हरिभाऊ आणि शरच्चंद्र यांच्या वाङ्मयानें. ऐहिकता हा आपल्या जीवनाचा फक्त एक भाग आहे. पाश्चात्यांप्रमाणें आपण आत्मा हरवलेला नाही. ......

तंत्र, नेपथ्य, संगीत, अभिनय इत्यादि गोष्टींत अभिनव असे रूप रंगभूमीनें अवश्य घ्यावें; परंतु देवल–खाडिलकरांच्या रंगभूमीचा वारसा माझ्याकडे आहे या गोष्टीचा तिनें स्वतःला विसर पडू देऊं नये. कारण प्रत्येक राष्ट्रा-प्रमाणें प्रत्येक वाङ्मयाचीसुद्धां अस्मिता असते. ......

भोंवतालचें नवें वादळ फार मोठें आहे; निरनिराळ्या कारणांनी कांहीं जीवनमूल्यांचें संपूर्ण अवमूल्यन झालें आहे; कांहींचें होऊं पाहत आहे. जीवनाच्या इतर क्षेत्रांतली अगतिकता, विफलता आणि विमनस्कता नकळत कलाक्षेत्रांवरहि आपल्या काळ्या छाया पसरीत आहे. अशा वेळीं नव्या नटांना आणि नाटककारांना माझी एकच प्रार्थना आहे — 'तुमच्या कलेचा विविध आणि अनिरुद्ध आविष्कार होऊं द्या; तो आम्हांला हवा आहे! पण ती कला कुठल्या ना कुठल्या जीवनमूल्यावर, तुमच्या स्वत:च्या निश्चित श्रद्धांवर अधिष्ठित झालेली असूं दे!''

## संगीत ' निबंधवाचन '

संमेलनांत मा. कृष्णराव फुलंब्रीकर यानी ' मराठी रंगभूमि आणि संगीत ' या आपल्या निबंधाचें सप्रयोग वाचन केलें. मराठी रंगभूमीवरील प्रमुख नाटक-काराच्या नाट्यकृतीतून संगीताच्या विविध प्रवाहांचा कसकसा स्वीकार होत गेला याचें दर्शन घडविण्याचा प्रयत्न या निबंधांत करण्यांत आला होता. किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर, गडकरी यांच्या पदाची वैशिष्ट्यें सांगत असताना नाटकातील पद्यरचना, त्याच्या चाली व रंगभूमीवरील गायन यांसंबंधी मास्तरांनी आपले विचार व्यक्त केले. ते म्हणाले, "शब्दांचें महत्त्व संभाळून मर्यादित गावें पात्रानुसार पदाच्या चालीची ठेवण व तिच्या जोडीला रमाळ व साधीसुधी कविता असावी थोडक्यात म्हणूनहि ठसा उमटेल इतकी चाल रसपूर्ण असावी रंगभूमीवर शेजारच्या नटाला तिष्ठत ठेवून येथेच्छ गात बसू नये; पण त्याबरोबरच संगीत नाटकात उगीच कमी गाणें हेंहि उचित नाही. ज्याना संगीत नको असेल त्यांनी गद्य नाटकें लिहावी आणि

पाहावी नाटकानी मिनेमातल्या तीन मिनिटाच्या गाण्याचे अनुकरण करू नये" इ इ

रगभूमीचा ऱ्हास होण्यास सगीत कारणीभूत झालेले नसून चित्रपटामुळे रगभूमि मारली गेली असा आपला अभिप्राय मा कृष्णरावानी व्यक्त केला

निबधवाचनानतर प्रायश्चित्त म्हणून मास्तरानी निरनिराळ्या मराठी नाटकातील काही लोकप्रिय पदे गाऊन दाखविली

## मजूर झालेले ठराव

(१) वीर वामनराव जोशी, बडोपत साहोनी, विमूभाऊ भडकमकर इत्यादीच्या मृत्यूबद्दल दुखवटा व्यक्त करणारा ठराव मजूर करण्यात आला

(२) मराठी नाट्यसेवकाच्या अनेक अडचणींबद्दल मुबई सरकारला शिफारसी करणारा ठराव समेलनात मजूर करण्यात आला

(३) नाट्यशिक्षणाच्या शाखा, पुणे, मुबई, नागपूर व सकल्पित मराठवाडा या विद्यापीठानी निर्माण कराव्यात अशी त्याना विनती करण्यात आली

(४) महाराष्ट्र साहित्य परिषद, मुबई साहित्य सघ, विदर्भ साहित्य सघ व मराठवाडा साहित्य परिषद यानी नाट्यपरिषदेला मार्गदर्शन करून पाठिबा द्यावा अशी विनती करणारा ठराव श्री केशवराव दातयानी माडला व तो मजूर करण्यात आला साहित्य सस्थाचे सहकार्य मिळविण्यासाठी एका समितीची नियुक्ति करण्याचेहि ठरले

भूत असणाऱ्या रखवाल्याच्या मनोभूमिकेसंबंधीचा विचार मांडला ते म्हणाले, " विज्ञानाने दारिद्र्य गेल नाही अधश्रद्धा गेली पण त्याबरोबर श्रद्धाहि गेल्या यत्रान आपल्याला हजार हात दिले, पण हृदय काढून नल आज भव्य स्वप्न बघण्याचीसुद्धा आपली ताकद नाहीशी झाली आहे श्रद्धेच्या काळात केलेला उत्कटता यते जुन्या नाटककाराची मूल्ये निश्चित हाती ठाम श्रद्धेच्या अभावी आजच्या नाटकात महान् कलेऐवजी कारागिरी दिसू लागली आह आज साच्याची, नक्कलीच कुशलता दिसते मगल आणि अमगल याच्यातील सघर्ष आजहि चालू आहे या सघर्षाचा शवट काय हाच मानवी मनापुढला मुख्य प्रश्न आहे या प्रश्नाचे उत्तर विज्ञानात सापडणार नाही ते मानवी मनातल्या कण प्राय मागल्य भावनतच सापडल निष्ठा कायम आहेत, तोपर्यंत विजय निश्चित आह " समारोप करतानाच श्री खाडकरानी नाट्यपरिषदेचे आर्थिक बळ वाढाव यासाठी महाराष्ट्रभर दौरा काढून आपण स्वत व मा कृष्णराव यांच्या व्याख्यानाचे कार्यक्रम करणार असल्याचे जाहीर कल

## करमणूक

समेलनात अभिनव कलामदिरान 'करीन ती पूर्व' व सागलीच्या अखिल महाराष्ट्रीय नाट्यविद्यामदिरान 'उद्याचा ससार' हे दोन नाट्यप्रयोग करून दाखविले याशिवाय कन्याशाळेच्या विद्यार्थिनीच 'नटराज-नृत्य' व ए सी सी युनिटचे 'दीपनृत्य' असे दोन नृत्याचे कार्यक्रमहि सादर करण्यात आले समेलनाला जोडूनच एका भव्य नाट्योत्सवाच आयोजन करण्यात आल होत मानापमान, वेड्याच घर उन्हात, सशयकल्लोळ अशीच एक रात्र यते, इ नाट्यप्रयोग व श्री भीमसन जोशी याच गायन असा १० दिवसाच्या भरगच्च कार्यक्रमाचा सोहळा या वळी साजरा करण्यात आला

## परिषदेचे वर्षभरातील कार्य

(ता १ जाने १९५८ ते २९ डिस १९५८)

## आर्थिक दृष्ट्या अनुकूल वर्तमान

सापत्तिक दृष्टीन हे वर्ष नाट्य परिषदेला भरभराटीच गेल असे म्हणता येईल आळतकर-सत्कारप्रसगी सादर केलेले नाट्यप्रयोग नुकसानीच ठरल्या-

मुळें झालेली परिषदेची आर्थिक परवड नाहीशी करण्याचा कार्यकर्त्यांनी निकराचा प्रयत्न केला व तो यशस्वीहि ठरला

प्रथमत मुंबईला श्री बाबुराव पेंढारकराच्या संस्थेतर्फे 'सुभेदार' व मुंबई मराठी साहित्य संघातर्फे 'अमलदार' हे दोन नाट्यप्रयोग होऊन त्याचे उत्पन्न (सुमारें ३००० रु) परिषदेला देण्यात आले 'ललितकलादर्श'ने भावबंधनचा प्रयोग सादर केला त्या प्रयोगात परिषदविषयीच्या आस्थेमुळें श्री चिंतामणरावांनी 'धुंडिराजा'ची व श्री पु ल देशपांडे यांनी प्रभाकराची अशा भूमिका केल्या होत्या श्री गणपतराव बोडस, मीनाक्षी प्रभृति कलावंतांनी याच कामासाठी 'मृच्छकटिक' नाटक करून दाखविलें या दोन प्रयोगांचे उत्पन्न (सुमारें २००० रु) परिषदेला देण्यात आले

## करमणुकीच्या करातून रंगभूमीची मुक्तता

नाट्यव्यावसायिकांत 'जिझिया कर' म्हणून आळखला जाणारा नाट्यप्रयोगावरील 'करमणूक कर' रद्द केल्याची घोषणा याच महिन्यात करण्यात आली रंगभूमीच्या प्रगतीच्या मार्गातील ही अनेक वर्षांची धाड सरकारने दूर केल्यामुळें नाट्यप्रेमी रसिक व नाट्यव्यावसायिक यांच्या आनंदाला पारावार उरला नाही नाट्य परिषदेच्या वतीने या सत्कृत्याबद्दल मुंबई सरकारचे मन पूर्वक अभिनंदन करण्यात आले इतकेच नव्हे तर जनतेच्या आंदोलनाला मिळालेल्या यशाचा आनंद प्रकट करण्यासाठी आणि रंगभूमीच्या पुढील कार्याची वाटचाल करण्याच्या दृष्टीने विचार करण्यासाठी मुंबई येथें 'करमणूककर-मुक्तिदिन' साजरा करण्याचेंहि घोषित करण्यात आले

व प्रा वनहट्टी याची भाषण झाली श्री बाटवे यानी 'परिषदेला मराठी नाटच अकादमीची प्रतिष्ठा व्हावी अशी तिच्या कार्यकर्त्यांची महत्त्वाकाक्षा असल्याच' मागितले

याखेच पदाधिकारी म्हणून पुढील नमणुका झाल्या — अध्यक्ष — श्री व दा दसाई, उपाध्यक्ष — प्रा वनहट्टी, कापाध्यक्ष — श्री वि ना दीक्षित, कार्यवाह — श्री मो स साठे व व्ही डी पडित याशिवाय सभासदाचीहि निवड करण्यात आली

## कार्यकारी मडळाच्या सभा

या वर्षीत कायकारी मडळाच्या दान सभा झाल्या त्या वळी परिषदचे हिशबतपासनीस म्हणून श्री रा कृ दरापाड याची नियुक्ति करण्यात आली परिषदेच्या घटनत काही दुरुस्त्या करण्यात येऊन त्या सर्वसाधारण सभपुढे ठवण्यात याव्यात अस ठरविण्यात आल विषयनियामक समितीकडे पाठ-वावयाच्या ठरावाची पक्की यादी तयार करण्यात आली डा बरव यानी तयार केलेला नाटचसमेलनाचा इतिहास परिषदन शक्य तितक्या लवकर प्रकाशित करावा असाहि निणय घेण्यात आला

याच सुमारास श्री मा ग रागणकर यानी आपल्या 'भटाला दिली ओसरी' या नाटकात रगाटलेल्या काही थार व्यक्तीच्या विडवन चित्रासवधी एक छोटा वादळ निर्माण होऊन परिषदेच्या मुबई शाखन यामवधी निषधाचा एक ठरावहि मजूर कला होता. या बाबतीत श्री रागणकर याच्याबरोबर झालेला पत्रव्यवहार चिटणीसानी कायकारी मडळाच्या सभेत वाचून दाखविला या विषयाच्या अनुषगान आगामी समेलनात 'रगभूमीची मूल्ये व मराठी रगभूमि' या विषयावर एक परिसवाद ठवण्यात यावा असे निश्चित करण्यात आल

श्री. खांडेकर व मा. कृष्णराव यांचा सत्कार करण्यांत येऊन त्यांना मानपत्रे अर्पण करण्यांत आलीं. मानपत्राला उत्तर देतांना श्री. खांडेकर म्हणाले, "मराठी रंगभूमीची अवस्था सध्यां सैरंध्रीसारखी झालेली आहे. पूर्वीची नाटकाची परंपरा आज खंडित होत चालली आहे. तिला ऊर्जितावस्था येण्यासाठी करमाफीसारखे उपाय चालू आहेत. परंतु २०।२५ वर्षांपूर्वीची रंगभूमि आज अस्तंगत झाली आहे. आमच्या पिढीला श्री. बालगंधर्व, गणपतराव जोशी, गणपतराव बोडस वगैरे लोकोत्तर कलावंतांचें रंगभूमीवरील नाट्य पाहण्याचें भाग्य लाभलें; परंतु आधुनिक साहित्यिकांनी हें न पाहिल्यामुळें त्यांच्या नाट्यविषक लिखाणांत उणीव दिसून येते. ज्याना मराठी रंगभूमीचा अभ्यास करावयाचा असेल त्यांनी मागील काळांतल्या नाटककारांच्या कलाकृतींचा अभ्यास केला पाहिजे." यानंतर श्री. खांडेकरांनी नाटककार म्हणून कै. खाडिलकरांच्या थोरवीचें वर्णन केलें. त्याच्या भाषणानंतर मा. कृष्णरावांचें 'संगीत आणि मराठी रंगभूमि' या विषयावर सप्रयोग व्याख्यान झालें.



अध्यक्ष नानासाहेब फाटक

# ४१. हैदराबाद

## १९५८

*मराठी रंगभूमीवरील श्रेष्ठ गद्य नट स्वतःच्या भूमिकांच्या बाबतीतील आत्मनिरीक्षणात्मक लेख यांनी लिहिलेले आहेत. रंगभूमीच्या उत्कर्षाबद्दल हे सदैव झटत असतात.*

नाट्यसंमेलनाचे हें अधिवेशन हैदराबाद येथील महाराष्ट्र सभागृहात दि ३० व ३१ डिसेंबर १९५८ पासून १ जान १९५९ पर्यंत नटवर्य श्री नानासाहेब फाटक यांच्या अध्यक्षतेखाली साजरें झाले मराठी प्रदेशाबाहेरील नगरात भरणारें असे हे पहिलेच नाट्यसंमेलन सोलापूर व सातारा या संमेलनात रंगभूमिविषयक विविध हालचालींना जोराची चालना मिळाल्यामुळें आणि अध्यक्षस्थानी मराठी रंगभूमीवरील एका ज्येष्ठ अभिनत्याची निवड झाल्यामुळ संमेलनापूर्वीच संमेलन आणि परिषद यांच्याविषयी चर्चा सुरू झाली

## जाणत्यांच्या अपेक्षा

संमेलन भरण्याच्या सुमारास श्री केशवराव दाते व श्री चिंतामणराव कोल्हटकर या नाट्यतपस्व्यांनी परिषदेच्या भावी कार्याविषयी आपले काही विचार व्यक्त केले होते [1]

श्री दाते यांनी मराठी नाट्यनिर्मात्यामध्यें दिसून येणाऱ्या सामाजिक मूल्याविषयीच्या बेपर्वाईचा निर्देश करून मराठी नाट्यकलेला हीन पातळी

---

१ मौज दि २८ डिसेंबर १९५८

वर नणाऱ्या अशा प्रवृत्तीना आळा घालण आणि पूर्वीच तजस्वी रूप निरा आणून दण हच परिषदच जावितकार्य आह' अस आग्रहपूर्वक प्रतिपादन करून होत होन आणि दणाऱ्या अनुचित (क्वचित अश्लील) विनोदाचा नाश धरण्याची जी प्रवृत्ति मराठी नाट्यकारात वाढत्या प्रमाणावर दिसून येत होती त्याचा पायबंद बसण्यासाठी परिषदन नाट्यनिर्मात्याना एकत्र आणून नाट्यकलेचे पावित्र्य कायम राहण्यासाठी काही बंधन आपणहून पाळण्याचा आदश त्याना द्यावा अशा श्री दाते याना सूचना केली होती आणि असा आदश देण्याची पात्रता मिळविण्यासाठी परिषदन नाट्यसेवक प्रभृक विद्वान व समाजधुरीण याना एकत्र आणून आपलेहि सामर्थ्य वाढवले पाहिज असा कळकळीचा सल्ला श्री दाते याना दिल्ला होता

श्री कोल्हटकराच्या मत आजवर संमेलनकार्यात विद्वानाना व हौशी चळवळ्यानीच भाग घतल्यामुळे आणि कलावतानी जिव्हाळ्यान रस न घतल्यामुळ परिषदच पहिला वळण गल नाही आणि तिच्या हातून प्रत्यक्ष फारस काय घडे नाही यासाठी विद्वानाच सहकार्य घऊन व्यावसायिकाना संमेलनाच्या कार्याची धुरा आपल्या खाद्यावर घतली पाहिज नाट्यसंस्थाना वाजवी दरान भाडवल मिळण्यासाठी निधि निर्माण करण हलाखीतल्या नटाना किंवा त्याच्या कुटुंबीयाना आर्थिक मदत देण्यासाठी काही चिरस्थायी व्यवस्था करण सरकारी व बिनसरकारी नाट्यगृहाची पाहणी करून त्यासबधीचा तपशील गोळा करण वद नाट्यगृहाच्या योजनला चालना देणे इ कार्ये परिषदेच्या कार्यकर्त्यांनी हाती घ्यावीत असे श्री कोल्हटकरानी सुचविल होते

## आणि स्थानिकांची उपेक्षा

संमेलनापूर्वीच त्यासबधी मोठ्या अपेक्षा निर्माण झाल्या असल्या तरी प्रत्यक्ष संमेलनात त्यासबधी तेवढा उत्साह आढळला नाही संमेलनाच स्थळ महाराष्ट्रापासून बरच दूर असल्यान व्यावसायिक व हौशी कलावत फार अल्पसंख्येन उपस्थित होते संमेलनाला जोडून योजिलेल्या नाट्योत्सवाला गर्दी करणाऱ्या हैदराबादच्या रसिकानी संमेलनाच्या इतर कार्यक्रमाकड काहीस दुर्लक्षच केल

दि. ३० डिसेंबरला सायंकाळी स्वागतगीतानें संमेलनाला प्रारंभ झाला. संमेलनाचें उद्घाटन पं. सातवळेकर यांनी केलें. स्वागताध्यक्ष श्री. वासुदेवराव नाईक यांनीं हैदराबादच्या नाट्यपरंपरेचा इतिहास सांगून नाट्याच्या सामर्थ्याविषयी आपले विचार मांडले. ते म्हणाले, "ज्याला नाटकातील सुभग सौंदर्याचा साक्षात्कार होतो, जो भाषा आणि अभिनयसाधनांच्या द्वारें तो व्यक्त करतो आणि जो प्रेक्षकांत त्याच सौंदर्यानुभूतीचा सहानुभाव निर्माण करतो तोच ज्येष्ठ नाटककार, प्रथम श्रेणीचा नट व उच्च दिग्दर्शक होय. भावना-संचलन, भावना-क्षोभ व भावना-उपशम या असाधारण, सूक्ष्म पण बलशाली क्रिया घडविण्याचें, त्याच्यावर संस्कार करण्याचें सामर्थ्य नाट्यकलेंत आहे." अध्यक्षीय सूचना झाल्यानंतर तिला दुजोरा देणारी श्री. बाबुराव पेंढारकर, श्री. श. वा. किर्लोस्कर, श्री. चंद्रवदन मेहता, श्री. गोमकाळे, श्री. नरसिंगराज, श्री. चतुर्वेदी इत्यादींची भाषणें झाली' हा कार्यक्रम प्रमाणाबाहेर लांबून त्याला 'नानासाहेब फाटक-सत्कारसमारंभा'चें स्वरूप प्राप्त झालें. त्यानंतर अध्यक्ष स्थानापन्न होऊन त्यांना हारतुरे अर्पण करण्यांत आले.

परिषदेचे चिटणीस श्री. गो. म. वाटवे यांनी थोडक्यात वार्षिक अहवालातील महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख केल्यावर रात्रौ ८।। च्या सुमारास अध्यक्ष श्री. नानासाहेब फाटक अध्यक्षीय भाषण वाचण्यास उभे राहिले. अर्धेअधिक भाषण वाचून झाल्यानंतर समोरचे बहुसंख्य श्रोते फार उशीर झाल्यानें उठून जात असल्याचें त्यांच्या लक्षांत आलें तेव्हां रंगात आलेलें भाषण अध्यक्षांनी तेथेंच संपविलें. त्यांच्या भाषणातील प्रमुख मुद्दे असे —

## महाराष्ट्र नाटक मंडळीनें केलेली क्रांति

नाटके या मंडळीला मिळून तिला स्थैर्य प्राप्त यांनी त्याशिवाय वासुदेवशास्त्री खरे श प जोशी रा ग गडकरी यांची नाटके मंडळीच्या 'Not failure but low aim is crime' या ध्येयवाक्यानुसार अशीच होती व त्यांचे प्रयोग अत्यंत अभ्यासूपणाने बांधेसूद स्वरूपात रंगभूमीवर होत असत खाडिलकर, प्रा भाट प्रा मानू प्रा पटवर्धन इ विद्वानांच्या शिक्षणामुळें व शिस्तीमुळें नटांची समाजातील वागणूक फार सभ्य असून आज समाजात नटांना जें मानाचे स्थान प्राप्त झाले आहे त्याचे बीज या मंडळीच्या शिस्तीत होतें असे म्हणावे लागेल

आज प्रेक्षक गर्दी करून जात आहेत, समजून उमजून जात आहेत 'अशा प्रयोगाला जाऊ नये व जाण्याची चूक झालीच तर प्रेक्षकानी आपले पैसे परत मागावेत' हे म्हणणे अगदी बरोबर आहे असे वाटते

प्रेक्षकामध्ये उच्च रुचीचा अभाव दिसतो याला कारण पुष्कळशा अज्ञाने नटाचा अभिनय हेंहि आहे विदूषकी अभिनयाने व विकृत उच्चाराने एखाद्या वाक्याला टाळी मिळाली की तीच पुनरावृत्ति करण्याचा मोह नटाला होतो आमच्या वेळी असे नव्हते मालकाच्या व तालीममास्तराच्या हुकमतीखाली असलेल्या नटाला भलताच अभिनय केला तर शिक्षा होऊन जरब बसत असे. आम्ही सर्व नट एक प्रकारें प्रेक्षकाना भिऊन राहत होतो आणि प्रेक्षकहि चोखंदळ होते

## नवनाट्य

कै खाडिलकर, कै गडकरी, श्री वरेरकर याच्या कालात जुनी नाटकें मानवी समाजातील ठोकळ घटनावर व मानवी स्वभावातील स्वाभाविक भावनावर रगविलेली असत, आणि म्हणून ती सर्वसाधारण प्रेक्षकाच्या आकलनशक्तीत सहज येत असत आज नवनाट्य म्हणून जी नाटके लिहिली जात आहेत त्यातील प्रसग एका विवक्षित कुटुबात अगर समाजव्यवस्थेत, वेळोवेळी उत्पन्न होणाऱ्या समस्यावर आधारलेले असल्याने समाजातील ठराविक विशिष्ट वर्गालाच त्यातील मर्म समजत

वस्तुत नाट्यात व अभिनयांत नवीन असे काही नाही फक्त बाहेरील कपडे व रग ही बदललेली आहेत दोघाच्यामधें दिसणारा फरक भूमिकाच्या आविष्कारात कदाचित् दिसत असल, पण ता गौण स्वरूपाचा आहे

## अभिनय आणि तादात्म्य

आपली आवडती भूमिका भरलेल्या रगमदिरात मनापासून वठवीत असता नट एक प्रकारच्या समाधीत ( trance ) मध्यें जाऊन मिनिट अर्ध-मिनिट स्वतःला विसरून जाऊ शकतो, पण ते क्षणमानच असते सर्व तत्र व मत्र साभाळून आपण भूमिका करीत आहोत याची जाणीव त्याला झाली नाही तर पुढील कार्य त्याच्याकडून कसे पार पडेल? तेव्हा भूमिका करताना

नट अत्यंत अल्पांशाने का होईना, जागृत ( conscious ) असतोच आणि असला पाहिजे असं मला वाटते

## नट कसा तयार होतो ?

नटाने शिक्षकाच्या सांगण्यातील मर्म व अर्थ पूर्णपणे ध्यानात घेऊन आपल्या शरिराला व आवाजाला वसेल अशाच रीतीने आपले काम केले पाहिजे नाहीतर त्याचे व्यक्तिमत्व नाहीसं होऊन तो एक नक्त्या ठरेल . एका ठराविक मर्यादेपर्यंत नट तयार होऊ शकेल, पण तो दुय्यम दर्जाचा होईल, अभिजातपणा अंगात मुरायला वुद्धिमत्ता, भावनाची पूर्ण *आळख आणि श्रम याची आवश्यक्ता आहेच*

## छादिष्ट धंदेवाईकच हवेत !

ज्याच्या जीवनाचा आधार व जीवनातला आनंद नाट्यकला आहे, असे आपले सर्वस्व नाट्यकलेकरिता अर्पण करणारे छादिष्ट धंदेवाईक नटच या कलेत काहीतरी प्रगति करू शकतील धंदेवाईक नाटक मंडळ्या निघाल्या तरच आपल्याला नाट्यकलेच शिक्षण, पोषण व प्रगति करता येईल यांच्या-करिता नवीन नाटके व नवीन कलावार निर्माण करणे हे धंदेवाल्यांना केलेच पाहिजे, नाहीतर त्यांचे जीवनच नपुष्टात येईल होशी नटाच्या नस्था धंदेवाल्याना पोषक अशाच होतील प्रेक्षकाकडून निश्चित आश्रय मिळेल यांची काळजी करण्याचं काही कारण नाही मराठी जनता इतकी नाट्य-लालुप आहे की आजवर सर्व नाटक मंडळ्या जनतेच्या आश्रयानेच निर्माण झाल्या व भरभराटीस आल्या "

गट ठरवून त्याना एवच जुने अगर नवीन नाटय रगभूमीवर आणण्याम भाग पाडावे, त्याचप्रमाणे सर्व सोयीनी युक्त अशी रगमदिरें स्वस्त भाडयात उपलब्ध करून द्यावीत, विपन्नावस्थेंतील नटाना मदत करण्यासाठी एखादा फड काढावा आणि या सर्व गोष्टी पार पाडण्यासाठी मराठी नाटयपरिषदेला आर्थिक साहाय्य द्यावे अशा अनेक सूचनाचा समावेश होता

शेवटी, करमणूक-कर रद्द केल्याबद्दल व वेळची सवलत दिल्याबद्दल मुख्य मन्त्र्याना धन्यवाद देऊन 'मिळते आहे तें पदरात पाडून घ्या व पाहिजे आहे त्याबद्दल सतत मागणी चालू ठवा' या टिळकवचनाचा आदर्श पुढे ठेवण्याची विनती करून श्री फाटक यानी आपले भाषण सपविले

## मर्यादा सोडणाऱ्या लेखकांवर अंकुश

विषयनियामक समितीच्या बैठकीत खुल्या अधिवेशनात माडल्या जाणाऱ्या ठरावावर चर्चा झाली त्यापैकी नाटककाराना वळण लावू इच्छिणाऱ्या ठरावावरील चर्चा चागलीच रगली अशा नाटककारावर काही बधन हव असे मत श्री बाबुराव पेंढारकरानी व्यक्त केले असे काही बधन असाव की नसावे, हे बधन कसे घालायचे, कोणी घालायचे, परिषदेन ठराव कोणत्या भाषेत करावयाचा, असे अनेक प्रश्न निर्माण झाले या साऱ्या टीकेचे लक्ष्य श्री रागणेकराचें 'भटाला दिली ओसरी' हे नाटक होते शेवटी सौम्य भाषेत ठराव माडावा असा निर्णय घेण्यात आला

## परिसवाद

गुजरायचे विख्यात साहित्यिक व नाटयसमीक्षक श्री चद्रवदन मेहता याच्या अध्यक्षतेखाली 'रगभूमीची मूल्यें व मराठी रगभूमि' या विषयावरील परिसवादाचे आयोजन करण्यात आले होत परिसवादाला प्रारभ करताना श्री मेहता म्हणाले, 'अलीकडे नाटकातील शब्द अस्खलितपणे उच्चारले जात नाहीत त्यामुळें वाणीचे वैभव आणि सौष्ठव नाहीसें होत चालल आहे याला कारण म्हणजे शाळातून पाठातराच्या पद्धतीचे उच्चाटन झाल आहे आजच्या नटाकडून पाठातराच्या मूलतत्त्वाची पायमल्ली होत आहे पुढें श्री मेहता यानी आदर्श नाटयगृहाची आपली कल्पना सागितली तसेंच आदर्श प्रक्षकाला असणारे गुण कोणते ते भरताच्या नाटयशास्त्रानुसार स्पष्ट केले

पुण्याचे श्री प्रभाकर गुप्ते यानी या आदर्श नाट्यगृहात नाटक कसे असावे हे सांगितले ते म्हणाले, "प्रत्येक कलायतनाने आपली सामाजिक जबाबदारी ओळखली पाहिजे ही जबाबदारी मान्य करूनच नाट्यनिर्मिति केली पाहिजे प्रेक्षकाच्या भावना फुलविण्याचे, चेतविण्याचे, सुखदुःख अत - करणात खोल रुजविण्याचे कार्य नाटककाराने केले पाहिजे हे सर्व करीत spiritual beauty कडे आल्याचे ऐक्य साधले पाहिजे" रगभूषा आणि वेषभूषा यासबधी बोलताना सौ सुलोचना लिमये म्हणाल्या, "वातावरण निर्मितीसाठी, प्रथमदर्शनी छाप पाडण्यासाठी आणि व्यक्तिमत्त्व उजळून दाखविण्यासाठी रगरगोटी आणि वेषभूषा अत्यत आवश्यक आहेत त्याविषयी जे सकेत ठरलेले आहेत त्याचे ज्ञान मिळवून देश, काल आणि पात्र यानुरूप रगभूषा व वेषभूषा केली जावी आणि अभिनय हीच गोष्ट सर्वांत महत्त्वाची आहे हें लक्षात ठवावे"

श्री द रा गोमकाळे नवनाट्यासबधी बोलताना म्हणाले, "इब्सनच्या तत्रानुसार नवीन नाटके निर्माण होत आहेत किंवा नाहीत हे नवीन नाटककारानी तपासून पाहावे आजच्या नवनाट्यात जीवनाची गाढ अनुभूति नाही, केवळ अधानुकरण आहे इब्सेनच्या नाटकातील आत्म्याकडे — त्यातील नाट्याकडे — दुर्लक्ष करून त्याने निर्माण केलेल्या तत्राचाच नुसता बडेजाव माजविणे हे हिताचे ठरणार नाही" श्री ह रा महाजनी यानी नाट्य सगीताविषयी आपले विचार सागितले

## संमेलनातील ठराव

प्रारंभी नागेश जोशी, नाना जोग, व्ही डी पंडित, दत्तोपंत भोसले, नलिनी वर्दे इ नाट्यसेवकांच्या निधनाबद्दल दुखवटा व्यक्त करण्यात आला

विषयनियामक समितीमध्ये खडाजंगीचा विषय झालेला ठरावच विशेष गाजला 'मराठी रंगभूमीच्या उज्ज्वल परंपरेला बाध येईल अशी नाटके नाटककारांनी लिहू नयेत व निर्मात्यांनी ती रंगभूमीवर आणू नयेत,' असा हा ठराव होता याची भाषा अगदी सौम्य असली तरी त्यावरहि बरीच गरम चर्चा झाली

दुसऱ्या ठरावाने प्रयोगक्षम नाट्यवाङ्मयाची सूचि करणे, नाट्यसंमेलनाच्या इतिहासाचे प्रकाशन करणे व रंगभूमीच्या प्रगतीचा आढावा घेणारें एक 'वार्षिक' काढणं इ संकल्प सोडण्यात आले

इतर ठराव नेहमीचेच होते संयुक्त महाराष्ट्र व सीमा भागावाबतचा ठराव उत्साहाने मंजूर झाला त्याशिवाय अधिवेशनाला येणाऱ्या प्रतिनिधींना रेल्वेने सवलत द्यावी, मुंबई राज्यातील विद्यापीठातून नाट्यशिक्षणाचा अभ्यासक्रम सुरू करावा, नाटककाराला प्रत्येक प्रयोगामागें त्याचे मानधन न चुकता देण्यात यावे, सरकारने प्रमुख शहरी बंदिस्त नाट्यगृहें बांधावीत, अन्य राज्यातील मराठी भाषिकांचे सांस्कृतिक हक्क संरक्षिले जावेत इ ठराव संमत करण्यात आले

करमणुकीचा कर रद्द केल्याबद्दल मुंबई सरकारचे अभिनंदन करण्यात आले

पुढील अधिवेशनासाठी बडोदा येथील आमंत्रण स्वीकारण्यात आल्याचे प्रकट करण्यात आले

## नवीन कार्यकारी मंडळ

संमेलनात परिषदेची सर्वसाधारण सभा भरून तीत मागील वर्षाचे इतिवृत्त व जमाखर्च मंजूर करण्यात आला परिषदेच्या घटनेत थोडी दुरुस्ती होऊन उपाध्यक्षांची संख्या ३ एवजी ५ असावी व कार्योपाध्यक्षाच्या जागेविषयीचे कलम नमूद करण्यावे राहिले होते ते घालण्यात यावे असे ठरले

पुढील तीन वर्षांच्या कार्यकारी मंडळासाठी १५ नावांना मंजुरी देण्यात आली ती नावे अशी—

| | |
|---|---|
| १ प्रा अनत काणेकर (मुंबई) | ८ श्री रामभाऊ जोशी (वडार्ं) |
| २ श्री आत्माराम भेंडे ( " ) | ९ " वि ना दीक्षित ( पुणे ) |
| ३ " भालचद्र पेंढारकर ( " ) | १० " ग ना आवकर (नादड) |
| ४ " बापुराव पेंढारकर ( " ) | ११ " लि भी नाईक (वेंढगाव) |
| ५ " नानासाहेब फाटक ( " ) | १२ डॉ न आ वरव (अमळनेर) |
| ६ " वा य गाडगीळ ( " ) | १३ सौ सुशीलाबाई फाटक ( " ) |
| ७ " द रा गामवाळे (अकोला) | १४ प्रा रा व माढेकर (हैदराबाद) |

व १५ श्री गो म वाटवे (पुणे)

## गायनाभिनयाची प्रात्यक्षिकें

संमेलनातील दोन मनोरजनाचे कार्यक्रम मोठ संस्मरणीय झाले पहिल्या कार्यक्रमात श्री ह रा महाजनींनी 'मराठी नाटकातील संगीत' या विषयावर सोदाहरण व्याख्यान दिल प्रात्यक्षिकामाठी स्थानिक कला वताना सायीला घेतले होत कै अण्णासाहेब किर्लोस्करांच्यापासून नाट्य संगीतात जे जे फेरबदल झाले त्याच विवेचन करताना 'नाट्यसंगीत ह रसपरिपोष करणारें असले पाहिजे, नाटकातून त्याल गायकीचा धुमाकूळ माजल्याने रंगभूमीचा अपकर्ष झाला' असा आपला अभिप्राय श्री महाजनी

## मराठी रंगभूमीला आंध्र-गंधर्वांचा मुजरा

हैदराबाद संमेलनात न झालेला परंतु संमेलनाच्या निमित्ताने झालेला एक अविस्मरणीय समारंभ म्हणजे आंध्र प्रदेश संगीत-नाटक ॲकॅडेमीने केलेला संमेलनाध्यक्षांचा व इतर प्रतिनिधींचा सत्कार हा होय. आंध्रचे बालगंधर्व पद्मश्री स्थानम् नरसिंहराव यांनी या प्रतिनिधींचे स्वागत करून मराठी रंगभूमीविषयी आपली कृतज्ञता व्यक्त केली. ते म्हणाले, "आंध्रातील लोकांना नाट्यकलेसंबंधी काहीहि ज्ञान नव्हते. पडदा वर कसा जातो हेहि माहीत नव्हते. या प्रदेशात मराठी नाटक मंडळी बैलगाड्यांतून सामान घेऊन प्रथम आली. आंध्र लोकांनी त्यांना प्रेमाने वागविले आणि त्यांच्या-कडून नाट्यकला शिकून घेतली. मराठी रंगभूमीच्या अनुकरणाने आंध्र रंगयंत्राची प्रगति झाली. याबद्दल आम्ही कृतज्ञता व्यक्त करतो." श्री नानासाहेब फाटक सत्काराला उत्तर देताना म्हणाले, "कलावंताचे हृदय कलावंताला पाहिल्यावर उचंबळून येते, मग तो कोणत्याहि प्रांताचा असो. आंध्र कलावंतांनी केलेला गौरव माझा नसून मराठी रंगभूमीच्या उज्ज्वल परंपरेचा आहे असे मी समजतो."

---

(मागील पानावरून चालू)

१०-१९, तरुण भारत (९-१-५९) ३ वृत्तपत्रांत तीव्र नापसंतीचे सूर उमटले. स्थानिक संस्थांच्या स्पर्धेमुळे झालेली प्रतिनिधींची व मुद्द अध्यक्षांची आबाळ, प्रमुख नाट्यसेवकांची अनुपस्थिति, परिसंवादाची परवड, निव्हाळ्याच्या प्रश्नांची उपेक्षा, अशा अनेक कारणांमुळे हें संमेलन टीकाकारांच्या रोषाला पात्र ठरलें. तथापि या संमेलनात नव्यानेंच निवडलेल्या कार्यकारिणीनें पुढील वर्षांत करावयाच्या कार्यक्रमासंबंधीं जी सुस्पष्ट आखणी केली, त्यामुळें या मराठी परिषदेच्या भावी कार्यासंबंधीं मोठ्या अपेक्षा निर्माण झाल्या.

परिषदेसंबंधीं महाराष्ट्रांत सर्वत्र जें कुतूहल आणि आस्था निर्माण होऊं लागली होती त्याचा प्रत्यय मुंबइच्या 'Times of India' या अग्रगण्य इंग्रजी वृत्तपत्रांतील अग्रलेखा-वरून येऊं शकतो. परिषदेचें कार्य हें आतां सर्वांच्या चर्चेचा विषय होऊं लागलें याचें द्योतक म्हणूनच या लेखाचा उल्लेख करावा लागेल. सरकारी स्पर्धा व करमणूक कराची माफी याचा उल्लेख केल्यानंतर पुढें श्री नानासाहेब फाटक यांच्या विचारांना पाठिंबा देतांना 'टाइम्स नें पुढील उद्गार काढले —"But something very much more is required including some initiative in setting up a larger number of

(पुढील पानावर चालू)

## नाट्य परिषदेचें वर्षभरातील कामकाज

(दि १ जाने १९५९ ते २६ फेब्रु १९६०)

## कार्यकारी मंडळातील नेमणुका

या काळात कार्यकारी मंडळीच्या मुंबई येथें एक व सोलापूर येथें एक अशा बैठकी झाल्या हैदराबाद संमेलनात ठरल्याप्रमाणें कार्यकारी मंडळाची निवड झाली मुंबईच्या बैठकीत श्री ग ना आवेकर यांची कार्योपाध्यक्ष म्हणून निवड झाली उपाध्यक्षाच्या ५ जागावर पुढील सदस्यांची निवड झाली–(१) प्रा अनंत काणेकर, (२) प्रा अ म जोशी, (ग्वाल्हेर) (३) श्री चंद्रवदन मेहता, (४) डॉ भा गो रानडे व (५) सौ सुमतीबाई धनवटे कार्याध्यक्ष

(मागील पानावरून चालू)

theatres throughout the country inevitably with the co-operation of the Goverment and local bodies Other major problems obviously lie beyond the competence of the Government and about these Mr Phatak himself a veteran actor, had some very pertinent things to say in his presidential speech at the 41st session of the Marathi Drama Conference at Hyderabad Many new plays are being written, quite a number of them published and produced and n*w techniques *are b*ing evolved, but as Mr Phatak rightly deplores, few* of them have been successful in terms of public response There is a deep rooted conservative preference for the old and familiar plays and correspondingly little sympathy for bold experimentation in which occasionly standards are not what they should be. Another relevant point is that while amateurs have their contribution to make standards in the theatre can be defined and maintained only by scrupulously professional and whole time devotion to stage-craft Much remains to be accomplished but by relieving the theatre of the burden of entertainment duty something has been done to encourage the formation of professional companies The Marathi and Gujarathi stage at least can look forward to a bright new future "

(*Times of India* 2nd Jan 1959)

म्हणून श्री लि भी नाईक यांची व चिटणीस म्हणून श्री गो म वाटवे, श्री भालचद्र पेंढारकर आणि श्री वा य गाडगीळ अशा तिघांची नियुक्ति झाली (श्री गाडगीळ यांनी महिन्याभरातच आपल्या जागेचे त्यागपत्र दिल्यामुळे त्यांची जागा रिकामीच ठेवण्यात आली ) कोषाध्यक्ष म्हणून सोला-पूरच डॉ दि ज दिवाडकर हे निवडून आले

सोलापूर येथे भरलेल्या बैठकीत सरकारी वार्षिक नाट्यस्पर्धा व परिषद यांचे सबध काय व कसे असावेत या विषयावर बरीच चर्चा झाली स्पर्धा व बद नाट्यगृहे यासबधी एक तपशीलवार निवेदन तयार करून त समाज-कल्याण-खात्याचे मत्री श्री तिरपुडे याना सादर करावे अस ठरविण्यात आले

## खाडिलकर निबध-स्पर्धा

परिषदेच्या वतीने या वर्षी ' खाडिलकराचे नाट्यगुण ' या विषयावर एक निबध-स्पर्धा घेण्यात आली या स्पर्धेत अखिल महाराष्ट्रातील सुमारे १०० अभ्यासकानी भाग घेतला स्पर्धेचा निर्णय पुढीलप्रमाणे प्रकट करण्यात आला—

(१) श्री रु पा पाजणकर — १ ले बक्षिस रु १००

(२) श्री मु श्री कानडे — २ रे बक्षिस रु ५०

(३) श्री प्रभाकर बेंद्र व श्री सुधाकर अनवलीकर याना उत्तेजनार्थ बक्षिस देण्यात आले

## परिषदेच्या शिष्टमडळाला ना तिरपुडे यांची आश्वासने

दि ८ सप्टेंबरला श्री नानासाहेब फाटक, प्रा काणेकर, श्री वाटवे श्री भालचद्र पेंढारकर, श्री डेंभे व श्री अधटकर या परिषदेच्या शिष्ट-मडळाने मुबई राज्याचे मत्री श्री नासिकराव तिरपुडे यांची भट घेऊन सरकारी नाट्यस्पर्धा व गावोगावची नाट्यगृहे या सबधीच्या आपल्या मागण्या सादर केल्या

या स्पर्धा परिषदेच्या वतीने घेतल्या जाव्यात या मागणीला मत्रीमहा शयानी तत्त्वत पाठिंबा दिला, परतु सरकारी स्पर्धा समितीच्या मते अजून काही काळपर्यंत या स्पर्धा सरकारनेच भरवाव्यात असे मत त्यानी प्रकट केल चर्चेनतर स्पर्धेची पहिली फेरी (प्राथमिक स्पर्धा) परिषदेने घ्यावी असे ठरविण्यात आले

वद नाटयगृहानिर्बधीच्या मागणीबद्दल बोलताना, सरकार काही मोठ्या शहरातून बंगी नाटयगृहें बांधण्याची योजना आखीत असल्याचे ना तिरपुडे यांनीं सांगितले इतर गावातील नगरपालिकाना अगर अन्य संस्थाना या कार्यासाठी अल्प व्याजाने कर्ज देण्याचीहि योजना सरकारच्या वतीने लवकरच प्रसिद्ध होणार असल्याचेहि त्यानी सांगितले

याशिवाय परिषदेने सहकारी तत्त्वावर एखादी संस्था स्थापून तिच्यामार्फत नाटयसंस्थाना नेपथ्यविषयक साहित्य अल्प भाड्यात देण्याची योजना आखल्यास सरकारतर्फे आवश्यक ते साहाय्य देण्यात येईल असे आश्वासन ना तिरपुडे यानी दिले

## खाडिलकर स्मृतिदिन व रंगभूमि दिन

या वर्षी परिषदेच्या वतीने नाटयाचार्य खाडिलकर याच्या स्मृतिदिनानिमित्त दि २६ ऑगस्टला सागली येथे श्री वि.स खांडेकर याच्या अध्यक्षतेखाली एक विशेष समारंभ साजरा झाला या प्रसंगी श्री खांडेकरानी खाडिलकराच्या नाटकातील वैशिष्टयाचा परिचय करून दिला त्याचप्रमाणे मा कृष्णराव फुलंब्रीकर यानीं मराठी रंगभूमीवरील संगीताचा आढावा घेऊन काही *लोकप्रिय पदें गाऊन दाखविली*

श्री नानासाहेब फाटक यानी पुणे येथील 'नव्या थिएटर्स चे कलावार श्रीमती शांता मोडक व राजाभाऊ नामजोशी याच्या सहकार्याने खाडिलकराच्या 'भाऊबंदकी' या नाटकातील काहीं प्रवेश करुन दाखविले

मागील वर्षाप्रमाणेच रंगभूमि-दिनाचा कार्यक्रम दि ५ नोव्हेंबरला सागली येथे श्री प्रभाकरपत विर्लीकर याच्या अध्यक्षतेखाली झाला या प्रसंगी *सागलीच्या कलावतानी 'रंगाची वेडी' या नाटकाचा प्रयोग सादर केला*

नाट्यसंमेलनांचा इतिहास आणि श्री. पाजणकर यांचा 'खाडिलकर-निबंध स्पर्धेत' प्रथम क्रमांक मिळविलेला निबंध यांच्या प्रकाशनासाठी आर्थिक तरतूद करण्यासंबंधी कांही नाट्यप्रयोग करावेत असें ठरवून यासाठी श्री. नानासाहेब फाटक, श्री. भेंडे, प्रा. काणेकर व श्री. राम पटवर्धन (निमंत्रक) यांची एक समिति नियुक्त करण्यांत आली.

या योजनेप्रमाणें इंडियन नॅशनल थिएटरच्या वतीनें 'साक्षीदार', ललित-कलादर्शतर्फे 'दुरिताचे तिमिर जावो' व मुंबई मराठी साहित्यसंघातर्फे 'तुझें आहे तुजपाशी' असे तीन नाट्यप्रयोग सादर करण्यात येऊन त्यांचें उत्पन्न रु. दोन हजार नाट्यपरिषदेच्या स्वाधीन करण्यांत आलें.

नाट्य-शिक्षणासाठी कांहीं 'शिबिरें' घेण्यात यावीत व त्यांची योजना मध्यवर्ती मंडळानें आंखावी यासंबंधी चर्चा होऊन या शैक्षणिक योजनेचा तपशीलवार विचार करून तिची कार्यवाही करण्यासाठी एक 'नाटक ॲकॅडेमी' शक्य तितक्या लवकर सुरू करावी असा निष्कर्ष काढण्यात आला.

या सभेंत आगामी बडोदें अधिवेशनात येणाऱ्या ठरावांवर चर्चा होऊन ते ठराव विषयनियामक समितीकडे पाठवावे असा निर्णय घेण्यांत आला.

---



अध्यक्ष : व. शां. देसाई

# ४२. वडोदे

## १९६०

*कुशल न्यायाधीश व वकील. मराठी रंगभूमीचे रसिक पण निर्भीड टीकाकार व लेखक.*

नाट्यसमेलनाचें हें अधिवेशन दि. २६ ते २८ फेब्रुवारी १९६० रोजी श्री. वसंत शातराम देसाई यांच्या अध्यक्षतेखाली वडोदें येथील म. गांधी नाट्यगृहांत साजरें झालें. संमेलनाचे निमंत्रण वडोदा ॲमॅच्युअर्स ड्रॅमॅटिक क्लबनें दिलें होते. हैदराबाद समेलनांतील अनास्था आणि कार्यक्रमांतील गोंधळ याची पुनरावृत्ति होऊं नये याची क्लबच्या कार्यकर्त्यांनीं काळजीपूर्वक दक्षता घेतली होती आणि त्याच्या परिश्रमामुळें समेलनातील सर्व कार्यक्रमांची योजना अत्यंत सुव्यवस्थितपणें पार पडली.

समेलनाच्या व्यासपीठावर मराठी रंगभूमीचे जनक विष्णुदास भावे, नाट्यसमेलनाचे जनक अनंत वामन बरवे आणि नाट्यकलेला वाहिलेल्या पहिल्या नियतकालिकाचे संपादक, वडोद्याचे शंकर मोरो रानडे यांची छायाचित्रें लावली होती.

विविध संस्थातर्फे अध्यक्षाचा सत्कार करण्यात आल्यावर संदेशवाचन व चिटणीस श्री. वाटवे यांचे अहवालवाचन हे कार्यक्रम झाले

अध्यक्षांनी आपल्या भाषणाच्या प्रारंभी, मराठी रंगभूमि आणि बडोदें शहर यांचा पूर्वापार ऋणानुबंध ज्यांच्या कलाप्रेमामुळें व कलागुणामुळें अविस्मरणीय ठरला त्या श्रीमंत सयाजीराव महाराज, भाऊराव कोल्हटकर, भास्करबुवा बखले, हिराबाई बडोदेकर इ बडोद्याच्या आणि त्यांच्या परिसरातील व्यक्तींचा गौरवपर उल्लेख केला. १९४३ नंतर आस्तेआस्ते पण निश्चितपणे सचेतन होऊ लागलेल्या मराठी रंगभूमीच्या नव्या अवतारासंबंधीं श्री देसाई म्हणाले —

## नाट्योत्सवाचें कार्य

"बोलपटाच्या यांत्रिक करमणुकीतली नवी नवलाई नपून रंगभूमीवरील जिवंत करमणुकीकडे बहुजनसमाज पुन: आकर्षिला गेला हे या बदलाचें पहिले महत्त्वाचे कारण समजले पाहिजे नाटक आणि बोलपट यांच्यातील फरक आमच्या दिग्दर्शकांना समजून, रंगभूमीवर चित्रभूमीची नुसती नक्कल करण्याचा नाद ते जितक्या लवकर सोडून देतील तितक्या लवकर मराठी रंगभूमीला उत्कर्षाचे पुढील टप्पे गाठता येतील ..१९४३ मधील सांगलीच्या व १९४४ मधील डॉ भालेरावांच्या नेतृत्वाखालील मुंबईच्या टोलेजंग स्वरूपातील नाट्योत्सवामुळें मराठी रंगभूमीवरील नटांच्या मनात नवा आत्मविश्वास आणि नवी धमक निर्माण झाली

आपल्या भूमिका वठवाव्या, आणि अशा भूमिका वठवलेल्या नटनंचाशींच ठेकेदारांनी करार करावे, प्रत्येक नाटकासाठीं दिग्दर्शकाची योजना करावी अशीं *काही पथ्यें आतां तरी उभयपक्षीं पाळतां येण्यासारखीं आहेत...*ठेकेदारी पद्धतीच्या नाटकांत शिस्त आणि संघवृत्ति ही नसली तरी नाट्यसंस्थांच्या अभावी ज्या वेळीं आमचे नट किंकर्तव्यमूढ झाले होते, त्या वेळी त्यांना एकत्र आणून नाटकें करण्याच्या ठेकेदारी उपक्रमामुळें व्यावसायिक रंगभूमि जिवंत राहिली ही वस्तुस्थिति मान्य केलीच पाहिजे.

प्रेक्षकाना आनद देते तें नाटक'

नाटक हे दृश्यकाव्य असल्याने नाटकाचे अस्तित्व प्रेक्षकाशिवाय विफलच समजले पाहिजे याचा अर्थच असा की प्रेक्षकाना सतुष्ट करून त्याना वारवार आपल्याकडे खेचून आणण्याचे सामर्थ्य नाटकात असले पाहिजे. केवळ वाचण्यासाठीं लिहिलेल्या नाटकाचा कदाचित् साहित्यपरिषदेने सत्कार केला तरी नाटयपरिषदेला त्याचा विचार करता येणार नाही नाटकाच्या प्रयोगाने प्रेक्षकाना आनद दिला पाहिजे या तत्त्वाकडे डोळेझाक केल्यामुळें नवीनतेचे अनेक प्रयोग अयशस्वी झाले आहेत असे दिसून येईल प्रेक्षकाकडे दुर्लक्ष करून लिहिलेली नाटके केवळ नवीनतेच्या नावाने कधीही यशस्वी होऊ शकत नाहीत हा अनुभव गेली ३७ वर्षे मराठी रगभूमीला आलेला आहे. नाटकाचा प्रेक्षकावर असा परिणाम व्हावा, की त्याच्या स्मृतीनेसुद्धा त्याला कित्येक दिवस मुख वाटावे...हौशी कलावताच्या प्रायोगिक रगभूमीवरील *कोणत्याहि नाटकाचे यशापयश ठरवताना* 'या प्रयोगाने प्रेक्षक सतुष्ट होऊन तो वारवार करून दाखविता येईल काय' या प्रश्नाचा अवश्य विचार झाला पाहिजे ..प्रेक्षकाना आनद देण्याची पात्रता हीच चागल्या नाटकाची शक्ति हे जसे जुन्या रगभूमीने ओळखले होते तसे नव्या रगभूमीने ओळखले, तरच नवीनतेच्या तरगाकडे आज जे उपहासाने पहात असतील ते प्रेक्षकाना आनद देणाऱ्या खऱ्याखुऱ्या नवीनतेच्या भजनी लागलेले उद्या दिसतील मराठी रगभूमीभोवती पुन गोळा झालेल्या गर्दीची पागापाग होऊ नये यासाठी त्या गर्दीच्या सोज्वळ आणि सदभिरुचिसपन्न रजनाकडे अधिक जागरूकतेने लक्ष दिले पाहिजे"

आपल्या भाषणाच्या शेवटी वदिस्त नाटचगृहाची आवश्यकता सागून मराठी जनतेची आणि मराठी भाषेची परोपरीने सेवा करणाऱ्या रगभूमीकडे सयुक्त महाराष्ट्राचे सरकार कदापि दुर्लक्ष करणार नाही, इतकेच नव्हे, तर या सक्रमणकाळात, ती मागल ती मदत तिला मिळेल, असा विश्वास श्री देसाई यानी प्रगट केला सर्व कलावतानी व विचारवतानीहि मराठी नाटचपरिषदेचे हात बळकट केले तरच परिषदेच महाराष्ट्राच्या 'नाटक अकादमीत' रूपातर करण्याचे ध्येय कालातराने सफल होईल असे सागून अध्यक्षानी आपले भाषण सपविले

## परिसंवाद

या संमेलनात ‘ व्यवसाय म्हणून मराठी रंगभूमीला स्थैर्य कसें देता येईल ?’ या विषयावर परिसंवाद झाला. या परिसंवादात श्री. बापूराव नाईक, श्री. द. रा. गोमकाळे, श्री. पाजणकर, श्री. बाबुराव पेंढारकर, श्री. मो. द. ब्रह्मे व श्री. आपटे यांनी भाग घेतला.

श्री. नाईक म्हणाले की हा धंदा भरपूर फायदा करून देणारा नव्हे हें गृहीत धरून नाट्यव्यवसायाची उभारणी केली पाहिजे. श्री. पाजणकर यांनीं सहकारी पद्धतीचा पुरस्कार केला, तर व्यावसायिकांसाठीं जागोजाग चांगलीं नाट्यगृह उभारण्यावर श्री. पेंढारकरांनीं भर दिला. श्री. आपटे यांनी धंदेवाईक नाट्यप्रयोगामधील कलात्मकदृष्ट्या आढळून येणाऱ्या विसंगतीचा उल्लेख केला.

## संमेलनातील ठराव

प्रारंभी दिवंगत नाट्यसेवकांबद्दल दुखवटा व्यक्त करणारा ठराव मंजूर करण्यात आला. त्या वेळीं कै. पार्श्वनाथ आळतेकर व कै. चिंतामणराव कोल्हटकर यांना अनुक्रमें श्री. प्रभाकर गुप्ते व श्री. पु. ल. देशपांडे यांनी श्रद्धांजलि वाहिली.

यदिस्त नाट्यगृहें बांधताना सरकारनें नाट्यपरिषदेच्या तज्ज्ञ समितीचा सल्ला घ्यावा, पुढल्या नाट्यस्पर्धा परिषदेच्या हातीं सोपविण्यात याव्यात, इतर स्पर्धांप्रमाणे नाटकांचीं हस्तलिखितेंहि स्पर्धेसाठीं स्वीकारलीं जावींत इ. सूचना सरकारला ठरावरूपानें करण्यात आल्या. करमणूक कर-माफीचा फायदा प्रक्षकांनाहि मिळावा व विद्यापीठांनी नाट्यशिक्षणाचे विभाग सुरू करावेत असें आवाहन करण्यात आलें. नाट्यसंमेलनांना रेल्वेसवलत मिळावी अशी विनंती रेल्वेबोर्डाला करण्यात आली.

नाट्यपरिषदेला उद्देशून तिच्या भावी कार्यासंबंधी पुढील ठराव संमत करण्यात आले—मराठी रंगभूमीला मार्गदर्शन करण्यासाठीं रंगभूमीविषयी आस्था असणाऱ्या समाजनेत्यांची आणि विचारवंतांची परिषद बोलवावी, मराठी समाजजीवन आणि रंगभूमि यांच्या संबंधाची पाहणी करून त्यावर ग्रंथ लिहिण्यासाठीं अभ्यासकाची नेमणूक करावी, सहकारी पायावर व्याव

सायिन नाटचसंस्था उभारण्याच्या शक्यतेचा विचार करावा, ठेकेदारी नाटचप्रयोग सुधारण्याच्या दृष्टीने ठेकेदारांबरोबर विचारविनिमय करावा, नाटचसेवकाची छायाचित्रे, ध्वनिमुद्रणे, नाटकाची हस्तलिखिते, नाटच-विषयक साहित्य, नाटचसंमेलनाची अध्यक्षीय भाषणे इ. साहित्य संग्रहित करावे, शालेय विद्यार्थ्यांसाठी योग्य आणि प्रयोगक्षम नाटकाची सूचि करावी, आपद्ग्रस्त नाटचकलावंतासाठी स्थायी स्वरूपाचा निधि सुरू करावा इ. इ.

नेहमीप्रमाणे संयुक्त महाराष्ट्राचा ठरावहि मंजूर करण्यात आला.

पुढील संमेलनासाठी नागपूर, मुंबई, दिल्ली येथून निमंत्रणे आलेली होती त्यापैकी, परिषदेच्या दिल्ली शाखेच्या प्रतिनिधींनी, महाराष्ट्र राज्य झाल्यानंतरचे पहिले संमेलन दिल्लीत झाले पाहिजे असे भावनात्मक आवाहन केल्यामुळे दिल्लीचे आमंत्रण स्वीकारण्यात आले. श्री. पु. ल. देशपांडे यांनी यावद्दल आभार मानून संमेलनाविषयी प्रतिनिधींकडून सूचना मागवल्या.

प्रकाशनें — श्री. पाजणकर यांनी लिहिलेल्या 'खाडिलकरांचे नाटचगुण' या निबंधाचे अध्यक्षांच्या हस्ते प्रकाशन झाले. तसेच अध्यक्ष श्री. देसाई यांचा 'रागरंग' हा ग्रंथहि प्रकाशित करण्यात आला.

## करमणूक

संमेलनाच्या पहिल्या दिवशी बडोद्याच्या स्थानिक कलावंतांनी 'सुंदर मी होणार' हा नाटचप्रयोग करून दाखविला.

या संमेलनात मनोरंजनासाठी दोन अत्यंत वैशिष्टचपूर्ण कार्यक्रम सादर करण्यात आले. ते म्हणजे नाटच शिक्षणाची प्रात्यक्षिके व गडकरी-दर्शन हे होत. श्री. प्रभाकर गुप्ते यांच्या नेतृत्वाखाली चालू असलेल्या पुणे येथील महाराष्ट्र नाटच विद्यालयाच्या विद्यार्थ्यांनी आपल्या शिक्षणाचे काही नमुने संमेलनात सादर केले. यात अभिनयाच्या विविध पैलूंचा समावेश होता. वाणीला लवचिकपणा यावा, दमसास वाढावी म्हणून विद्यार्थ्यांनी निरनिराळी स्तोत्रें, स्वराचे चढउतार घेत, वेग कमीजास्त करीत आणि वेगवेगळ्या भावनांची डूब देत म्हणून दाखविली. त्यानंतर कशाचीहि मदत न घेता केवळ शरीराच्या हालचाली आणि मुद्राभिनय यांच्या साहाय्याने काही प्रसंग हुबेहुब समोर उभे केले. या विद्यालयात दिल्या जाणाऱ्या शिक्षणक्रमाची

कल्पना यावी म्हणून श्री. गुप्ते यांनी अभिनयसाधनेविषयींचे विविध प्रकारचे तक्ते, आकृत्या व छायाचित्रें यांचें एक छोटेसें प्रदर्शनच संमेलनात मांडलें होते.

श्री. पु. ल. देशपांडे यांनी आपल्या पत्नी सौ. सुनीता देशपांडे व पाटील पति-पत्नी यांचे सहकार्य घेऊन कै. राम गणेश गडकरी यांच्या नाट्यसृष्टींतील कांही चिरपरिचित असे संवाद व प्रसंग एका विशिष्ट सूत्रात गुफून त्यावर आधारित 'गडकरी-दर्शन' हा अभिनव कार्यक्रम अत्यंत यशस्वीपणे सादर केला.

वडून कोणत्याहि प्रकारचे साहाय्य न मिळाल्याने ही सकल्पित योजना निष्फळ ठरली

## विद्यापीठें व नाट्य शिक्षण

महाराष्ट्रातील मुंबई, मराठवाडा, नागपूर व पुणे या विद्यापीठात नाट्य-शिक्षणाचा अभ्यास सुरु व्हावा असा एक ठराव बडोदे-सम्मेलनात मजूर झाला होता या ठरावाची कार्यवाही करण्यासाठी प्रत्येक विद्यापीठासाठी एक असा चार समित्याची नियुक्ति करण्यात येऊन त्यानी वरील विद्या-पीठावरोवर चर्चा करावी असे ठरविण्यात आले

## प्रयोगक्षम नाट्यवाङ्मयाची सूचि

दिल्ली यथील भारतीय नाट्यसघाने मराठी भाषेतील प्रयोगक्षम अशा नाटकाची सूची तयार करण्याचे काम मराठी नाट्यपरिषदेकडे सोपविलेले आहे त्यासाठी परिषदने एक समिति नियुक्त करून डॉ मु श्री कानडे याची या समितीचे नियत्रक म्हणून नमणूक केली डॉ कानडे यानी आता-पावेतो सुमारे ४५० प्रयोगक्षम अशा नाटकाची वर्णनात्मक सूचि तयार केली असून सम्मेलनाध्यक्ष श्री व शा दसाई यानी या सूचीला पुरस्कार लिहिला आहे ही सूचि लवकरच पूर्ण करून भारतीय नाट्यसघाच्या स्वाधीन केली जाणार आहे

## परिषदेची प्रकाशने

(१) श्री बापुराव नाईक, श्री व शा दसाई व श्री के नारायण काळे यानी लिहिलेला 'Story of Marathi Drama' हा ग्रथ मुंबईच्या 'पॉप्युलर प्रकाशन'च्या तर्फे आगामी दिल्ली समेलनात प्रकाशित केला जाणार आहे

(२) डॉ न ग बरवे व डॉ मु श्री कानडे यानी लिहिलला 'मराठी नाट्य परिषद इतिहास व कार्य' हा ग्रथ पुण्याचे श्री अ ह लिमये याच्या 'व्हीनस बुक स्टॉल' तर्फे दिल्ली समेलनातच प्रसिद्ध होणार आहे

(३) मराठी व्यावसायिक व हौशी नाट्यसस्थाची सूचि तयार करण्याचे कार्य परिषदेने हाती घतले असून सर्व नाट्यसस्थाकडून जरूर ती माहिती जमा झाल्यावरोबर ती परिषदेतर्फे प्रकाशित केली जाईल

# नाट्य-परिषद् : इतिहास व कार्य

### विहंगमावलोकन

## मध्यवर्ती संस्थेची नामांतरे

नाट्यसंमेलन या संस्थेचे कल्पक व संस्थापक श्री अनंत वामन वरवे यांना नाट्यसंमेलन भरविण्याची कल्पना प्रथमतः आपल्या नाट्यकला या पाक्षिकात मांडली त्या वेळी त्याला महाराष्ट्र नाट्य मंडळाचे संमेलन असे नाव दिलेले होते तथापि संमेलनाचा सूत्र हलविणाऱ्या मध्यवर्ती संस्थेला ' भरत नाट्य समाज ' हे नाव सुचविण्याचे श्रेय पहिल्या संमेलनाचे अध्यक्ष श्री दादासाहेब खापर्डे यांच्याकडे जाते पहिल्या दोन वर्षांत संमेलनाच्या कार्याला केवळ वार्षिक सोहळ्याचेच स्वरूप होते परंतु नाट्यकलाविषयक कार्यांसाठी सतत प्रयत्नांची आवश्यकता असल्याने त्यासाठी घटनाबद्ध अशा स्थायी संस्थेची स्थापना होणे हे अगत्याचे होते हे कार्य कै ... प्र ... वाडि... कर यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या तिसऱ्या नाट्यसंमेलनात करण्यात आले मात्र त्या वेळी कै खापर्डे यांनी सुचविलेल्या भरत नावाऐवजी भारत नाट्य समाज असे नाव संस्थेने धारण केले हा बदल कोणाच्या सूचनेनुसार करण्यात आला त्याचा खुलासा मिळू शकला नाही

भारत नाट्य समाज हे नाव कायम होऊन पुढील संमेलन या संस्थेच्या मार्गदर्शनाखाली नियमितपणे भरण्यास सुरवात झाली हा सव संमेलन भारत नाट्य समाजाचा संमेलन या शीर्षकानेच साजरा झाली

१९ व्या नाटयसमेलनानंतर १९२३ मध्ये या संस्थेचे आधारस्तंभ श्री अ. वा. वरवे व त्यांचे सहकारी श्री. सी. भा. जोशी हे दोघेहि दिवंगत झाले आणि थोड्याच कालावधीत 'भारत नाटय समाज'हि नामशेष झाला. समाजाच्या सर्व कागदपत्रांचीहि वाताहत होऊन केवळ नाव मात्र शिल्लक राहिले तथापि समेलन भरविण्याचे कार्य काही उत्साही व चष्टाळू नाटयप्रेमी व्यक्तींच्या आधाराने चालूच राहिले यापुढील २० ते २९ पर्यंतची समेलने १९२८ ते १९३८ या काळात भरली, ती 'भारत नाटय समेलन' या नावानेच परंतु त्याच्या पाठीमागे उभा असणारा 'भारत नाटय-समाज' १९२३ नंतर पुन्हा पुनरुज्जीवित होऊ शकला नाही

## 'महाराष्ट्र नाटय-समेलन' संस्थेची निर्मिती

या काळातील समेलनातून एखाद्या स्थायी संस्थेच्या आवश्यकतेसंबंधी अधूनमधून चर्चा झाली, परंतु तीतून निष्पन्न काहीहि झाले नाही श्री मामा वरेरकर यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या २९ व्या नाटयसमेलनात एक समिति नियुक्त करण्यात येऊन तिने समेलनाच्या कार्याची कार्यवाही करण्यासाठी घटना तयार करावी असा ठराव करण्यात आला या समितीची घटना ३० व्या नागपूर समेलनात (१९३९) मंजूर झाली त्या घटनेनुसार मध्यवर्ती व स्थायी स्वरूपाच्या या संस्थेचे नाव 'महाराष्ट्र नाटय-समेलन' असे

'भरताचे अनुयायी' म्हणजे नट व रंगभूमीचे इतर अनुयायी' असा आहे. पण वरील याची कल्पना नुसती महाराष्ट्र किंवा हिंदुस्थानापुरतीच मर्यादित नसून विश्वव्यापी होती. इतक्या मोठ्या मर्यादेपर्यंत आम्ही आपल्या कार्याची मजल अजून ठरविली नाही. आम्ही आपल्यास महाराष्ट्रापुरते मर्यादित करून घेत आहोत. हे एवढें कार्य यशस्वी झाल्यास पुढें आम्हाला 'भारत' हेंहि नाव धारण करता येईल[1].'

'महाराष्ट्र नाट्य संमेलन' या नावाची कल्पना यापूर्वीहि उद्भूत झाली होती असे दिसते. श्री. बालगंधर्व यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या २४ व्या नाट्यसंमेलनाचे प्रकटन करताना त्या वेळच्या चिटणिसांनी 'यंदाचे महाराष्ट्र नाट्य संमेलन' असाच संमेलनाचा उल्लेख केला होता.

या नावासंबंधीचा दुसरा आक्षेप असा होता — येथून पुढें 'भारत नाट्य संमेलन' या नावाऐवजी 'महाराष्ट्र नाट्य संमेलन' असे नाव धारण केले तर ३० वे भा. ना. सं. व १ ले महाराष्ट्र ना. सं. अशी दुहेरी नामावलि पत्करावी लागेल. त्याला पुढीलप्रमाणे उत्तर देण्यात आले — 'अशा दुहेरी नामावलीचे काही विशेष प्रयोजन आहे असे वाटत नाही. कारण आजवर नाट्यसंमेलने झाली त्यांचे कार्यक्षेत्र महाराष्ट्राबाहेर गेलेले नाही व यापुढील कार्यक्षेत्र महाराष्ट्रापुरतेच मर्यादित राहणार आहे. शिवाय महाराष्ट्र नाट्यसंमेलनाचे पहिलें अधिवेशन असे म्हटल्याने पूर्वीच्या नाट्यसंमेलनाची परंपरा नाकारल्यासारखें होते. ती आम्हांस नाकारावयाची नाही. संमेलनाची परंपरा तीच कायमच आहे, फक्त नावातच अंशतः बदल आहे.'

हा युक्तिवाद सर्वांना मान्य होऊन मध्यवर्ती समितीचे 'महाराष्ट्र नाट्य संमेलन' हे नाव कायम होऊन तदनुसार पुढें १९५४ पर्यंतची संमेलने भरलीं.

## मराठी नाट्य संमेलन (१९५४)

१९५४ मध्यें पुण्याला ३७ वे महाराष्ट्र नाट्यसंमेलन भरले. या अधिवेशनात दूरच्या महाराष्ट्र साहित्यसभेच्या प्रतिनिधींच्या एका ठरावान्वयें असा विचार झाला की महाराष्ट्राबाहेरील भारतीय प्रदेशात जे मराठी भाषिक

[1] इ. स. [illegible] नाट्यसंमेलनात [illegible] यांनीहि 'या [illegible] अखिल [illegible] 'भारतीय नाट्य समाज' स्थापणें असे [illegible] झाले.

विसुरलेले आहेत त्यानाहि मराठी रगभूमिविषयक कार्यात आपलेपणाने भाग घेता यावा म्हणून समेलनाला महाराष्ट्र नाटचनमेलनाऐवजी मराठी नाटच-समेलन असे नाव द्यावे या ठरावानतरी विचार होऊन पुढे सोलापूर येथे भरलेल्या ३९ व्या समेलनापासून मध्यवर्ती सस्थेच्या धनीने भरविण्यात येणाऱ्या नाटचसमेलनाना 'मराठी नाटच समेलन' असे सबोधण्यात येऊ लागले.

## मराठी नाट्य परिषद (१९५६)

पुणे येथे झालेला बदल एक वर्षापुरताच टिकला या समेलनात पूर्वीच्या 'महाराष्ट्र नाटच समेलन' म्हणून तयार झालेल्या मध्यवर्ती मस्थेच्या घटनत आमूलाग्र बदल करण्यात आला या घटनेनुसार नाटचनमेलनाची सूत्रे हालविणाऱ्या, त्यातील ठरावाची अमलबजावणी करणाऱ्या मध्यवर्ती सस्थेचे नाव 'मराठी नाटच-परिषद' असे निश्चित करण्यात आल तेव्हापासून (१९५६) याच नावाने मराठी रगभूमिविषयक सर्व प्रकारच्या कार्याचे आयोजन करण्यात यत आहे

## घटना-सिद्धि

### तिसऱ्या समेलनातील पहिली घटना

समेलन भरण्यास प्रारभ झाल्यानतर थोडयाच दिवसात या कार्याला एखाद्या नियमबद्ध कार्यपद्धतीची आवश्यकता भासू लागली पहिल्या समेलनाचे अध्यक्ष कै खापर्डे यानी आपल्या भाषणात, नाटचक्षेत्रातील सर्वांच्या सामान्य हिताचे एक कार्य म्हणजे समेलन असे सागून "त्यास नामरूप दृहि पाहिजे ... त त्वकरच प्रसिद्ध करण्यात यईल" अशी आशा व्यक्त केली होती दुसऱ्या समेलनात याविषयी काही हालचाल झाली नाही परतु कै खाडिलकराच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या तिसऱ्या समलनात समेलनसस्थेला एक घटनाबद्ध स्वरूप देण्यात आले या घटनत सस्था सभासद व व्यक्ति सभासद असे प्रारभापासून दोन वर्ग ठरविले जाऊन ७ सदस्याचे कार्यकारी (नियामक) मडळ असावे असे ठरविण्यात आल सस्थेच्या घटनेत नाटच-विषयक सग्रहालयाचा उल्लेख करण्यात आलेला असून त्याची व्यवस्था पाहणाऱ्या सदस्याला नियामक मडळाचाहि सदस्य करून घेण्यात आले.

ही घटना तयार झाली तरी त्याप्रमाणे सपूर्ण नियामक मडळाची निवड

झालेली संस्थेच्या कागदपत्रात आढळत नाही फक्त मुख्य चिटणीस व दुय्यम किंवा मदत चिटणीस यांच्या नेमणुकीचे, राजीनाम्याचे, फेरनिवडणुकीचे उल्लेख मिळतात

तिसऱ्या संमेलनातील घटना पुढे अनेक वर्षे चालू राहिली तथापि या घटनेसंबंधी काही जाणत्यांच्या मनात शंका निर्माण होऊ लागल्या सहाव्या संमेलनाचे अध्यक्ष श्री भानू यांनी आपल्या भाषणात 'संमेलन भरविताना ज्या अडचणी येतात त्या दूर करण्यासाठी संमेलनाची घटना ठरली पाहिजे' असे उद्गार काढलेले आढळून येतात या उद्गाराचा निश्चित अर्थ काय घटना बदलली पाहिजे असा विचार अध्यक्षांच्या मनात होता किंवा काय याचा खुलासा सापडत नाही पुढे मात्र घटनेसंबंधी काही विचार विनिमय झालेला दिसत नाही

## १७ व्या संमेलनाची समिति

१९२१ मध्ये कै य ना टिपणीस यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या पुणे येथील संमेलनात एक घटनादुरुस्तीचा ठराव मंजूर करण्यात आला त्या ठरावान्वये घटनेमध्ये कालानुसार फेरबदल करण्यासाठी १७ सद्गृहस्थांची एक समिति नियुक्त करण्यात आली समितीचे अध्यक्षपद कालकर्ते शिवरामपंत परांजपे यांना देण्यात आले व समितीमध्ये न चिं केळकर खाडिलकर वरेरकर टिपणीस इ प्रमुख नाटककार बालगंधर्व पेंढारकर केशवराव भोसले चिंतामणराव कोल्हटकर इ प्रमुख नट बर्वे, फाटक प्रभृती संमेलनाचे चिटणीस यांचा समावेश करण्यात आला एवढी प्रातिनिधिक समिति रंगभूमीच्या इतिहासात क्वचितच नेमली गेली असेल परंतु समितीतील नावे मोठी असली तरी तिचे कार्य मात्र शून्य होते म्हणून १८ व्या संमेलनात श्री दाते गासले राणे इ ६ जणांची पुन्हा एक समिति नेमण्यात आली

## मध्यवर्ती संस्थेची दुर्दशा

या ६ सदस्यांच्या समितीकडूनहि काही घटना-दुरुस्ती होऊ शकली नाही याच सुमारास संमेलनाचे मुख्य चिटणीस श्री ज बा बर्वे हे मृत्यु पावले आणि त्यांच्या पाठोपाठ त्यांनी स्थापिलेला भारत नाट्य समाजहि अस्तंगत झाला संमेलनाच्या दप्तराची हालवाहाल होऊन तेहि नष्ट झाले श्री बर्वे

यानी जमविलेला चित्रसंग्रह, नाट्यविषयक वृत्तपत्राची कात्रणे आणि समाजाची इतर काही मालमत्ता काळाच्या पोटात गडप झाली भारत नाट्यसमाजाचे फक्त नाव तेवढे शिल्लक राहिले १९२४ ते ३८ पर्यंत जी समलन भरली, त्यातून समाजाची पुन्हा स्थापना करण्याचे विचार 'अधूनमधून डोकावले, तथापि प्रत्यक्ष फलप्राप्ति काहीहि होऊ शकली नाही

## पुन्हा चालना

२६ व्या समेलनात ( १९३३ ), नाटकमडळचा, नट नाटककार याचे १० प्रतिनिधि व ५ वजनदार नाट्यप्रेमी अशा १५ जणाचे मध्यवर्ति मडळ स्थापण्यात यावे व कॉंग्रेसच्या कार्यकारिणीप्रमाणे (Working Committee) त्याचे कामकाज चालावे असा ठराव पुन मजूर झाला, आणि पुढे तो नेहमीप्रमाणे दप्तरी दाखल झाला १९३८ मध्ये मात्र या समाजाच्या पुनरुज्जीवनास खरीखुरी चालना मिळाली. या समेलनात श्री मामा वरेरकर, रा सा र ल. जोशी, श्रीमती शकुतला पराजपे व प्रा द वा. पोतदार याची समिती नेमून तिने समलनाच्या मध्यवर्ति सस्थेची घटना तयार करावी असा आदेश दिला श्री श व तळेकर हे या समितीचे निमत्रक होते समितीने समेलनाच्या आदेशानुसार समेलनाच्या कार्याची अमलबजावणी करणाऱ्या मध्यवर्ति सस्थेच्या घटनेचा आराखडा तयार केला व तो श्री तळेकर यानी पुढल्या नागपूर (१९३५) समेलनात सादर केला

तपशील ठरविणे, नाट्यकला उन्नतिकारक अशा योजना आखणे, ठरावाची अमलबजावणी करणे ही कार्ये सुरू झाली

नाशिक येथील (१९४०) संमेलनात या अस्थायी समितीचे विसर्जन होऊन नवीन घटनेनुसार नवे कार्यकारी मंडळ अस्तित्वात आले महाराष्ट्र नाट्य संमेलनाची पुढील वाटचाल या घटनेनुसार चालू झाली

नगर घटना

या घटनेत सभासदांच्या सूचनेनुसार काही दुरुस्त्या करण्यासंबंधी मुंबई संमेलनात एक ठराव झाला हे घटनादुरुस्तीचे काम नगर येथील ३५ व्या अधिवेशनापर्यंत (१९४६) रेंगाळलें होते ते त्याठिकाणी एकदाचे पुरें होऊन संमेलनसंस्थेला अधिक व्यापक व प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त होण्याच्या दृष्टीनें काही फेरबदल सुचविण्यात आले व ते अधिवेशनात मंजूरहि झाले या घटनेनंतर महाराष्ट्रातील सार्वजनिक वातावरण (पुढील काही काळ) अत्यंत अस्थिर आणि प्रक्षुब्ध झाल्यामुळें ही मान्य घटना अमलात येणे मुष्किलीचे आहे असे कार्यकर्त्यांच्या अनुभवाला येऊन प्राप्त परिस्थितीत कार्यान्वित करता येईल अशी घटना करण्यासाठी प्रथम श्री चिंतामणराव कोल्हटकर, नानासाहेब गोखले व प्रा भूपटकर यांची व नंतर पुन्हा पुणे येथील संमेलनात श्री के ना काळे यांच्या नेतृत्वाखाली दुसरी समिती नेमण्यात

विस्कळीत स्वरूपाचे होते बेळगावला सिद्ध झालेली ही घटनाच आता निदान पुढील काही वर्षे तरी परिषदेच्या सर्व कार्याचे नियमन करील असे वाटते

## संमेलनाची वाटचाल : स्थल व काल

आतापर्यंत ४२ नाट्यसंमेलने झाली त्यापैकी हैदराबाद आणि बडोदे ही दोनच संमेलन सलग मराठी भाषिक मुलूखाबाहेर झाली बाकी सर्व आजच्या संयुक्त महाराष्ट्रात साजरी झाली (बेळगाव आज संयुक्त महाराष्ट्रात नसले तरी ते त्यापैकीच आहे हे गृहीत धरून बेळगावचा समावेश या वर्गातच केला आहे )

पहिले संमेलन मुंबईला भरले असले तरी दोन वर्षांतच संमेलनसंस्थेची कचेरी पुण्याला आली आणि संमेलनाची ती केंद्र कचेरीच झाली असे म्हणावयास हरकत नाही किंबहुना संमेलनाचा वार्षिक सोहळा हा कायमचा पुणे येथेच भरवावा अशी एक विचारसरणी होती प्रा भानू यानी ६ व्या संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात असा उल्लेख केला आहे की, "५ व्या संमेलनात, पुणे हेच संमेलनाचे कायमचे वसतिस्थान असावे असे ठरले आहे " परंतु पुढील म्हणजे ६ वे व ७ वे ही संमेलन पुणे येथे न भरता अनुक्रमे मुंबई व अमरावती येथे झाली मराठी रंगभूमिविषयक कार्याचा प्रसार सर्वत्र व्हावा असा हेतु संमेलनाचे चिटणीस श वा बरवे याचा असल्याने त्यानी संमेलन इतरत्र करविण्याचा प्रयत्न केला, परंतु त्या काळच्या श्री श वा मुजुमदार प्रभृति काही मंडळीच्या मनातून पुणें येथेच नेहमी संमेलन भरवावे असे होते श्री बरवे याच्या मुलुखगिरीसंबंधी टीका करून पुण्याचे महत्त्व पटविताना श्री मुजुमदार यानी पुढील उद्गार काढलेले आहेत[1] "संमेलनाचे कार्य उत्तम रीतीने पार पाडण्याला पुणें हेच स्थळ योग्य आहे या ठिकाणी पुण्याच्या विद्वानाची सहानुभूति मिळतेच, शिवाय मे महिन्याच्या विश्रांतिकरिता येणाऱ्या बाहेरगावच्या विद्वानाचीहि सहानुभूति संपादन करिता येते या गोष्टीची खात्री संमेलनाचे सेक्रेटरी श्री बरवे याची झाली असेल असे वाटते "

या विचारसरणीचाच प्रभाव पडला म्हणून म्हणा किंवा अन्य सयुक्तिक कारणामुळे म्हणा, संमेलनाच्या इतिहासात पुण्याला अद्वितीय महत्त्व प्राप्त

१ रंगभूमि मासिक, ७ व्या संमेलनाचा अहवाल

झाले. एकूण ४२ संमेलनांपैकी १८ संमेलनें एकट्या पुण्यनगरीत साजरी झाली. विशेषतः २९ व्या संमेलनापर्यंत पुण्याचे स्थान अबाधित होते. नंतर मात्र संमेलनाची घोडदौड सर्व महाराष्ट्रभर सुरू झाली. तरीहि साहित्य संमेलना-प्रमाणें नाट्यसंमेलनानें अखिल महाराष्ट्रभरहि संचार केलेला नाही, मग बृहन्महाराष्ट्रातील संचार तर दूरच.

हे संमेलन मराठी रसिकांचे असले तरी त्याचा कार्यविस्तार प्रामुख्यानें मुंबई राज्यातील मराठी मुलुखातच झाला. एकदा नागपूर व एकदा अमरावती एवढे दोन अपवाद सोडले तर विदर्भ भागात संमेलनाचा प्रवेश झाला नाही. आणि मराठवाड्याची तर त्यानें अद्यापि सीमाहि ओलांडलेली नाही.

कालाच्या दृष्टीनें विचार केला तर १९०५ पासून १९२० पर्यंत चीं २० संमेलनें मध्यंतरीं अजिबात खंड न पडतां भरलीं. त्यानंतर पुढचीं ३५ पर्यंतचीं संमेलनें मध्यें एखाद्या वर्षाच्या अंतरानें भरलीं. पुढें मात्र ३ वर्षांच्या अंतरानें कोल्हापूरला ३६ वें संमेलन भरलें. तेथील संस्थानचा हवा संमेलनाला चांगली मानवल्यामुळें त्यानें तेथें जो मुक्काम केला तो हालण्यासाठीं ५ वर्षांचा दीर्घ अवधि लागला.

इतराना संधि मिळावी म्हणून चिटणीसपदाचा राजीनामा दिला, त्याच्या जागी श्री वरवे याची मुख्य चिटणीस म्हणून निवड होऊन स्वदेशहितचिंतक ना म तील श्री गोविंदराव होनप या पदवीधर गृहस्थानी वर्षभर सह-चिटणीसाचे काम केले. १९०८ ते १९१७ पर्यंत श्री वरवे याना पुण्यातील सोशल क्लबचे उत्साही चिटणीस श्री दत्तात्रय आत्माराम फाटक यानी समेलनाचे सहचिटणीस म्हणून साथ दिली तथापि समेलनविषयक बहुतेक कार्याचा बोजा श्री वरवे याच्याच शिरावर होता

श्री वरवे व किर्लोस्कर मडळीचे व 'रगभूमि' मासिकाचे मालक श्री. मुजुमदार याच्यात समेलनाच्या कार्यपद्धतीविषयी अनेक मतभेद उत्पन्न झाल्याचे 'रगभूमि' मधील लेखावरून दिसून येत श्री वरवे याचे कार्य व विचार या दोहोवर श्री वरवे याच्या कार्याची थोरवी व त्यासाठी ते करीत असलेले अविरत परिश्रम याची श्री मुजुमदार याना पूर्णपणे जाणीव होती. ८ व्या समेलनाचा वृत्तात देताना त्यानी श्री वरवे याच्याविषयी असे उद्गार काढले की, "—त्यानी नाट्यकलेच्या सेवेकरिता आपल्यास वाहून घेतले आहे व ती सेवा आजपर्यंत निरपेक्ष बुद्धीने करीत आले आहेत हे सर्वांस महशूर आहे "पुढे १० व्या समेलनाच्या अहवालातहि ते म्हणतात," भारत नाट्य समाजाच्या व्यवस्थेसबधी वरवे याचेकडे काही दोष असतील, परतु त्याच्या चिकाटीनेच हा भा ना समाज काही अशी जिवत राहिला आहे ही गोष्ट कबूल केली पाहिजे." श्री मुजुमदार याच्यासारख्या श्री वरवे याच्या टीका-काराचे हे उद्गार पाहिल्यानतर त्याना वेगळ्या शिफारसपत्राची जरुरी आहे असे वाटत नाही.

१९१९ पासून प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे श्री वरवे यानी समेलनकार्याची जबाबदारी श्री सीताराम भास्कर जोशी याच्यावर सोपविली श्री जोशी हे मुख्य चिटणीस व श्री फाटक हे दुय्यम चिटणीस म्हणून काम पाहू लागले पुढील वर्षी (१९२०) श्री फाटक यानीहि राजीनामा दिल्यामुळे महाराष्ट्र-नाटक मडळीतील एक नट श्री गणेश कृष्ण बोडस याची सहचिटणीस म्हणून नेमणूक झाली श्री. वरवे याच्या सल्ल्यान या दोघानी १९२३ पर्यंतची समेलन पार पाडली श्री वरवे खबीरपणे उभे होते तोवर समेलनात विविध उपक्रम होत असत व नाटक मडळ्याच्या अडचणी भा. ना समाजाच्या

सटपटीने पुढेंहि धमाला लावण्याचा प्रयत्न होई ते आजारी पडल्यानतर केवळ समेलन भरवणें हेंच समाजाचे एकमेव कार्य उरल. १९२३ मध्यें श्री जोशी व वरवे या दोघावरहि मृत्यूचा घाला पडला आणि त्यावरोवरच भारत नाट्य समाजाचाहि आधार निसटल्यामुळें तो जमीनदोस्त झाला

पडता काळ (१९२३–३८)

श्री वरवे यानी आपल्या मरणापूर्वी समेलनसस्थेची सर्व जबाबदारी श्री. बोडस याच्या गळ्यात टाकली व नस्थेचे सर्व कागदपत्र त्याच्या स्वाधीन केले श्री बोडस नेहमी आपल्या नाटक मडळीबरोबर फिरतीवर असल्यानें समाजाच्या कार्यालय टाळें लागून कार्यालयाची सर्व मालमत्ता नूतन आर्य भूषणचे मालक श्री राजेसाहेब पराजपे याच्याकडे पडून राहिली दुर्दैवान श्री पराजपे हे १।२ महिन्यातच मरण पावले व त्याच्या थिएटरची वासलात लागत असताना समाजाच्या सर्व कागदपत्राची व इतर साहित्याचीहि नासधूस होऊन समाजाचे फक्त नाव मागें उरले

म्हणून प्रा बनहट्टी याची व डॉ न अ वरवे याची चिटणीस म्हणून निवड झाली या जोडीन पुढील १० वर्षे समेलनाच्या सर्व जबाबदाऱ्या नेटान पार पाडण्याचा प्रयत्न केला या काळात मध्यतरी सावट आलेले नाटचसमेलन पुन्हा पूर्वीसारखे विविध कार्यांचे सकल्प करू लागले या काळात विद्यापीठात शिक्षणक्रम सुरू करण्याची खटपट करणे, नगरपालिकाना नाटचगृहें बाधण्यासाठी विनती-अर्ज करणे, मराठी रगभूमीच्या विस्तृत इतिहासाची योजना करणे व मराठी रगभूमीचा शतसावत्सरिक महोत्सव सर्वत्र थाटामाटाने साजरा करण्याची प्रेरणा देणे इ अनेक उद्योगाचे सकल्प सोडण्यात आले व ते यथाशक्य तडीला नेण्यात आले मृतप्राय होऊ लागलेली मराठी रगभूमि मराठी रगभूमीच्या शतसावत्सरिक महोत्सवाने पुन्हा नव्या चैतन्याने उभी राहिली हे त्याचे ऋण आता सर्व टीकाकारानी मान्य केले आहे

या काळातील समेलन सस्थेचे वैशिष्टच म्हणजे मध्यवर्ति सस्था वर्षभर कार्यरत राहिली हे होय रगभूमीच्या उत्कर्षासाठी, समेलनात समत होणाऱ्या ठरावाची अमलबजावणी करण्याचें काम त्याच्या सतत मार्गे लागल्यानेच थोडेंफार होण्यासारखें होते सतत चिकाटीने व ठिकठिकाणी दौरे काढून प्रा बनहट्टीनी या कार्याची तड लावण्याचा प्रयत्न केला

१९४८ नतर या सर्व चळवळीचे धुरीण समेलनाचे कार्याध्यक्ष प्रा बनहट्टी व त्याना निष्ठेने साथ देणारे समेलनाचे चिटणीस डॉ वरवे याना आपापल्या व्यवसायानिमित्त नागपूर सोडून जावे लागल्याने त्यानी कोल्हापूरच्या (१९४८) समेलनात नाटचसमेलन—सस्थेची धुरा श्री चितामणराव कोल्हटकर व श्री ग वि ऊर्फ नानासाहेब गोखले याच्या खाद्यावर ठवली तेव्हापासून सस्थेचें कार्यालय पुन्हा पुण्यात सुरू झाले परतु पुण्यासारख्या नाटचप्रेमी नगरात आल्यानतर सस्थेचे काय दुप्पट उत्साहाने चालू होण्याऐवजी तेथील विशिष्ट वातावरणामुळे म्हणा किंवा अन्य कारणाने म्हणा, समेलन सस्था पुन्हा निष्क्रिय अवस्थेतच पडून राहिली त्या थड गोळ्याला पुन्हा हालचालीची गति देण्याचे कार्य, प्रा बनहट्टी १९५४ मध्ये पुण्याला आले तेव्हा त्याच्याच करवी झाले

## बेळगाव संमेलनानंतरची नवी वाटचाल

बेळगाव येथील ३८ व्या संमेलनापासून परिषदेची घटना व तिच्या वतीनें होणारे नाट्यपोषक कार्यक्रम याच्या स्वरूपात संपूर्णपणें बदल घडून आला येथपासून संमेलनाला म्हणजेच नाट्य परिषदेला नव्या घटनेबरोबरच नव सारथीहि मिळाले व त्याच्या साहाय्यानें परिषदेचा रथ मार्गक्रमण करू लागला या संमेलनात निवडलेल्या कार्यकारिणीमध्ये श्री गो म वाटवे याची चिटणीस म्हणून निवड झाली आणि तेव्हापासून आजपावेतों परिषदेच्या नित्याच्या कार्याचा व्याप श्री वाटवे यानीच सांभाळलेला आहे श्री वाटवे, श्री. आत्माराम भेंडे व श्री भालचंद्र पेंढारकर यानी आपापल्यापरीनें श्री वाटवे याना साथ दिली व अद्यापिहि देत आहेत तथपि मुख्य वाटा श्री वाटवे यानींच उचललेला आहे नाट्यव्यवसायासंबंधी निर्माण झालेल्या व नव्यानें उद्‌भवणाऱ्या अडचणींचें निराकरण करण्यासाठी संबंधित मंत्र्यांच्या भेटी घेणें, प्रादेशिक संमेलनांना चालना देणे, परिषदेच्या तर्फे नाट्यविषयक साहित्य प्रकाशित करणे आणि परिषद ही सर्व नाट्यसंस्थांची प्रातिनिधिक संस्था म्हणून सर्वमान्य होईल असे प्रयत्न करणे इ कार्य या अवधीत पार पाडण्याचे प्रयत्न झाले आता या कार्यांत काही व्यावसायिक व हौशी कलावंतहि मन तऱ्हेची मदत देण्यास उत्सुक झाले आहेत आणि त्यामुळें परिषदेच्या कार्याला अधिक व्यापक व सर्वसमावेशक स्वरूप प्राप्त होत आहे

मात्र आजपर्यंतचे नाट्यसंमेलनाचे कार्य हे कै अ ना वरवे, प्रा वनहट्टी, डॉ वरवे, श्री वाटवे प्रभृती नाट्यक्षेत्राशी प्रत्यक्षपणे संबंधित नसलेल्या परंतु मराठी नाट्यकलेविषयी अपरंपार आवड असणाऱ्या व्यक्तींनींच अत्यंत निरपेक्षपणे व निरलसपणे केलेले आहे

अध्यक्षपद गेले कै खापर्डे, न चि केळकर, खाडिलकर, डॉ गर्दे, प्रा भानू, शि म परांजपे इत्यादि जाणत्या मंडळीकडे प्रथम हा बहुमान आला यातील केळकर, खाडिलकर प्रभृती मंडळी नाटककार म्हणून प्रथितयश झालेली असली तरी त्यांना अध्यक्षपद देण्यात त्यांच्यासारख्या विद्वान आणि पुढारी मंडळीकडून काही मार्गदर्शन व्हावे हीच दृष्टि असावी असे वाटते

## नाट्यव्यवसायी व अध्यक्षपद

१९१६ मध्ये भरलेल्या १२ व्या संमेलनाचे श्री शंकरराव मुजुमदार हे अध्यक्ष झाले, त्या वर्षी प्रथम नाट्यव्यावसायिकाला अध्यक्षपदाचा मान मिळाला तथापि तेव्हापासून नटमंडळीला अध्यक्षपदाचा मार्ग खुला झाला असे नाही आजपर्यंतच्या संमेलनातून श्री यशवंतराव चिटणीस, बालगंधर्व, गोविंदराव टेंबे, अण्णासाहेब कारखानीस, गणपतराव बोडस, चिंतामणराव कोल्हटकर, पार्श्वनाथ आळतेकर व नानासाहेब फाटक एवढेच नट अध्यक्षपदापर्यंत पोचलेले आहेत यातील टिपणीस, टेंबे, कारखानीस हे नट-नाटककार वगळले तर फक्त ५ नट उरतात त्यापेक्षा नाटककार अधिक भाग्यवान म्हणावे लागतील आजवर एकूण १७ नाटककारांना अध्यक्षपदाचा बहुमान मिळालेला आहे संगीत नाटकाचे मराठी रंगभूमीवरील प्रभुत्व प्रारंभापासून अद्यापपर्यंत कायम राहिलेले आहे, परंतु नवल हे की एकट्या बालगंधर्वांचा अपवाद वगळला तर संगीताच्या जोरावर रंगभूमि गाजवणाऱ्या अन्य कोणाहि गायक नटाला अध्यक्षपदाचा मान मिळालेला नाही स्वराच्या आधारावर प्रेक्षकांना जिंकणाऱ्या कलावंताना शब्दाच्या जोरावर श्रोत्यांना जिंकणे हे जमणारें नाही अशी कदाचित् समजूत असावी त्यामुळें अभिनयाच्या आणि संवादाच्याद्वारा लौकिक मिळणाऱ्या गद्य नटांनाच हा मान अधिक वेळा मिळालेला आहे

फारसा वाव दिला नाही. नट किंवा नाटककार यांनाच अध्यक्षपद द्यावयाचें अशीच एक प्रथा पडूं लागल्यासारखी दिसते.

संमेलनांत निबंध वाचणें किंवा पत्र पाठवून आपली मतें कळविणें याबाबतींत स्त्रियांनीं ७ व्या आठव्या संमेलनापासूनच भाग घेण्यास प्रारंभ केला परंतु अध्यक्षपदापर्यंत पोचण्यास तेविसाव्या संमेलनापर्यंत त्यांना थांबावें लागलें.

## निवृत्त नटांचाच सन्मान

संमेलनाचा प्रारंभ १९०५ मध्यें झाला. तेव्हांपासून सुमारें १९३५ पर्यंत मराठी रंगभूमीचा वैभवकाल चालूं होता असें धरलें तर त्या अवधींत नाट्य-संस्थांचें नेतृत्व करणाऱ्या कलावंतांकडे संमेलनाचीं सूत्रें क्वचितच आलीं आणि पुढील अध्यक्षांच्या नामावळीकडे पाहिलें म्हणजे हीच गोष्ट वारंवार खटकते की रंगभूमीवरून निवृत्त झालेल्या नटाकडेच हा सन्मान चालत गेला. अभिनयाच्या जोरावर रंगभूमि गाजवीत आहे किंवा स्वतःच्या कर्तबगारीनें एखाद्या नाट्यसंस्थेचा व्याप सांभाळीत आहे अशा 'कार्यकारी' नाट्य-व्यावसायिकाकडे अध्यक्षपद फारसें गेलेलें नाहीं. ही फार मोठी उणीव राहून गेली असें वाटतें.

राहिल्याने मराठी रंगभूमीवरील अनेक घटनांची वस्तुनिष्ठ चिकित्सा अधिकारी व्यक्तींच्याकडून होऊ शकली नाही.

## रंगभूमीबाहेरील प्रतिष्ठित

वरील उणीव सोडली तर संमेलनाच्या अध्यक्षस्थानी महाराष्ट्रातील थोर थोर पुढारी, विद्वान्, संगीताचार्य, रसिकाग्रणी, नामवंत नाटककार आणि नट यांचीच निवड झाली हे आवर्जून सांगितले पाहिजे केवळ इतर क्षेत्रांतील स्थानमाहात्म्य किंवा लक्ष्मीचा वरदहस्त यांच्या जोरावर संमेलनाचे अध्यक्षपद पटकावणारे महाभाग नाट्यसंमेलनात शिरकाव करू शकले नाहीत ही गोष्ट अभिमानास्पद समजली पाहिजे.

## संमेलनाच्या निमंत्रक संस्था

निमंत्रण देणाऱ्या संस्थेवर संमेलनाची सर्व जबाबदारी येऊन पडते व त्यासाठी थोडीफार आर्थिक झीजहि सोसावी लागते संमेलनाच्या प्रारंभीच्या काळात संमेलनाला प्रत्यक्ष उपस्थित राहणे किंवा संमेलन भरवण्याची सर्व जबाबदारी उचलणे या बाबतीत धंदेवाईक नाटकसंस्था थोड्याफार उत्साहाने पुढे येत निदान दरवर्षी एखाद्या नाटकमंडळीच्या गळ्यात संमेलनाचा प्रपंच अडकवून देणे फारसे कठीण गेले नाही परंतु एकदा रंगभूमीची अपकर्षाची अवस्था सुरू झाल्यानंतर, म्हणजे १९३३ पासून व्यावसायिक संस्थांनी संमेलनाकडे संपूर्णपणे पाठ फिरवली.

येथपर्यंतच्या काळातहि महाराष्ट्र ना. मं व बालमोहन सं मं यांनीच प्रत्येकी ३ संमेलनांना हातभार लावला आणि राजापूरकर सं मं व आनंद सं मं यांनी दोन संमेलने पार पाडली त्या संस्थांशिवाय गंधर्व, भारत यशवंत, रंगबोधेच्छु इ व्यावसायिक मंडळ्यांनी केवळ एकेका संमेलनालाच आपला उदार आश्रय दिला होता

या काळातील बलवंत सं मं, ललितकलादर्श, शाहूनगरवासी आदि लोकप्रिय व प्रतिष्ठित नाट्यसंस्थांची, संमेलन व त्याचे कार्य यांच्याशी आपला काही संबंध नाही अशी प्रामाणिक समजूत असावी हौशी नाट्यसंस्थांच्या बाबतीत पुण्याचा नोबल क्लब या संस्थेचे कार्यकर्ते या संम-

लनाच्या बाबतीत फार उत्साही व कष्टाळू दिसत या संस्थेने एकट्या स्वतःच्या बुवतीवर ४ संमेलन भरवली व इतर संस्थांचे साह्य घेऊन आणखी दोन संमेलने साजरी केली

३० व्या संमेलनापासून (१९४० पासून) पुढची सर्व संमेलने हौशी नाट्यसंस्थांच्या नाट्यप्रेमानेच भरत आली या काळातहि व्यावसायिक नाटक मंडळ्या होत्याच त्यांची संख्या थोडी असली तरी त्यांचें अस्तित्व होतंच, इतकेंच नव्हे तर त्यांपैकी काही संस्था विपुल द्रव्यार्जनहि करीत होत्या, परंतु रंगभूमीच्या उत्कर्षाची काळजी वाहणाऱ्या या मध्यवर्ति संस्थेच्या एखाद्या वार्षिक संमेलनाची जबाबदारी पत्करावी असा विचार एकाहि व्यावसायिक नाट्यसंस्थेच्या मनात आला नाही

या काळात संमेलनाची जबाबदारी ज्यांनी पत्करिली व पार पाडली त्या हौशी कलावंतांच्या निमंत्रक संस्थांबद्दलहि थोडेसे स्पष्टपणे लिहिणे अवश्य आहे त्यांनी घेतलेले कष्ट व केलेलें कार्य हें स्तुत्य आहे, परंतु या कार्य-पद्धतीमध्येंहि मध्यवर्ति संस्थेविषयीं जेवढा जिव्हाळा संमेलनप्रसंगी व पुढील वर्षभरात असावयास पाहिजे तेवढा दिसून येत नाही एकदा संमेलनाचे कामकाज तडीस लावलें म्हणजे मग मध्यवर्ति परिषद, तिचे कार्यकर्ते किंवा तिच्यामार्फत केलें जाणारें कार्य याविषयी या संस्थांच्या मनात जी आपुलकी राहणे अवश्य आहे ती दिसून येत नाही

निमंत्रक संस्था संमेलनाला जोडूनच एखादा नाट्यमहोत्सव साजरा करतात आणि संमेलनाचें नाव पुढें करून प्रथितयश कलावंताचें सहकार्य मिळवतात, परंतु अशा नाट्योत्सवातून होणाऱ्या आर्थिक लाभाचें माप फक्त निमंत्रक संस्थांच्याच पदरात पडतें परिषदेच्या नाट्यविषयक कार्याला त्यांचा बहुधा हातभार लागत नाहीं असा अनुभव येतो संमेलनानंतर संस्थेचे कार्यकर्ते नाट्योत्सवातच इतके गुंग होतात की संमेलनाध्यक्षांच्या विधान सूचनांकडे लक्ष देण्यासहि त्यांना फुरसत मिळत नाही. मग इतर नाट्यसेवकांची किती उपेक्षा होत असेल त्याची कल्पनाच केलेली बरी तेव्हा नाट्यसंमेलन ही एक नाट्यसेवा आहे तिची उपासना एकनिष्ठेनें केली पाहिजे इकडे निमंत्रक संस्थांच्या कार्यकर्त्यांनी लक्ष देणे अवश्य आहे पुढील वर्षाचें संमेलन भरेपर्यंत परिषदेकडून जी कार्यें होतील त्यांत

जातात त्याचा वाटा उचलण्याची जबाबदारीहि या हौशी कलावतानी स्वीकारली पाहिजे

## संमेलन व नाटक मडळया

नाटयसमेलनाचे कार्य म्हणजे वास्तविक नाटकमडळयाना अधिक सुख-सोयी उपलब्ध करून देणारें व त्याच्या मार्गातील अडी अडचणी दूर करण्याचे कार्य, परंतु मराठी नाटयसमेलनाच्या जन्मकाळचे ग्रह काही प्रमाणात अशुभदायक असावेत असे वाटते कारण नाटयसमेलनाला विविध कार्य-क्रमाना उपस्थित राहून त्याला सर्वतोपरि साहाय्य देणे हे अवश्य कर्तव्य फार थोडया नाटयसंस्थानी आणि तहि फार क्वचित् प्रसगीच बजावलेले आहे

समेलनाच्या तिसऱ्या अधिवेशनाचा वृत्तात लिहिताना कै वरवे यानी, "आमच्या काही नाटक मडळयानाच या (समेलनात होणारी) प्रकारची चर्चा मान्य नाही" असे उद्गार काढले होते नाटक मडळयानी समेलनापासून कोणत्या अपेक्षा केल्या होत्या त्याचीहि एक यादी श्री वरवे यानी दिली होती त्यावरून असे वाटते की समेलनाने नाटक मडळयाना सर्व तऱ्हेचा सल्ला द्यावा व धद्याच्या सोयी-गैरसोयीचा विचार करावा अशी त्याची इच्छा होती मात्र यासाठी नाटकमडळयानी आपला जो वाटा उचलणे आवश्यक होते त्याकड मात्र त्यानी सोयीस्करपणे दुर्लक्ष केले

नाटयसमेलनाला नाटक मडळया येत नाहीत स्वसुधारणा करून घेण्याची नटवर्गाची तयारी नाही इ तक्रारीचा उच्चार पाचव्या समेलनात बहुतेक वक्त्यानी केला त्याला उद्देशून 'रगभूमि'कारानीं पुढील भाष्य केले आहे—"नाटक मडळया समेलनाला येत नाहीत ! तुम्ही खटपट करा उपाय-धनुष्याच्या साह्यान त्याना येणें भाग पाडा ! ह जर तुम्हा विद्वानाना साधत नाही तर तुमच्यात आणि आम्हां नटात काय फरक आह ? मग तुमची विद्या कोठें राहिली ?" इ ऽ म्हणजे नाटकमडळयाना समेलनाला उपस्थित ठेवण्याचेहि कार्य विद्वानानाच करायला हव होते अशी नाटयव्यावसायिकाची अपेक्षा होती ! परतु पुढें श्री मुजुमदार याना नाटकमडळयाच्या उदासीनतेची व पराङ्मुखतेची खात्री पटली व ते त्याना उद्देशून लिहू लागल या सबधी दरवर्षीच्या समेलनअहवालात त्यानी व इतरानी एक ठराविक तक्रार केल्ली

"धंदा करणारांपेक्षा बाहेरचे लोकच नाट्यकलेच्या सुधारणासंबंधी विचार व मनन करीत आहेत."

(८ वें संमेलन, श्री. गुरुजी यांची टीका)

"संघशक्तीनें वागण्याचें वाळकडू नाटकमंडळ्यांना नसल्याने चिटणीसानी प्रयत्न करून त्यांची उपेक्षावृत्ति घालविली पाहिजे."

(९ वे समेलन, श्री. छापखाने यांचें भाषण)

"संमेलनकार्यात नटवर्गानें फारसा भाग घेतला नाही हें विषादजनक आहे. समाजांतील विद्वान व इतर लोक आपलें कर्तव्य पार पाडीत आहेत, पण नटवर्गानें स्वतः कांहीं केलेलें नाही."

(१२ वें संमेलन, श्री. मुजुमदार यांचे अध्यक्षीय भाषण)

"नाटक मंडळ्यांच्या उपेक्षावृत्तीमुळें १४ वर्षे संमेलनात ऊहापोह होऊनहि पालथ्या घड्यावर पाणी अशीच स्थिति झाली आहे."

('रंगभूमि'–१३ व्या समेलनाचा वृत्तांत)

नंतरच्या पिढीतील जबाबदार व्यक्तींनी अशाच प्रकारचे अभिप्राय व्यक्त केलेले आहेत. श्री. गोविंदराव टेंबे लिहितात,[१] "कै. बरवे याच्या आटोकाट प्रयत्नामुळें ही संमेलनसंस्था अस्तित्वात आली. पहिली १०।५ संमेलनें मोठ्या उत्साहानें भरली... परंतु पुढें पुढें मात्र नाटकमंडळींच्याच उपेक्षेमुळें त्यातील उत्साह कमी कमी होत चालला. नाटकमंडळ्यातील बहुतेक व्यक्ती इतक्या अशिक्षित व कोत्या कल्पनेच्या असत की आपल्या हिताकरिता एखादी संघटना घडवून आणली असली तरी तिच्याशी समरस होणें दूरच पण तिच्याकडे सहानुभूतीनें पाहण्याचीसुद्धां त्यांना बुद्धि होत नसे... कै. बरवे यांच्या व नाटकधंद्याबाहेरच्या नाट्यप्रेमी मंडळीच्या प्रयत्नामुळें संमेलनात खंड पडला नाही; पण हें पुण्य नाटकमंडळींचें खास नव्हे."

या संस्थेविषयी श्री. केशवराव दाते म्हणाले,[२] "या संघटनेची कालानुसार पडझड झाली जुन्या लोकांनी निर्मी करायला पाहिजे होती तेवढी जपणूक केली नाही. परंतु ते लोक सागूनसवरून अडाणी, अशिक्षित. आता तसें नाही."

१. माझा जीवनविहार, पृ. ३२५. २. 'नाटक,' फेब्रुवारी १९६०.

श्री चिंतामणराव कोल्हटकरांनीहि अशाच स्वरूपाचें मत प्रकट केलें आहे. ते म्हणतात,[१] "अजूनपर्यंत परिषदेच्या परिसरात येणाऱ्या होती ती जास्त करून नाट्यव्यवसायाशी दूरान्वयानें संबंध असणाऱ्या विद्वानांची आणि हौशी चळवळ्यांची . . . कुठल्याहि चौकटीत, संघटनेंत सुखानें स्वतःला बसवून घेण्याची नाट्य-कलावंतांची स्वभावतःच प्रवृत्ति नसल्यामुळें व्यावसायिक कलावंतांनीहि आजपर्यंत परिषदेच्या कार्यांत विशेष जिव्हाळ्यानें रस घेतला नाही."

४२ व्या संमेलनाचे अध्यक्ष श्री. व. शां. देसाई म्हणतात, " . . . परिस्थिति मात्र अशी आहे की, नाट्यकलेवर ज्यांचा चरितार्थ अवलंबून असतो अशा नाट्यव्यावसायिकांनीं या संस्थेच्या सुरवातीपासून तिच्या कार्यांत फारसा भाग घेतलेला नाही."

या वेगवेगळ्या विचारवंतांच्या उद्गारांचेच पडसाद इतर संमेलनाध्यक्षांच्या भाषणांतून अधूनमधून उमटलेले आहेत. पुणें येथें भरलेल्या २४ व्या संमेलनाच्या वेळीं वृत्तपत्रांत अशी जाहीर विचारणा झाली की ही संमेलनें कुणासाठीं भरतात? नाटक मंडळ्यांना उपस्थित राहण्याइतकीहि त्या विषयीं आस्था नसेल तर इतरांनीं व्यर्थ खटाटोप कां करावा? बेळगावपासून या संस्थेच्या कार्याचा व्याप अनेक प्रकारांनी पसरूं लागला, तरी अद्यापीहि परिषदेच्या नित्याच्या कार्यांचा कांही वाटा उचलणें, निदान कर्तव्यभावनेनें *संमेलनाला उपस्थित राहून त्यांत यथाशक्ति भाग घेणें या गोष्टीकडे* व्यावसायिकांचें तर दुर्लक्ष होत आहेच, परंतु सुशिक्षित व विचारी समजले जाणारे हौशी नाट्यसंस्थांचे अग्रणीहि संमेलनांत किंवा परिषदेच्या कार्यांत फारसा रस घेतांना दिसत नाहीत. अर्थात् याला कांहीं अपवाद आहेत पण ते हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेच."

## नाट्यसंस्थांचें आर्थिक साहाय्य

### एका खेळाची मागणी

*संमेलनाच्या विविध प्रकारच्या कार्यासाठीं लागणारा पैसा पुरविण्याची* जबाबदारी नाटक मंडळ्यांचीच मुख्यतः होती आणि या दृष्टीनें पहिल्याच संमेलनांत 'प्रत्येक नाटक मंडळीनें दरवर्षी आपल्या एका खेळाचें उत्पन्न

१ मौज, २८ डिसेंबर १९५८

भारत नाटय समाजाला द्यावें' असा ठराव मंजूर करण्यात आला होता. परंतु या ठरावानुसार, एकटया राजापूरकर मंडळीने दिलेले १५० रु. सोडले तर कोणत्याहि नाटयसंस्थेनें आपल्या खेळाचें उत्पन्न समाजाला दिलें नाहीं. म्हणून श्री. वरवे यांनीं १९०७ मध्यें आपल्या 'नाटयकला' पाक्षिकात पुन्हा विनंती केली. पुढें नाटक मंडळयानी थोडेंफार साहाय्य दिले असावें असें समाजाचे चिटणीस श्री. मुजुमदार यांच्या एका मुलाखतीवरून वाटतें. या मुलाखतीत त्यानी नाटक मंडळयांच्या साहाय्याचा पुढीलप्रमाणें तपशील दिलेला आहे.[1]

| नाटक मंडळी | प्रयोगांची संख्या | उत्पन्न रु. आ. |
|---|---|---|
| राजापूरकर ना. मं. | १ | १५१—०० |
| नाटयकला प्र. स. मं. | २ | २०८—४ |
| किर्लोस्कर सं. मं. | १ | २०१—०० |
| महाराष्ट्र ना. मं. | १ | २६—०० |
| पाटणकर सं. ना. मं. | १ | १२५—०० |
| वेळगांवकर स्त्री सं. मं. | — | १०५—०० |

यावरून नाटकमंडळयांच्या हातून भारत नाटय समाजाच्या कार्यास हातभार लागण्यास प्रारंभ झाला होता असे दिसतें. पुढे १० व्या संमेलनांत श्री. वरवे यांनी आपल्या अहवालात, 'समाजाच्या कार्याला हळुहळू सर्व प्रमुख नाटक मंडळया वर्गणीच्या रूपाने मदत करीत आहेत' असें नमूद केलें होतें.

परंतु हें औदार्य लवकरच संपुष्टांत आलें असें दिसतें. पुन्हा 'नाटक मंडळया जरूर ते साहाय्य देत नाहीत' असे सूर संमेलनात उमटू लागलेले दिसतात. कर्तव्याबरोबर नाटक मंडळ्यांची कृतज्ञताबुद्धिहि लोपली होती. भा. ना. समाजाचे संवर्धक श्री वरवे यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या कुटुंबीयांना मदत म्हणून एका खेळाचें उत्पन्न देण्याचें आवाहन करूनहि ते निष्फळ झालें! २० व्या संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री. बोडस यांनी तर आपल्या भाषणांतच 'यशवंत मंडळीनें कबूल करूनहि आर्थिक मदत दिली नाही' अशी तक्रार केली. तेव्हां

१. रंगभूमि, वर्ष ५, अंक ३.

महाराष्ट्र व विदर्भ या मंडळयांनी प्रत्यक्षी एका मळाच उत्पन्न देण्याचे मान्य केले (त्याप्रमाणे त्याना केंद्र किंवा नाहा याचा खुलासा मिळाला नाही)

## एक रुपयाची मागणी

नाट्य मंडळचा चांगल पैसे मिळवीत होत्या तेव्हाची ही स्थिति, मग विपन्नावस्थेत त्याच्याकडून मदत मिळणे संभवनायच नव्हते अशा स्थितीत ममलन-मस्यची आर्थिक बाजू सावरण्यासाठी बळगाव संमेलनात एक नवीन कल्पना काढण्यात आली व्यावसायिक आणि हौशी नाटयसंस्थानी आपल्या संस्थमार्फत केल्या जाणाऱ्या प्रत्येक नाटयप्रयोगामागे १ रुपया नाटयपरिषदेस द्यावा असे कळकळीचे आवाहन यावेळी करण्यात आले समेलनाध्यक्ष आचार्य अत्रे याना धार्मिक भावनेने सर्वांना या मागणीकडे पहावे अशीही विनंती केली परंतु परिषदेसारख्या प्रातिनिधिक संस्थेला एक रुपया देणे हे जरा कमीपणाचे दिसत असा पोक्त विचाराने बहुतेक सर्व नाटयसंस्थानी परिषदेच्या या मागणीकडे दुर्लक्ष केले परिषद आणि तिचे अध्यक्ष याच्या यतीने वारंवार निघणाऱ्या पत्रकाचा किंवा भाषणाचा क्वचित् उपयोग झाला असेल

## काही आशादायक तंतु

प्रयोगामागे १ रुपया देण्याची मागणी वाया गेली असली असली तरी काही हौशी व व्यावसायिक नाटयसंस्थानी गेल्या २।३ वर्षांत परिषदेची बाजू बळकट करण्यास प्रारंभ केला आहे हा घटना परिषदेच्या भावी वाटचालीच्या दृष्टीने थोडीफार आशा निर्माण करणारी आहे १९५८ व १९५९ या दोन वर्षांत श्री आत्माराम भेंड याचे नाटक थिएटर श्री पद्माकराची रजितकलादर्श मुंबई मराठी साहित्य संघ या संस्थानी आपली काही लोकप्रिय नाटके सादर केली व त्याचे उत्पन्न परिषदेला देऊन तिच्या दैनंदिन वाटचालीच्या खर्चाची सोय केली

## संमेलन व सरकार

मराठी नाटयकला ही सर्वस्वी लोकाश्रयावर चालली असल्याने सरकार कडून तिने विशेष साहाय्याची अपेक्षा केली नाही आणि परकीय सरकारने

ती फारशी दिलीहि नसती. परंतु मदत दिली नाही तरी निदान अडथळे आणूं नयेत एवढ्या हेतूने संमेलनाचा प्रारंभी सरकारशीं संबंध आला.

पहिल्या ७ संमेलनापर्यंत ह्या बाबतींत कांहींहि हालचाल झाली नाहीं. संमेलन भरण्यास प्रारंभ होऊन 'गेल्या ७ संमेलनांत मिळून सरकारांत अद्याप एकहि अर्ज गेला नाही असे वाटतें' असे उद्‌गार संमेलनाचे एक चिटणीस श्री. मुजुमदार यांनीं एका मुलाखतींत काढलेले आहेत. परंतु त्याच वेळी, "आतां अर्ज, डेप्युटेशन वगैरे पाठवून कांही प्रश्न निकाल करण्यासारखे आहेत." असेंहि त्यानी उत्तर दिलें. यावेळेपासून (म्हणजे १९११ पासून) भारत नाटयसमाजाचे कार्यकर्ते याबाबतीत विचार करूं लागले होते असें दिसतें. ९ व्या संमेलनात तर 'आक्षेपार्ह नाटकांसंबंधी सरकारशी पत्रव्यवहार सुरू केल्याचें' चिटणीसांनीं अहवालातच नमूद केलें होतें. जप्त नाटकाप्रमाणेंच थिएटरसंबंधीच्या कायद्यात सुधारणा करणें, नाटयप्रयोगाच्या परवान्यासंबंधींचे अडथळे दूर करणें, नाटकांच्या वेळेवरील बंधनें काढून टाकणें इ. अडचणी-विषयीं संमेलनातून वेळोवेळी चर्चा होऊन सरकारला त्यासंबंधांत योग्य ती उपाययोजना करण्याची विनती करण्यात आली. या सर्वांपेक्षां तापदायक, किंबहुना नाटकधंद्याला मारक असणारा जो एक कर सरकारनें १९२३ मध्यें सुरू केला आणि त्याचें प्रमाण ३ टक्क्यांवरून ३३ टक्क्यांपर्यंत वाढवीत नेलें त्या करमणूक-कराविरुद्ध संमेलनांत १९२३ पासून अखंडपणें ठराव मंजूर होत आले आहेत.

## करमणूक-कर

नाटयव्यवसायाच्या भरभराटीच्या काळांत हा कर उपेक्षणीय किंवा सुसह्य वाटला तरी त्यासंबंधीची नापसती आणि तो सरकारनें रद्द करावा अशी मागणी लवकरच सुरू झाली. या कराची माफी मिळवा अशा स्वरूपाचा एक निबंध १९२२ मध्यें भरलेल्या १८ व्या नाटयसंमेलनांतच श्री. बळवंतराव बाघ यांनी वाचला आणि त्यानंतरच्या प्रत्येक संमेलनांत हा कर रद्द करावा, निदान कमी करावा अशा प्रकारची मागणी सतत चालू ठेवण्यात आली. करमणूक-कराचा हिस्सा कापून गेल्यानंतर उरलेल्या उत्पन्नांत नाटक मंडळ्यांना आपला अवाढव्य खर्च चालविणें दिवसेंदिवस अशक्य होत चालले आणि म्हणून नाटय-

व्यवसाय जिवत राहण्यासाठी हा कर रद्द होणे अत्यावश्यक आहे अशी निकराची विनती प्रत्यक समेलनाध्यक्षाच्या भाषणात होऊ लागली

यावावतीत प्रत्यक्ष सरकारी अधिकाऱ्याना भेटून खटपट करण्यासाठी २९ व्या पुणे यथील समेलनात वरेरकर आळतेकर काकासाहेव लिमय प्रभृतीचे एक शिष्टमडळ पाठविण्याचा ठराव समत करण्यात आला त्यानतर १९४६ मध्ये भरलेल्या नगर यथील समेलनानतर अध्यक्ष श्री चितामणराव वोल्हटकर यानी गृहमत्री श्री देसाई याची भट घेऊन करमणूक करामुळे नामशष होऊ लागलेल्या नाटयव्यवसायाची त्याना कल्पना दिली त्यावळी 'लोकशिक्षणाच्या दृष्टीन योग्य अशा नाटकावरील कर माफ करण्याच आश्वासन मिळून त्याप्रमाणे काही नाटके करमुक्तहि झाली

परतु सरकारच्या लहरीला मान्य होईल त्या नाटकाना आणि मर्जी लागेल तेव्हा कर माफ करण्याच्या विचित्र धोरणाने फारसा फायदा होण्यासारखा नव्हता म्हणून पुन्हा पुन्हा ठराव विनत्या अज इ मार्गांनी सपूर्ण करमाफीची मागणीहि चालू ठवण्यात आली इतर व्यक्ति व नाटयसस्थानीहि यावामी सहकाय दिलें आणि त्या सर्वांचा परिणाम म्हणून १९५६ मध्यें हौशी नाटय सस्थाच्या नाटयप्रयोगावरील कर रद्द करण्यात आला

परतु रगभूमीच्या उत्कर्षाची मुख्य धुरा वाहणाऱ्या व्यावसायिकाना ही सवलत नसल्यान परिषदेच्या वतीने शिक्षणखात्याच्या उपमत्री सौ निर्मला राज भोसले समाजकल्याण खात्याचे मत्री श्री नासिकराव तिरपुडे व मुख्य मत्री श्री यशवतराव चव्हाण याच्याकड शिष्टमडळें नऊन ही मागणी पुन्हा पुन्हा त्याच्या कानावर घालण्यात आली अखरीस मुबई सरकारन मार्च १९५८मध्यें मराठी रगभूमीला जिझिया करा प्रमाणे सलणारा करमणूक कर रद्द केल्याची घोषणा केली ! या आनदाप्रीत्यय परिषदेतर्फे सवत्र 'करमुक्ति दिन' पाळण्यात यऊन सरकारचे आभार मानण्यात आले

## नाटयगृहाची मागणी

वोलपटाच्या युगापासून नाटयकलेची पीछहाट तर होऊ लागलीच परतु तिचा मादता परहि बोलपटाना बळकावली व तिला निर्वासित करून सोडले १९३५ पासून नाटयगृहाची चणचण वाढत्या प्रमाणावर भासू लागली आणि

नाटचसमेलनांत नगरपालिकांनीं केवळ नाटकासाठी म्हणून वंदिस्त नाटचगृहें बांधावीत व ती माफक भाड्यानें नाटकमंडळ्यांना द्यावीत असा ठराव प्रत्येक संमेलनांत मंजूर झाला. परंतु कोणत्याहि लहानसहान मुद्यावरहि अनेक पक्ष निर्माण होणाऱ्या नगरपालिकात नाटचगृहांबाबत मात्र अगदी सर्वत्र ऐकमत्य होऊन महाराष्ट्रातील एकाहि नगरपालिकेनें वदिस्त नाटचगृहाची उभारणी केली नाही. तेव्हा याबाबतींत नगरपालिकांचा नाद सोडून प्रत्यक्ष सरकारनेच ही अडचण दूर करावी अशी मागणी नतरच्या संमेलनांतून होऊं लागली.

१९४६ मध्यें श्री. चितामणराव कोल्हटकर याच्या नेतृत्वाखालीं संमेलनाच्या शिष्टमडळानें मुंबई राज्याच्या गृहमंत्र्याची भेट घेऊन नाटचगृहाच्या आवश्यकतेसंबधी आपलें एक निवेदन त्याना सादर केले. तेव्हांपासून परिषदेच्या यतीनें शिक्षणखात्याच्या *उपमंत्री*, *समाजकल्याणखात्याचे मंत्री*, खुद्द मुख्य मंत्री याच्या अनेकवार मुलाखती घेऊन सरकारनें नाटचगृहांची अडचण दूर करावी अशी विनती करण्यांत आली. सरकारनें या मागणीकडे प्रथम दुर्लक्ष केलें, नतर नकार दिला; नंतर अनेक अडचणी पुढें माडल्या, नंतर नगरपालिकांना कांही साहाय्य देऊन नाटकाना ६ महिने निरुपयोगी असणारी उघडी नाटचगृहें बाधण्याचा उतावळेपणा केला आणि आतां महाराष्ट्रातल्या काही प्रमुख शहरात वंदिस्त नाटचगृहे बांधणें अत्यंत निकडीचें आहे याची जाणीव सरकारला झाली आहे. १९५६ पासून आतांपावेतों परिषदेनें हा प्रश्न पुनः पुन. सरकारपुढें उपस्थित करून सरकारचें मन वळविण्यांत काही प्रमाणात तरी यश मिळविलें आहे असें म्हणता येईल.

कोल्हापूरच्या पॅलेस थिएटरसबधी परिषदेने एक स्पृहणीय यश मिळविलें आहे. तें नाटचगृह बोलपटाना देण्यात येणार अशी जाहिरात प्रकट झाल्याबरोबर संमेलनाच्या एका शिष्टमडळानें कोल्हापूरच्या प्रशासकांची भेट घेऊन पॅलेस थिएटर केवळ नाटकासाठीच राखून ठेवावें अशी मागणी केली व त्याला रुकार मिळून आज तें 'केशवराव भोसले नाटचगृह' म्हणून नाटकमंडळ्यांचें एक आश्रयस्थान झालें आहे.

## आर्थिक साहाय्याची अपेक्षा

करमणूक-करातून माफी, सुसज्ज बद नाटयगृहाची उभारणी आणि परवाने, वेळेची बधने इ. बाबतीतील सवलती याविषयी समेलनाने सरकारला वेळोवेळी निवेदने केली या निवेदनातून रगभूमीच्या विकासात उत्पन्न झालेले हे अडथळे दूर व्हावेत एवढीच मर्यादित कल्पना होती. यापेक्षा सरकारकडून अधिक साहाय्याची अपेक्षा पूर्वीच्या समेलनातून व्यक्त झालेली नाही परतु स्वातत्र्य-प्राप्तीनतर साहजिकच काही अपेक्षा निर्माण झाल्या 'रगभूमि ही लोककला आहे, त लोकशिक्षणाचे एक महत्त्वाचे साधन आहे आणि म्हणून मराठी रगभूमि जगविण्याची आणि तिचा उत्कर्ष कसा होईल याची चिंता वाहण्याची जबाबदारी काही प्रमाणात आपल्या लोकशाही सरकारने पत्करिली पाहिजे' अशी विचारसरणी १९५० पासून समेलनाध्यक्षाच्या भाषणातून प्रकट होऊ लागली १९३५ नतर जमीनदोस्त झालेला मराठी नाटयव्यवसाय पुन मजबूत पायावर स्थिरपणाने उभा राहण्यासाठी आणि वर्धिष्णु होण्यासाठी सरकारने त्याला जरूर ती आर्थिक मदत द्यावी असे विचार श्री आळतेकर, श्री कोल्हटकर, श्री व शा देसाई इ अध्यक्षानी आपापल्या भाषणातून माडले सोलापूरच्या समेलनात तर श्री बाबुराव पेंढारकरानी रगभूमीच्या विकासाची एक पचवार्षिक योजनाच सादर केली आणि तिच्यासाठी सरकारने व्यावसायिक नाटयसस्याना मदत द्यावी अशी विनती केली

स्वातत्र्यप्राप्ति होऊन अनेक वर्षे झाली तरी सरकारने या बाबतीत आवश्यक व योग्य अशी पावले टाकली नव्हती १९५६ पासून मात्र सरकारने या बाबतींत सहानुभूतीचे व सहकार्याचे धोरण स्वीकारण्यास प्रारभ केला १९५८ मध्यें भरलेल्या सातारा समेलनाला प्रथम ५०० रु देणगी मिळून सरकारी अनुदान मिळण्याची सुरवात झाली पुढील हैदराबाद समेलनाला १००० व बडोदासमेलनात सरकारनें नाटयपरिषदेला ५००० रु चे वार्षिक अनुदान म्हणून मजूर केले आगामी दिल्ली अधिवेशनालाहि सरकारने १३००० रु. चे घसघशीत साहाय्य दिले आहे या चढत्या आकडेवारीवरून परिषदेची व एकदर नाटयव्यवसायाची आर्थिक बाजू सावरण्यास सरकार सिद्ध आहे याची प्रतीति आता येऊ लागली आहे

## प्रातिनिधिकत्वाचा दावा

वेळगांव संमेलनांत संमेलनसंस्थेचें रूपांतर परिषदेंत झाल्यापासून परिषद ही सर्व नाटयसंस्थांची एक संयुक्त आघाडी म्हणून तयार व्हावी व जनता आणि सरकार यांनी तिला मान्यता द्यावी अशी आकांक्षा परिषदेच्या कार्यकर्त्यांनी मनाशी बाळगिली होती. रंगभूमिविषयक सर्व गाऱ्हाणीं एकमुखानें मांडावीत एवढ्यापुरतीच परिषद कार्यकारी न राहता नाटयविषयक प्रत्येक कामांत परिषद ही सर्व हौशी-व्यावसायिकांची एक प्रातिनिधिक संस्था म्हणून सरकार-दरबारातहि मान्य व्हावी असा परिषदेचा प्रयत्न होता. उघडीं नाटयगृहें, हौशी नटांच्या नाटयस्पर्धा, हौशी नटांना करमाफी, निवृत्त व विपन्नावस्थेंत असणाऱ्या कलावंतांना मदत इ. अनेक प्रकारांनी मुंबईसरकारनें रंगभूमिविषयक कार्याला साहाय्य देण्याचें ठरविलें होते. या सरकारी प्रयत्नांत अनेक उणीवा होत्या. हे सर्व सरकारी प्रयत्न खरोखरी कारणी लागावेत आणि सरकारतर्फे खर्च होणाऱ्या पैशाचा जास्तीत जास्त उपयोग व्हावा यासाठीं सरकारनें नाटयपरिषदेच्या ज्येष्ठ कार्यकर्त्यांचा सल्ला घ्यावा अशा प्रकारचें निवेदन श्री तिरपुडे, श्री. चव्हाण इ. मंत्रिमहाशयांना वारंवार करण्यात आलें. किंबहुना नाटयविषयक धोरण ठरवितांना नाटयपरिषदेबरोबर विचार विनिमय व्हावा अशी अपेक्षा परिषदेने केलेली आहे. त्या दृष्टीनें सरकारी नाटयस्पर्धा परिषदेनें भरवाव्यात अशी मागणी करण्यात आली होती. तथापि मध्यंतरी परिषदेला या बाबतीत नकार मिळाला आहे. नाटयस्पर्धेची पहिली फेरी परिषदेनें घ्यावी ही एकदां मान्य केलेली मागणीहि सरकारने यंदा फेटाळली. तथापि परिषदेचें स्थान थोड्या प्रमाणात सरकारने मान्य केलेलें आहे. स्पर्धांसाठी परीक्षक ठरविणे, नट-नाटककारांना पारितोषिकें देणें, कलावंताना साहाय्य देणे इ. बाबतीत परिषदेचा सल्ला घेण्याचें आश्वासन सरकारमार्फत मिळालें आहे महाराष्ट्र राज्याची निर्मिति झाल्यानंतर महाराष्ट्रीय कलामध्यें अग्रगण्य असलेल्या नाटयकलेची जोपासना करण्यासाठी महाराष्ट्र राज्यसरकार आता नाटयपरिषदेच्या मताना अग्रहक्क देईल अशी *यापुढे आशा करण्यास हरकत नाहीं.*

परिषदेच्या कार्याला सरकारनें जरूर तें साहाय्य करावें अशी मागणी

करतांनाहि सरकारनें परिषदेकडून नाटचविषयक कार्यहि करवून घ्यावें, म्हणजेच नाटचविषयक विविध कार्यक्रमाची जबाबदारी परिषदेसारख्या संघटनेकडे सोंपवावी ही अपेक्षा आहे. गेल्या कांही वर्षांतील सरकारचें नाटच-विषयक कार्य पाहिलें तर सरकार स्वतःच सगळचा उपक्रमाची मक्तेदारी आपल्याकडेच घेण्याच्या दिशेनें पावलें टाकीत आहे की काय असा भास होऊं लागला आहे. यासंबंधी परिषद व सरकार या दोघांनीहि आपली कार्यक्षेत्रें स्पष्टपणें आखून घेणें व दुसऱ्याच्या क्षेत्रांत ढवळाढवळ न करणें हें रंग-भूमीच्या विकासाच्या दृष्टीनें अत्यंत अवश्य आहे. हौशी नाटचस्पर्धा भरविणें, व्यावसायिकांचे 'सुविहित' प्रयोग करविणें, शिक्षकासाठी नाटचशिबिरांची योजना करणे, इतकेंच नव्हे तर नाटचासंबंधी परिसंवाद ठेवणे असे सर्वच कार्यक्रम सरकारी यंत्रणेमार्फत होऊं लागले तर परिषदेचें कार्य सरकारनेंच सर्वस्वी आपल्याकडे घेतलें आहे असें मानावें लागेल. या बाबतीत सरकारनें परिषदेला विश्वासांत घेऊन यापैकीं काहीं भाग परिषदेच्या मार्फत घडवून आणणें इष्ट होईल. एकाच वेळी सरकार आणि परिषद् यांच्या योजना कार्य-वाहीत होऊं लागल्या तर सरकारी योजनेकडेच नाटचक्षेत्रांतील बरीचशी मडळी वळतील व परिषदेची उपेक्षा करतील हे उघड आहे. तेव्हा सरकारनें नाटचविषयक कार्याला प्रोत्साहन देणें हे उचित ठरेल; परंतु त्याची सर्व कार्यवाही करण्याचें कामहि सरकारी यंत्रणेमार्फत होऊ देणें हे अनेक गुतागुंतीचे प्रश्न उपस्थित करील असें वाटतें. या दृष्टीनें योग्य वेळीच विचार होणें इष्ट आहे.

## नाट्याभ्यासाची चाचणी

### निबंध स्पर्धा

रंगभूमीचा प्रेक्षकवर्गहि जाणता व्हावा आणि त्यातून विद्वान नाट्य-समीक्षक तयार व्हावेत या हेतूने तिसऱ्या संमेलनापासून निबंधस्पर्धेला सुरुवात झाली मात्र ही निबंधस्पर्धा घेण्यात प्रामुख्याने निरनिराळ्या नाटक मंडळ्यांचा मोठा वाटा होता त्यांच्यामार्फत बक्षिसासाठी काही रक्कम खर्च केली जाई समाजानेहि काही निबंधस्पर्धा ठेवल्या होत्या आतापर्यंत संमेलनाच्या इतिहासात १२ निबंधस्पर्धा झाल्याचे उल्लेख मिळतात [१]

### लेखी परीक्षा

नाट्यवाङ्मयाचा सांगोपांग अभ्यास व्हावा या उद्देशाने संमेलनात लेखी परीक्षा घेण्याची एक प्रथा काही वर्षे चालू होती या परीक्षांतून शारदा, सौभद्र, वेणीसंहार, मृच्छकटिक, शाकुंतल, हॅम्लेट अशा उत्कृष्ट नाटकांवर एक प्रश्नपत्रिका तयार करवून घेऊन त्यांत यशस्वी होणाऱ्या उमेदवारांना पारितोषिके मिळत हा स्तुत्य उपक्रम अगदी प्रारंभीच्या एक दोन दशकांनंतर बंद पडला अशा परीक्षांतील दोन प्रश्नपत्रिकांचे नमुने पुढे दिले आहेत [२] या प्रश्नपत्रिका काळजीपूर्वक वाचल्या म्हणजे नाटकाची परीक्षा केवळ साहित्यगुणाच्या दृष्टीने न घेता त्यांत प्रायोगिक ज्ञानाच्या दृष्टीनेहि उमेदवाराची कसोटी पाहिली जाई ही गोष्ट मुद्दाम लक्षात ठेवली पाहिजे रंगभूमीवरील पात्रांची स्थानं त्यांनी प्रसंगानुसार करावयाचे नाटकांतील भिन्न भिन्न पोषाख, अभिनयाचे विविध नमुने यासारख्या प्रायोगिक गोष्टींसंबंधी या प्रश्नपत्रिकांतून काही प्रश्न योजले जात असत

### अभिनय परीक्षा

आणण्याचेहि प्रयत्न झालेले आढळतात. एका विशिष्ट रसांतील स्वगत भाषण १५।२० मिनिटेंपर्यंत अभिनीत करून दाखवावयाचें किंवा केवळ दिलेल्या काल्पनिक प्रसंगाचें यथार्थ आविष्करण करावयाचें अशा स्वरूपाचे कांही प्रकार निर्माण करून या अभिनयपरिक्षेत वैचित्र्य आणल्याचेंहि दिसते.

नाटयवाचन हा एक नवा नाटयाविष्कार सध्यां अधूनमधून ऐकण्यात येतो. परंतु नाटयभक्तांना हा प्रकार फार जुना आहे. एकाच व्यक्तीनें नाटकांतील विविध पात्रांचे संवाद साभिनय म्हणून दाखविल्याची काही उदाहरणें समेलनांत सांपडतात.

## निबंधवाचन

आजच्या नाटयपरिषदेनें ज्या नाटयविषयक अभ्यासक्षेत्राचा आवर्जून पुरस्कार करावयास पाहिजे त्यांपैकी निबंधवाचन हें एक महत्त्वाचें अभ्यासक्षेत्र आहे. मराठी रंगभूमीच्या सुदैवाने नाटयसंमेलनाच्या अगदी पहिल्या अधिवेशनापासून निबंधवाचनाचे दालन खुले झालेले आढळतें. 'नाटय' या विषयाची अनेक वाङमयीन आणि प्रायोगिक दृष्टिकोणातून चर्चा करण्यांत महाराष्ट्रातील प्रथितयश अशा साहित्यकानीं भाग घेतलेला आहे. हरिभाऊ आपटे, वा. गो. आपटे, ना. के. बेहेरे, डॉ. न. का घारपुरे, श्री, द. रा. गोमकाळे, यांच्यासारखे मान्यवर साहित्यिक आणि श्री. दां. वा. मुजुमदार, श्री. व्यं. व. पेंडारकर, श्री. पु. श्री. काळे, मा. कृष्णराव, प. पलुस्कर आदि नामवंत कलाकार यांनी या निबंधाच्या दरबारांत आपली हजेरी लावलेली आहे. समेलनांत वाचल्या गेलेल्या निबंधांची यादी[1] पाहिली म्हणजे नाटय व रंगभूमि यांच्या अंगोपांगासंबंधी किती बारीकसारीक विषयाची चर्चा झालेली आहे याचें कौतुक वाटल्याशिवाय राहात नाही.

१९ व्या समेलनापर्यंत हे निबंधवाचन अत्यंत नियमितपणे चालू होतें. वर उल्लेखिलेल्या नावाशिवाय श्री आ. वि कुलकर्णी, श्री. य. ह. पंडित, श्री. वि. गो. शेटये, इ. अनेक अभ्यासकांची मांदियाळ होते. परंतु त्यानंतर मात्र निबंधवाचनाचा हा अभ्यासपूर्ण प्रांत उपेक्षिलेला दृष्टीस पडतो. ३० व्या संमेलनात या अभ्यासपद्धतीमध्यें पुन: थोडें चैतन्य आल्यासारखें दिसतें न

१. परिशिष्ट ४ पॅ.

दिसते तोच ती लुप्त झाल्यासारखी वाटते आजवरच्या ४२ संमेलनातून ४० वर निबंध वाचले गेले आहेत, त्यापैकी बहुतेक पहिल्या पूर्वार्धातील आहेत पुढे मात्र ही परंपरा बहुतेक खंडित झाली आणि परिश्रमपूर्वक निबंधलेखनाऐवजी उत्स्फूर्त भाषणाची आणि परिसंवादाची नवी परंपरा सुरू झाली

## संमेलनातील विचारमंथन

संमेलनाचे स्वागताध्यक्ष, उद्घाटक व अध्यक्ष यांची भाषणे, निबंधात व्यक्त झालेले विचार, परिसंवादातील चर्चा आणि उपस्थित विद्वानांचे मतप्रदर्शन या सर्वांतून नाट्याचा आणि त्यातहि विशेषत मराठी नाट्याचा इतक्या भिन्न भिन्न दृष्टिकोणातून परामर्श घेतलेला आहे की त्याचे संक्षेपाने दर्शन घडविणे हेहि अशक्यप्राय आहे आणि संमेलनाचा इतिहास सांगताना या सर्वांचा थोडाफार मागोवा दिल्लाच असल्याने काही ठळक बाबींसंबंधी प्रारंभापासून आजपर्यंत जे जे विचारांचे उलट-सुलट प्रवाह दृष्टीस पडले त्यांची सूत्ररूपाने ओळख करून देण्याचा प्रयत्न केला आहे

## रंगभूमि आणि संगीत

मराठी रंगभूमीचा वैभवकाल हा प्रामुख्याने संगीतप्रधान नाटकांनीच बहरलेला आहे हे मान्य केले पाहिजे अभिनयकुशल कलावंतांबद्दल आदर-भाव असला तरी सामान्य रसिकापासून चिकित्सक टीकाकारापर्यंत सर्वांच्या मनावर अधिकार गाजवणाऱ्या नादब्रह्माची मोहिनी हीच प्रभावी ठरली हे संगीत नटांना मिळालेल्या लोकप्रियतेवरून सहज दिसून येते कै अण्णासाहेब किर्लोस्करांनी निर्माण केलेली संगीत नाटकांची आवड पुढे प्रत्यही वाढत गेली नंतरच्या नाटककारांनी आपापल्या आवडीनुसार या मूळ प्रवाहाला नवीन वळण लावण्याचे जे प्रयत्न केले त्यांचा परामर्श संमेलनातून घेतलेला आढळतो अर्थात् प्रारंभीच्या काळातील संगीत नाट्यवस्तूचा एक अंगभूत घटक म्हणून योजिलेले असल्याने तेच अधिकाधिक निर्दोष व भावनापरि-पोषक कसे होईल याची चिंता त्या काळातील विद्वानांना पडली होती पारशी चालीच्या आगमनामुळे नाट्यसंगीताची शास्त्रीय बैठक ढासळत असून '*तिव्वट चोचले व ढंग*' *यांचा सुकाळ होऊ लागला अशी तक्रार*

पहिल्याच संमेलनात श्री आ वि कुलकर्णी यांनी केली आहे त्यासाठी या चाचींचा उपयोग फार तारतम्याने करावा अशी त्यांनी सूचना केली होती

नाटयसंगीतात भावनापरिपोषासाठीं शब्दोच्चार स्वच्छ होणे अगत्याचे असल्याचे न वि वळकर व पटवर्धन प्रभृतींनी आग्रहाने सांगितले आहे पद्याचा अर्थ कळत नाही सूरभरणा फार होतो वाद्यांच्या नादात शब्द स्पष्ट ऐकू येत नाहीत अशा स्वरूपाच्या तक्रारी १९०५ पासूनच सुरू झाल्या त्यावर उपाय म्हणून अभिनयास व्यत्यय येणार नाही असेच जागी संगीताची योजना करणे, शब्दार्थ लुप्त होईल अशा प्रकारे तानबाजी न करणे पदाच्या चाली अभिनयाला योग्य अशाच निवडणे इ सूचना विद्वानांनी केल्या आहेत संगीत मुळींच असू नये असा विचार मात्र बहुधा कोणी मांडला नाही श्री चिं वि वैद्य यांनी तर पद्याशिवाय नाटयाला पूर्णता नाहीं संगीत हे गद्यापेक्षा अधिक परिणामकारक असे विचार मांडले संगीताचार्य पलुस्कर यांनी नाटकातील संगीत कमी असावे या विषयावरच चर्चा आपल्या अध्यक्षीय भाषणात केली

संगीत नाटकाचा कालखंड संपल्यानंतर (म्हणजे १९२५ पासून पुढें) संमेलनातून 'संगीतामुळें रंगभूमीचा ऱ्हास झाला काय ?' या विषयावर मतप्रदर्शन होऊ लागले आचार्य अत्रे यांनी संगीताची अतिरिक्तता हे रंगभूमीच्या अवनतीचे एक कारण सांगितले श्री माधवराव जोशी यांनीहि रंगभूमीवर संगीताचे दळण घालणाऱ्या गायक नटांचा हजेरी घेतली जळगाव संमेलनात याच विषयावर परिसंवाद झाला अगदी अलीकडे सातारा येथील संमेलनात मा कृष्णरावांनी आपल्या निबंधांत संगीताने ऱ्हास झाल्ला नाही अशी भूमिका मांडली तर उलट श्री ह रा महाजनानी हैदराबाद संमेलनात नाटयसंगीतावर व्याख्यान देताना कोल्हटकर-खाडिलकरांच्या अमदानीत संगीतामुळें नाटयाची गळचेपी झाली असे मत व्यक्त केले

संगीताच्या प्रभावाबद्दल सर्वांचेच एकमत आहे परंतु खानदानी स्वरूपाची ख्यालगायकी रंगभूमीवर सुरू झाल्यामुळे काही नाटकांना गायनाच्या मैफलीचे स्वरूप आले आणि त्याचा परिणाम नाटयवस्तूवर होऊ लागला यासंबधी फारशी विवाद्यता नाही परंतु यावर उपाय म्हणजे नाटकातून संगीताचे उच्चाटन करणे हा नसून किर्लोस्कर-देवलांच्या संगीताप्रमाणे अर्थ

सुलभ आणि भावनापरिपोष करणाऱ्या संगीताची योजना करणे हा होय, या मताशी बहुतेक टीकाकार सहमत दिसतात काहींनी तर जुन्या संगीत नाटकाच्या परंपरेचे कालानुरूप आणि रसाचा उत्कर्ष करणाऱ्या पद्धतीने पुनरुज्जीवन होणे अगत्याचे आहे असा विचार मांडलेला आहे

## रंगभूमि आणि स्त्रिया

नाटकातील स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीच करणे अवश्य आहे अशा प्रकारची विचारसरणी प्रथमत मांडण्यात येऊ लागली तेव्हा त्या कल्पनेची उपहासपूर्वक वासलात करण्यात आली परंतु हळहळू हा विचार रसिक मनात मूळ धरू लागला ८ व्या संमेलनाचे अध्यक्ष सर मोरोपंत जोशी यांनी या कल्पनेला अगदी निःसंदिग्धपणे आपला पाठिंबा दिला १९२५ मध्ये हा विचार अधिक पसरला जाऊन त्यासबंधी तीव्र स्वरूपाचे मतभेद व्यक्त होऊ लागले २३ व्या संमेलनाच्या अध्यक्ष सौ गिरिजाबाई केळकर आणि २४ व्या संमेलनाचे अध्यक्ष श्री बालगंधर्व यांनी 'स्त्रियांनी (विशेषत कुलीन) रंगभूमीवर जाणे अनिष्ट आहे' असे आग्रहपूर्वक प्रतिपादन केले सौ केळकर यांनी परंपरानिष्ठ सामाजिक दृष्टिकोणातून हा विचार मांडला, तर स्त्रिया त्यांच्या शालीनतेमुळे रंगभूमीवरील अनेक प्रसंगी — मुख्यत शृंगारिक — मनमोकळा अभिनय करू शकणार नाहीत असे मत बालगंधर्वांनी व्यक्त केले (स्त्रियांचा समावेश असलेली नाटकमंडळी संस्थानातून दौरे काढू लागली म्हणजे तेथून बाहेर पडणे कठीण जाईल अशी भीति बालगंधर्वांनी व्यक्त केली होती) श्री वामणगावकरांनी 'स्त्रियांनी भूमिका केल्याने विशेष फायदा होईल असे वाटत नाही' असा विचार अध्यक्षीय भाषणात मांडला होता, परंतु त्याच संमेलनात (१९३३ च्या) स्त्री भूमिका करणाऱ्या स्त्रियांचे अभिनंदन करणारा ठराव मंजूर झाला!

या पुढील अध्यक्षांनी मात्र स्त्रियांनी भूमिका करण्यात सामाजिक दृष्टीने काही धोका नाही आणि कलेच्या दृष्टीने ते अवश्य आहे अशी भूमिका घेतली तथापि जुन्या मूल्यांवर श्रद्धा ठेवणारे रसिक मोठ्या संख्येने असल्या-मुळे ३४ व ३५ या संमेलनातून (म्हणजे स्त्रिया रंगभूमीवर येऊन लोकप्रिय झाल्यानंतर १० वर्षांनी) कुलीन स्त्रियांनी रंगभूमीवर यावे की नाही या

विषयावर खडाजंगी चर्चा झाल्या. कृष्णराव मराठे, सौ. गिरिजाबाई केळकर असे काही अपवाद वगळले तर बहुमताचा कौल स्त्रियांनी भूमिका कराव्यात या विचाराकडे वळलेला दिसतो. मात्र या धंद्यात खंबीर मनाच्या स्त्रियांनीच शिरावें असा सावधगिरीचा इषारा कांहीं महिलानींच दिलेला आहे. नाटकधंद्यांत सर्व आयुष्य गेलेल्या बालगंधर्व, गणपतराव बोडस या थोर कलावंतांनी मात्र आपली नाखुषी या काळांत आणि नंतरहि संमेलनांतून प्रकट केली. विशेषतः कुलीन स्त्रियांनी धंदा म्हणून भूमिका करणें इष्ट नाही असा या अनुभवी नेत्यांचा सूर आहे.

स्त्रियांनी रंगभूमीवर यावें कीं नाहीं हा विषय विवाद्य असला तरी *स्त्रियांनी समेलनांत येण्यासंबंधी मात्र वादविवाद होण्याचा प्रसंग आला नाही.* ७ व्या व ८ व्या समेलनांतून (१९११–१२ च्या सुमारास) सौ. काशीबाई हेर्लेकर व सौ. मथुराबाई द्रविड यांनी नाटकातील अभिनयासंबंधी आपले विचार अगदी तपशीलवार मांडलेले आहेत

## रंगभूमि व सुशिक्षित नेतृत्व

नाट्यसमेलनाचा इतिहास हा महाराष्ट्रातील विद्वानांच्या उपस्थितीने व उपदेशानेंच गजबजलेला आहे; किंबहुना हे कार्य नाटकाच्या प्रत्यक्ष क्षेत्रांत न वावरणाऱ्या जाणत्या मंडळींच्या तळमळीनेंच सजलेलें आहे. तेव्हा सुशिक्षित पुढारीपणाची आवश्यकता नाट्यव्यवसायासाठी आहे. पहिल्या समेलनाचे अध्यक्ष कै दादासाहेब खापर्डे यांच्या अपेक्षेप्रमाणें नाट्यसंमेलनाला विद्वत्परिषदेचें स्वरूप अगत. प्राप्त झालेलेच आहे. परंतु नाट्यव्यवसायाकडे मात्र सुशिक्षित मंडळी फार अल्प प्रमाणातच वळली आणि याच कारणामुळें सुशिक्षिताचा अभाव हें नाट्यव्यवसायातील उणीवाचें आणि नतर झालेल्या

घेणे कसे इष्ट आहे हे पुन्हा पुन्हा ठसविण्याचा प्रयत्न केलेला आहे "ही कला हाती ठेवण्यासाठी सुशिक्षितांनी झटले पाहिजे विद्वान व सुशिक्षित लोकांचे इकडे लक्ष लागत आहे ही भाग्याची गोष्ट आहे, नाटकमंडळचात निर्व्यसनी व सुशिक्षित लोक शिरले तर अभिरुचि सुधारेल, नटांनी समाजातील सुशिक्षित वर्गाशी सहवास ठेवला पाहिजे,' असे विचार संमेलनातून वारंवार प्रकट झालेले आहेत १४ व्या संमेलनाचे अध्यक्ष डॉ जयकर यांनी तर आपल्या अध्यक्षीय भाषणात याच विषयाचा विस्तारपूर्वक ऊहापोह केलेला आहे पुढे संमेलनातून या स्वरूपाचे ठरावहि होऊ लागले नाटक-धंद्याला पोषक म्हणून सुशिक्षित स्त्री-पुरुषांनी नाटचमंडळ वा क्लब स्थापन करुन त्यात उत्साहाने भाग घ्यावा अशा आशयाच्या सूचना डॉ जयकर, श्री गोविंदराव टेंबे, श्री माधवराव जोशी, श्री श प जोशी आदि अध्यक्षांनी केलेल्या आहेत

नटाच्या सुशिक्षितपणाचा आग्रह धरण्यामागे दोन वेगवेगळाले पण परस्पर-पोषक असे दृष्टिकोण आहेत मराठी नाटक हे त्याच्या प्रारंभापासून लोक-प्रिय झालेले असले तरी लोक प्रतिष्ठित झालेले नव्हते राजकारणी नेते आणि थोर विद्वान हे या व्यवसायाशी निरनिराळ्या निमित्तांनी निगडित झालेले होते, तरीसुद्धा नटाचे जीवन हा समाजाच्या टवाळीचा आणि अनादराचाच विषय होता संमेलनातून अनेक वेळा नाटकी धंद्याबद्दल समाजात दृढमूल झालेल्या तिरस्काराचा उल्लेख झालेला आहे याचे मुख्य कारण म्हणजे या धंद्यात दुर्व्यसनी व अशिक्षित मंडळींचाच मोठ्या प्रमाणावर भरणा झालेला आहे आणि त्यामुळेच नाटक बघण्यास गर्दी करणारे लोक इतर वेळी मात्र नटाकडे नाक मुरडूनच पाहतात ही स्थिति बदलावयाची असेल तर या धंद्यात सदाचारी व विद्यासंपन्न अशा व्यक्तींनी आवडीने भाग घेतला पाहिजे ही विचारसरणी स्पष्ट झालेली आहे "नटवर्गाने सुसंस्कृत नागरिक बनले पाहिजे, विद्वानांकडून अनादर होऊ नये यासाठी नटांनी सदाचाराचे पालन केले पाहिजे, नटाला आपला मान राखून घेणे असेल तर त्यांनी आपली वर्तणूक सुधारली पाहिजे, नटाबद्दलचे वाईट व दूषित मत दूर करण्यास सुशिक्षित मंडळींनी स्वतः पडून या धंद्यात प्रयत्न केला पाहिजे " अशी अनेक वाक्ये संमेलनातील भाषणातून काढून दाखविता येतील या मताच्या पाठीमागे

नाटकधंदा व नटवर्ग प्रतिष्ठित व आदरणीय होण्यासाठी त्यांत सत्प्रवृत्त मंडळींचा शिरकाव व्हावयास पाहिजे हा मुख्य हेतु होता. सुशिक्षितपणा म्हणजे केवळ पुस्तकी पांडित्य असा अर्थ अभिप्रेत नसून सुसंस्कृतपणा हा त्याचा गाभा आहे या समजुतीवर नटाच्या सुशिक्षितपणाचा आग्रह धरण्यांत आलेला आहे.

दुसरा दृष्टिकोण धंद्याच्या विकासाचा व स्थैर्याचा आहे. मराठी रंगभूमीवरील कलावंत पुस्तकी विद्येच्या दृष्टीने अशिक्षित असले तरी नाट्यगुणांच्या दृष्टीने ते उच्चविद्याविभूषित होतेच. परंतु नाट्याचा विचार केवळ कलाविलासाच्याच भूमिकेवरून करता येत नाही. कारण तो व्यवसायहि आहे. प्रारंभी नाटकधंद्यांत ज्या उणीवा होत्या त्या घालविणे किंवा पुढे झालेली अवनति थांबवून धरणे या गोष्टी नाटकधंद्यांतील नटांना जमल्या नाहीत. कारण त्यांची दृष्टि संकुचित होती. भोवतालच्या बदलत्या परिस्थितीप्रमाणे धंद्याच्या पद्धतींतहि बदल करणे अवश्य आहे हे त्यांना वेळीच आकलन होऊं शकलें नाही. हे भावी काळांत टाळावयाचें असेल व नाट्यव्यवसायाची उभारणी स्थिर पायावर करावयाची असेल तर दूर दृष्टीनें विचार करणाऱ्या सुविद्य कलावंतांना या कलेच्या विकासाचा भार आपल्या शिरावर घ्यायला पाहिजे या हेतूनें नाट्यसंमेलनांतून या शिकलेल्या मंडळींना आवाहन करण्यांत येऊं लागलें.

रंगभूमीच्या पाठीमागें जवळ जवळ १२५ वर्षांचा इतिहास आहे परंतु कै. अ. वा. वरेरकर यांनी स्थापिलेली राष्ट्रीय नाट्यशाळा, नागपूरच्या अभिनव नाट्य मंदिराचा नाट्यशिक्षण-वर्ग आणि इतर काही तुरळक प्रयत्न सोडले तर नाट्यशास्त्राचे तात्त्विक ( Theoretical ) व प्रायोगिक ( practical ) अध्यापन करण्याचा उपक्रम झालेला नाही. नाट्यशास्त्राचे पद्धतशीर अध्ययन करण्याकडे नाटकमंडळ्यांनी दुर्लक्षच केले होते. ज्या नाटकमंडळ्यांतून देवल, खाडिलकर किंवा दाते कोल्हटकर यांच्यासारखे तालीम मास्तर लाभले तेथें तेथ नाट्यशाळा स्वयंभूच निर्माण झाल्या. परंतु ही परंपरा अविच्छिन्न राहण्यासाठी तिला संस्थारूप देण्याकडे कोणीहि लक्ष दिले नाही.

वास्तविक दुसरें नाट्यसंमेलन भरण्याच्या सुमारास 'विविधज्ञानविस्तार' या भारदस्त मासिकानें 'अभिनयाचें सांपत्तिक आणि मार्मिक शिक्षण देणाऱ्या शाळा निघाल्या पाहिजेत ' अशी सूचना केली होती आणि त्यानंतर प्रा. भानू, श्री. चिं. वि. वैद्य, डॉ. जयकर, श्री. बाबासाहेब इचलकरंजीकर, प्रा. श्री. नी. चाफेकर आदि संमेलनाध्यक्षांनी याच आशयाचे विचार मांडून नाट्य शिक्षणाची आवश्यकता सांगितली होती. परंतु कै. वरेरकर यांचा एक प्रयत्न काही दिवसांतच संपुष्टात आल्यानंतर भारत नाट्यसमाजानें किंवा नाटक मंडळ्यांनी तो सतत चालू ठेवण्याची पुन्हा खटपट केली नाही. नाटक धंद्यातील जबाबदार मंडळी याबाबतीत निष्क्रिय पाहिल्यानंतर काही विचारी नाट्यप्रेमी मंडळींना महाराष्ट्रातील विद्यापीठांत नाट्यविषयक अभ्यासक्रम सुरू करण्याच्या दृष्टीनें हालचाल करण्यास प्रारंभ केला.

१९२९ मध्यें नागपूर येथें भरलेल्या संमेलनात या संबंधीं एक ठराव मंजूर झाला. या ठरावान्वयें मुंबई व नागपूर या मराठी भाषिक प्रदेशांतील विद्यापीठांना एक स्वतंत्र नाट्यविषयक अभ्यास-शाखा (Dramatic Faculty) काढावी अशी त्या विद्यापीठांना विनंति करण्यांत आली. त्याच ठरावाची पुढील प्रत्येक संमेलनांत पुनरुक्ति झाली. पुढे पुणें आणि मराठवाडा या दोन विद्यापीठांची स्थापना झाल्यानंतर ठरावांत त्यांचाहि उल्लेख करण्यांत येऊ लागला. त्या ठरावाच्या कार्यवाहीची खटपट करण्यासाठी निरनिराळ्या समित्यांची नियुक्तिहि झाली. मुंबई विद्यापीठांत प्रा. जागळेकर यांनी बरीच मेहनत घेतली, परंतु त्यांच्या आकस्मिक निधनामुळें ती सर्व व्यर्थ गेली आणि

पुढें कोणी त्याचा नेट लावला नाही. नागपूर विद्यापीठांत प्रा. वनहट्टी यांनीं इतर नाटयप्रेमी विद्वानांच्या सहाय्यानें हा प्रश्न धसास लावला. त्याचा परिणाम होऊन त्या विद्यापीठाच्या अॅकॅडेमिक कौन्सिलनें नाटयविषयक अभ्यासक्रम आखण्यासाठीं एक समितीहि नेमली. हा अभ्यासक्रम तयार झाल्यावर तो कला-शाखे (Faculty of Arts)कडे मान्यतेसाठीं पाठविण्यात आला; परंतु त्यावर भाकड वादविवाद होऊन तो नामंजूर झाला. या सर्व विद्यापीठांत अशा स्वरूपाचे प्रयत्न पुन्हा करण्यासाठीं नुकतीच परिषदेच्या *कार्यकारिणीनें एकेक समिति नियुक्त केली आहे आणि त्यांनी विद्या*पीठांत नाटयशाळा स्थापन करण्याची खटपट करावी असें ठरविण्यांत आलें आहे.

अभिनयाचा पायाशुद्ध अभ्यास करण्यासाठीं नाटयशिक्षणाची अत्यंत आवश्यकता आहे हा *विचार आता सर्वमान्य झाला आहे. स्वत: परिषदेने* हें काम मोठ्या प्रमाणावर करण्यास फार अडचणी आहेत. तेव्हां आतांपर्यंत नाटयसंमेलनांतून मंजूर करण्यांत आलेले ठराव आणि अनुभवी नटांनी व दिग्दर्शकांनी पटवून दिलेली नाटयाभ्यासाची अपरिहार्यता लक्षांत घेऊन विद्यापीठांनीच तींत काही पावलें टाकावीत अशी परिषदेची अपेक्षा आहे.

## सुजाण प्रेक्षकांची मागणी

लोकप्रिय नाटकाला किंवा नाटकमंडळीला प्रेक्षकांची आर्जवें करण्याचें *कारण नसतें; कारण प्रेक्षकांचे पाय तिकडे आपोआप वळतात; परंतु चांगली* नाटकें वारंवार पाहणारा प्रेक्षक हा जाणता आणि जागता असावा अशी *नाटयव्यवसायातील विचारी माणसाची अपेक्षा नाटयसंमेलनांतून व्यक्त केलेली* आहे तिसऱ्याच नाटयसंमेलनांत श्री लेलेशास्त्री यांनी यशस्वी नाटकाला प्रेक्षकहि उत्तम पाहिजे हे सांगितलें. *महाराष्ट्र नाटक मंडळीचे मालक श्री.* अण्णासाहेब कारखानीस यांनी ६ व्या नाटयसंमेलनांत प्रेक्षकांचे स्वागत *करताना प्रेक्षकांच्या थोरवीचे गुणगान केलें आणि प्रेक्षकांनी आपणहून हा दर्जा* प्राप्त करून घ्यावा अशी त्यांना विनंति केली. विद्वत्ता आणि मार्मिकता एवढेच गुण असणारे प्रेक्षक हे नाटयकलेला पुरेसे नाहींत, नाटयाची खरोखरी उन्नति करावयाची असेल तर प्रेक्षक उत्तम वळण लावणारे असणें

अगत्याचे आहे, असे मत श्री वारखानीस यांनी व्यक्त केले डॉ गर्दे यांनी आपल्या भाषणात प्रेक्षकांच्या अंगी विदग्धता, रसिकता आणि औदार्य या वैशिष्ट्यांची आवश्यकता असल्याचे सांगून प्रेक्षक सभेचे वर्णन 'सभा विदग्ध भूयिष्ठा रसिका द्रव्यदायिनी' या सूत्रात केले श्री वारखानीस यांनी अपेक्षिलेला आणि डॉ गर्दे यांनी वर्णिलेला प्रेक्षक दिवसेदिवस दुर्मिळ होत चालला आणि त्यामुळें नाट्यविष्कारात उत्पन्न झालेल्या दोषांचे निराकरण होण्याऐवजी ते वाढत्या प्रमाणात दिसू लागले असा निष्कर्ष पुढील संमेलनातून काढण्यात येऊ लागला चिंतामणराव कोल्हटकर आणि नानासाहेब फाटक यांनीहि या 'बिघडलेल्या प्रेक्षकां'चा निर्देश केला आणि तोच पूर्वीचा नामवंत नटानाहि जरब बसविणारा आणि कलामूल्याची कदर बाळगणारा प्रेक्षक कसा बचक ठेवीत असे यासंबंधीचे स्वानुभव कथन केले श्री पार्श्वनाथ आळतेकर आणि श्री माडेकर यांनीहि हीच तक्रार केलेली आहे "१९३० पूर्वीचा प्रेक्षक आजच्या तुलनेत अशिक्षित असला तरी त्याची अभिरुचि चोखंदळ बनलेली असे परंतु आताचा प्रेक्षक गल्या दोन तपात बदलून गेला आहे, काही तरी चार घटका करमणूक करणारें नाटक त्याला हवे आहे, मग ती करमणूक कोणत्याहि पातळीवरची असो त्याच्या अपेक्षा अगदी मर्यादित व उथळ झालेल्या आहेत खऱ्या नाट्यमूल्याची पारख तो करू शकत नाही" असे विचार थोरांनी स्पष्टपणे नमूद केलेले आहेत

## उत्कर्षापकर्षाची मीमांसा

नाट्यसंमेलनाच्या पहिल्या पंचविशीपर्यंत (१९३० पर्यंत) मराठी नाट्यकला उत्कर्षाप्रत जाण्यासाठी तिच्या सध्याच्या स्वरूपात कोणते दोष आहेत व ते कसे दूर करता येतील यासंबधी नाट्यप्रेमी विद्वान चर्चा करीत प्रत्यक्ष नाट्यव्यवसाय करणारी मंडळीहि आपापली मत मांडीत नाटकाचा धंदा भरभराटीत असताना तो सर्व दृष्टींनी निर्दोष कसा होईल याचाच विचार होणे हे स्वाभाविकच होते आणि नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षांनी रंगभूमीच्या नटांना उद्देशून आपापल्या कल्पनेनुरूप अनेक सूचना केलेल्या आहेत नाट्यशिक्षणाच्या शाळा निघणे अवश्य आहे, नटवर्ग निर्व्यसनी व सदाचारी झाला पाहिजे, नाटकातील संगीत हे नाट्याची हानि न करणारें व शास्त्रीय पद्धतीचे

असलें पाहिजे, नाटकमंडळांनी नीतिशिक्षण देणारीं नाटकें रंगभूमीवर आणली पाहिजेत अशा प्रकारच्या सूचना संमेलनांतून मांडण्यांत आल्या. १९३५ च्या सुमारास मराठी रंगभूमीचा बाह्यतः टोलेजंग दिसणारा डोलारा पाहतां पाहतां कोसळून पडला आणि त्याची पुन्हां कशाप्रकारें उभारणी करतां येईल या काळजीनें नाटयव्यवसायी आणि नाटयप्रेमी व्यग्र झाले. पुढच्या साऱ्या संमेलनाध्यक्षांनी या अवनतीची आपापल्या दृष्टीप्रमाणें मीमांसा करण्याचा प्रयत्न केला आणि मराठी रंगभूमीला पुन्हां वैभवाचे दिवस यावेत म्हणून काही उपाययोजनाहि सुचविल्या. त्यांच्या मताचा थोडक्यांत आढावा घेऊं.

रंगभूमीच्या ऱ्हासाला बोलपट हें एकमेव नसलें तरी एक प्रमुख कारण निश्चितपणें होते असे अनेकांचें मत पडलें. बोलपटांमुळें स्वस्त करमणूक उपलब्ध झाली, भरपूर मोबदल्याच्या आशेनें लेखक व कलावंत रंगभूमि सोडून चित्रसृष्टीकडे धांवले, आणि मुख्य म्हणजे रंगभूमीची राहती घरें बोलपटानी बळकावून तिला निर्वासित केलें; यामुळें रंगभूमीला जबर तडाखा बसला हें निर्विवाद आहे. बोलपट हें अखेरचें आणि प्रत्यक्ष कारण ठरलें.

परंतु रंगभूमीच्या अपकर्षाला नाटकमंडळयांची वागणूक आणि हा व्यवसाय करण्याची पद्धतच मुख्यतः कारणीभूत झाली या मताशी टेंबे, शं. प. जोशी, वरेरकर, आचार्य अत्रे, ना. वि. कुलकर्णी, नानासाहेब फाटक, वि. स. खांडेकर, आदि अनेक अधिकारी मंडळी सहमत आहे. नटवर्गांत आणि नाटकधंद्यांत कोणकोणते दोष होते याची यादी केली तर ती खूपच लांबलचक आहे. नाटकमंडळयांनी केवळ धनोत्पादनाकडे लक्ष देऊन कलेकडे दुर्लक्ष केलें, मंस्थानी थाटाचे बेसुमार खर्च करून बेहिशोबीपणानें कर्जबाजारीपणा हा नियम केला, स्वतःच्या अगर नाटक मंडळीच्या हितापलीकडे नजर दिली नाही आणि सर्वांत मुख्य म्हणजे बदलत्या परिस्थितीची दखल घेतली नाही हे नाटयव्यवसायामध्यें निर्माण झालेले प्रमुख दोष असें बहुतेकांचें मत पडले आहे. ऐन उत्कर्षाच्या काळात नाटयकलेच्या नेत्यानी भावी काळाची पावलें ओळखून नाटकधंद्याला स्थैर्य प्राप्त होण्याच्या दृष्टीने संघटित स्वरूपात कांहीं योजना आंखली असती तर बोलपटांच्या पहिल्याच प्रहारासरशी ती मृतप्राय कधींहि झाली नसती.

बोलपट लोकप्रिय झाल्यानंतर व रंगभूमि तिच्यातील अंतर्गत दोषामुळें मागें पडल्यानंतर रंगभूमीला हक्काचें घरहि मिळेनासें झालें याच काळात करमणुकीच्या कराचें ओझें दिवसेंदिवस असह्य होऊ लागलें या दोन कारणामुळें रंगभूमि जिवंत ठेवण्यासाठी निकराने प्रयत्न करणाऱ्या नाटकमंडळ्यानाहि आपापले संसार आवरणें भाग पडलें या कारणाशिवाय श्री कोल्हटकर व खाडेकर यानी, काळ बदलला हें या अवनतीचें एक महत्त्वाचें कारण सांगितलें १९३५ नंतरच्या संक्रमणकाळांत जीवनाची सर्वच आधारभूत मूल्यें बदलत चालली आणि त्याच्या भोवऱ्यात सापडलेल्या रंगभूमीचीहि दुर्दशा झाली

या संकटातून रंगभूमीला पुन्हा पूर्वीचें किंबहुना त्याहिपेक्षा अधिक उज्ज्वल आणि अढळ स्थान प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर आजच्या नाट्यकलेच्या उपासकानी कोणत्या दिशेनें प्रयत्न केले पाहिजेत आणि इतर सामाजिक शक्तींनी त्याना कोणत्या प्रकारें साहाय्य दिलें पाहिजे यासबंधी सर्वांनी मतप्रदर्शन केलेलें आहे त्यातील उपायापैकी, नाट्यव्यवसाय सुरळितपणें चालू राहण्यासाठी महाराष्ट्रातील प्रत्येक जिल्ह्यात किमान एक अशा प्रकारें नाट्यगृहाची एक साखळी निर्माण करणें हें केवळ सरकारच करू शकेल तें परिषद किंवा सामान्य रसिकाच्या आवाक्याबाहेरचें आहे आणि अशा नाट्यगृहापासून सध्या भरमसाट उत्पन्न मिळण्याची शक्यता नसल्याने धनिक मंडळी तिकडे फिरकणार नाहीत नाट्यधंद्यातील दुसरी एक मोठी धोंड—करमणुकीचा जबरदस्त कर— सरकारच्या कृपेनें दूर झाली आहे परिषदेला व हौशी नाट्यस्पर्धांना आर्थिक साहाय्यहि मिळण्यास सुरवात झाली आहे, परंतु नाट्यकलेचा सर्वांगीण विकास राज्यभर होण्यासाठी व तो स्थिर राहण्यासाठी व्यावसायिक नाटक मंडळ्या अस्तित्वात येणें अवश्य आहे आणि सध्याची परिस्थिति पाहता सरकारी मदतीविना या मंडळ्याचा जीवननिर्वाह होणें दुरापास्त आहे तेव्हा वंद नाट्यगृह आणि आर्थिक मदत हे रंगभूमीच्या उन्नतीसाठी अत्यावश्यक असणार दोन उपाय सरकारी पातळीवरूनच होण्यासारख आहेत

नाट्यशिक्षणाची गरज विद्यापीठानी भागविली पाहिजे. नाट्यशिक्षणाची भरपूर शिदोरी जमा केल्याशिवायच नाट्यप्रांतात घुसलेले कलावंत रंग-

भूमीची सेवा करूं शकत नाहीत हें आतां सिद्ध झालेलें आहे. नाटयाची शास्त्रशुद्ध उपासना निष्ठेनें करणारे अभिनयसंपन्न कलावंतच नाटयकलेचा सर्वांगीण विकास करूं शकतात. यासाठीच गेलीं अनेक वर्षे नाटयविषयक स्वतंत्र शाखा सुरूं करण्याविषयीं महाराष्ट्रांतील विद्यापीठांना विनंती करण्यांत येत आहे. सरकारप्रमाणेच संस्कृतीच्या पोषणाची जबाबदारी घेतलेल्या विद्यापीठांनी जीवनाचें हें उपांग दुर्लक्षितां कामा नये अशी आग्रहाची मागणी कारखानीस, कोल्हटकर, आळतेकर इ. नाटयक्षेत्रांतील तपस्व्यानीं केलेली आहे. रंगभूमीच्या सर्व अंगोपांगाचा पद्धतशीर अभ्यास केलेली सुविद्य मंडळी या क्षेत्रांत प्रविष्ट झाली आणि बदललेल्या काळा-नुरूप त्यानीं नाटयव्यवसायाची आमूलाग्र पुनर्घटना केली तर मराठी रंग-भूमीला पुन्हां वैभवाचे दिवस यावयाला उशीर लागणार नाही ही आजच्या नाटयप्रेमी विद्वानांचीहि आणि कलावंताचीहि खात्री आहे. याशिवाय जे जे उपाय सुचविले गेले ते तुलनेने गौण महत्त्वाचे आहेत. संगीताचा अतिरेक असूं नये, उपलब्ध तांत्रिक सुधारणा आत्मसात् करून राबविल्या पाहिजेत, वृत्तपत्रानी रंगभूमीवरील नव्या नव्या प्रयोगाची सहृदयतेने चिकित्सा केली पाहिजे इ. उपाय हे नंतरचे आहेत. नाटयव्यवसाय आपल्या पायावर प्रथम स्थिर झाला पाहिजे, म्हणजे लहानमहान स्वरूपाच्या सुधारणा त्यात आपो-आप घडून येतील हें सर्वांच्या विचाराचें सूत्र आहे.

## उद्याच्या रंगभूमीचे भाग्यविधाते

आतापर्यंत सादर केलेल्या विचारमंथनातील हा सर्वाधिक महत्त्वाचा टप्पा आहे. संमेलनांत झालेल्या चर्चेचे महत्त्व केवळ प्रासंगिक स्वरूपाचें समजणें योग्य होणार नाहीं या सर्वांमधून जे निष्कर्ष निघाले ते उद्याचा रंगभूमीचा इतिहास घडविणाऱ्या कलावंतानी काळजीपूर्वक अभ्यासिले आणि त्याच्या आधारावरच आपल्या भावी कार्याचे मनोरथ केले तरच त्याचें सार्थक झाले असें म्हणता येईल. हा विचार आणि तदनुसार आचार कोण करणार ? हा प्रश्न आज प्रत्येक नाटयप्रेमी रसिकाच्या मनात उभा आहे आणि त्याचे उत्तर हेंच उद्याच्या रंगभूमीचे भविष्य आहे.

वास्तविक या प्रश्नाचे उत्तर अगदी चुटकीसारखें देता आलें असतें. जे हा

व्यवसाय करतात त्यांच्याच हाती रगभूमीच्या भावी आयुष्याची दोरी आहे हे त्याचे अगदी सरळ उत्तर आहे परतु गल्या तीन तपानील रगभूमीचा इतिहास पाहिला म्हणजे या प्रश्नाचे स्वरूप अत्यत जटिल आणि विवाद्य झाल्याचे आढळून येत १९४३ मध्ये सर्व मराठी भाषिक मुलुखात रग-भूमीचा शताब्दिमहोत्सव धूमधडाक्यान साजरा झाल्यापासून सुरू झालेले नाटकाचे प्रयोग आजहि अव्याहतपणे सुरू आहत, परतु रगभूमीच्या भविष्याची खात्री एकाहि समेलनाध्यक्षाला देता आली नाही सघटित व्यवसायाची बैठक अद्यापिहि मराठी रगभूमीला प्राप्त झाल्ली नाही ठकेदारी पद्धतीचे व्याव-सायिकाचे प्रयोग शेकडयानी होत आहेत, परतु नाट्यव्यवसायाचा प्रश्न पूर्वीसारखाच 'आ' वासून उभा आहे गेल्या १०।१२ वर्षांत सरकारच्या प्रोत्साहनाने हौशी नाट्यसस्थाचे नवे नवे नाट्यप्रयोगहि प्रत्यही रगभूमीवर येत आहेत आणि 'रगभूमि हौशी नटानीच जिवत ठवली व तेच पुढेंहि ठेवतील, आता नाट्यव्यवसाय खलास झाला' असे उद्‌गार हौशी नटाच्या गोटातून अधूमधून बाहेर पडत असतात गेल्या काही वर्षांतील नाट्यसमे-लनाच्या अध्यक्षाची भाषणे पाहिली तर त्यानीहि या प्रश्नावर आपापले निर्णय दिलेले आहत

"नाट्यधद्याची आमूलाग्र नवी माडणी झाली तरच यापुढें हा धदा टिकाव धरू शकेल, रगभूमीचे सर्वस्पर्शी अस्तित्व प्रस्थापित करण्यासाठी व्यावसायिक रगभूमीच जिवत राहिली पाहिज धदेवाईक नाटक मडळ्या स्थापन झाल्या तर त्याच काही काय करू शकतील, नाट्यव्यावसायिकाच्या सस्था स्थापन झाल्याशिवाय नाट्यकलेचा उत्कर्ष साधणे शक्य नाही' अशा आशयाच उद्‌गार गल्या काही वर्षांतील रगभूमीची अवस्था पाहिल्यानतर श्री कमतनूरकर श्री गाडकर, श्री नानासाहेब फाटक श्री व शा देसाई द अध्यक्षानी काढलेले आहेत हौशी नटानी गल्या काही वर्षांत केलेल नाट्यविषयक कौतुकास्पद काय कोणीच नाकबूल करीत नाही परतु रगभूमीच्या सर्वांगीण उन्नतीसाठी त्याच एका व्यवसायाला वाहून घतलेल्या नाट्योपासकाचीच गरज आहे असा या अधिकारी नाट्यभक्ताचा निर्वाळा आहे व्यावसायिक रगभूमीला साहाय्य-भूत होतील असे रगतविषयक व तात्त्विक स्वरूपाचे वगवगळ धाडसी प्रयोग हौशी नाट्यसस्था निर्भयपणे करू शकतात त्याचप्रमाणे व्यावसायिक रग-

*भूमीला नव नट आणि नाटककार याचा पुरवठा करण्याच महत्त्वाचहि हौशी* नाट्यसस्थामुळे सतत चालू राहील परतु रगभूमीच सातत्य टिकविण आणि तिचा विस्तार करणे या गोष्टी हौशी नटाना मूलत च अशक्य आहेत रग-भूमीचा इतिहास व्यावसायिक कलावतच घडवू शकतात, हौशी नाट्यसस्था त्याच्या कार्याला पूरक म्हणून उपयुक्त आणि अवश्य आहेत असा निष्कर्ष समेलनातील चर्चेतून निघालेला आहे

## परिषदेकडून अपेक्षा

समेलनाची मध्यवर्ती सस्था म्हणून भारत नाट्यसमाजाचे काम सुरू झाल्यापासूनच त्याने रगभूमीविषयक कोणकोणते उपक्रम करावे याविषयी मतप्रदर्शन सुरू झाले समेलनाच्या अध्यक्षापासून वृत्तपत्रातील सामान्य नाट्यप्रेमी व्यक्तीपर्यंत सर्वांच्या मनात भारत नाट्यसमाजाने काही तरी मार्गदर्शन करावे अशी अपेक्षा निर्माण झालेली दिसते

नाटक मडळ्यांच्या कार्यात जे दोष आढळतात त्याचे निराकरण करण्याचा समाजाने प्रयत्न केला पाहिजे ही अनेकाची मागणी होती 'नाट्यसमेलनाने अनर्थकारक प्रथाना आळा घालण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत' (प पलुस्कर), समाजविघातक नाटकाना पायबद घालण्यासाठी समाजाने एक कमिटी नेमावी व त्या कमिटीचे नियम न पाळणाऱ्या नाटक मडळ्यावर सामाजिक बहिष्कार घालावा (श्री रा गा दडवते, 'रगभूमि' वर्ष २, अ ५), समाजाच्या *कमिटीचे नाटकासबधीचे नियम उल्लघन न करण्याचे प्रमुख नाटक मडळ्यानी* मान्य केले पाहिजे (श्री ग भ मराठे, 'रगभूमि' वर्ष २, अक ८) असे अनेक उल्लेख समाजाकडून अयोग्य नाटकावर नियत्रण बसावे अशी सूचना करणार आहेत

नाटक मडळ्यात नित्य चालू असणारी फाटाफूट थाबविण्याचा व भाडण तट मोडविण्याचा समाजाने प्रयत्न करावा अशी दुसरी अपेक्षा सर्वांनीच प्रकट केलेली आहे स्वत समेलनाचे चिटणीस कै केरकर याना 'नाटक मडळ्यानी अतर्गत उपद्व्याप व अडचणीच्या प्रसगी समाजाची मदत घ्यावी असे नाटक मडळ्याना आवाहन केले होते या सूचनेला पुढेहि पाठिंबा मिळालेला आहे ११ व्या समेलनाचे अध्यक्ष नविवय ना बा ग्ळिक यानी नाटक

मंडळयानी भाडणाचा निकाल समाजाच्या पंचामार्फत लावून घ्यावा ' अशी सूचना केली होती महाराष्ट्र ना म चे मालक कै अण्णासाहेब कारखानीस हेहि या मताशी सहमत होते १४ व्या संमेलनप्रसंगी त्यानी ' नटवर्गाने भारत नाट्य समाजासारख्या मध्यवर्ती मंडळाकडून आपल्या अडचणी दूर करून घ्याव्यात ' असे मत व्यक्त केले श्री ग. स मराठे यानीहि ' समाजाने नाटक मंडळयातील भांडणे सोडविण्यासाठी लवाद कोर्ट नेमावे ' अशी सूचना केली होती

याशिवाय समाजाने नाट्यशिक्षणाच्या शाळा काढाव्यात, रंगभूमीवर न आलेल्या नाटकाचे प्रकाशन करावे, चांगली नाटके परत करण्यासाठी व वाईट नापसत करण्यासाठी एक कायम स्वरूपाची तज्ञाची समिति स्थापन करावी, नाटक मंडळयाच्या तक्रारीची दाद सरकारकडून लावून घ्यावी 'असेहि विचार तत्कालीन नाट्यप्रेमी व्यक्तींनी प्रकट केलले आहेत

## १९५६ नतर वाढलेल्या अपेक्षा

१९५६ मध्ये बेळगाव येथें झालेल्या परिषदेच्या नव्या अवतारापासून महाराष्ट्रातील नट, नाटककार, नाट्यटीकाकार याच्या मनात परिषदेने मोठमोठ्या कार्यांना हात घालावा व नाट्याची सर्वांगीण प्रगति घडवून आणावी असे विचार घोळू लागले श्री केशवराव दाते[1], श्री के ना काळे[2], प्रा प्र रा भूपटकर[3], श्री आत्माराम भेंडे[4], श्री भालचद्र पेंढारकर[5], श्री मो ग रांगणेकर[6], प्रा वनहट्टी[7] अशा नाट्यक्षेत्रातील नट, तज्ञ व अनुभवी मंडळींनी आपापल्या अपेक्षाना व्यक्त स्वरूप दिलेले आहे इतर विद्वान आणि सर्वसाधारण रसिक याच्या मनातूनहि परिषदेने आता 'खूप खूप ' कार्य करून दाखवावे असे खरोखरीच वाटते या मंडळींच्या अपेक्षाचे वर्गीकरण केले तर त्यात पुढील प्रमुख अपेक्षा दिसतात—

१ व २ नाटक, फेब्रुवारी १९६०
३ मौज, २२ डिसें १९५७
४ रसरग, २७ डिसें १९५८
५ सराळ, ५ एप्रिल १९५८
६ वीणा, फेब्रु १९५६.
७ मराठी नाट्यकला व नाट्यवाङ्मय, पृ २०७–२०९

(१) आजच्या काही नाटकातून अभिरुचिहीन नाट्यकलेची जी बेढब प्रदर्शन मांडली जात आहेत त्याना पायबद बसावा नाटकातील अनुचित प्रवाह थोपवून धरण्याचा प्रयत्न सहानुभूतीने आणि जरूर पडल्यास वडीलकीच्या दरडावणीने करावा

(२) गावोगाव पसरलेल्या नाट्यप्रेमी हौशी कलावंताना नाटकाची निवड करण्यापासून तो ते रंगभूमीवर प्रयोगरूपाने येईपर्यंत सर्व प्रकारचे मार्गदर्शन करणारा नाट्यतज्ञाचा एक संच तयार करून या होतकरू कला-वंताच्या कलेचा विकास करावा

(३) ठराविक लोकप्रिय नाटकाचे पुन पुन प्रयोग लावून नाट्यरसिकाच्या पैशातून जबर फायदा उठवणाऱ्या ठेकेदाराची पैदास बंद करावी त्याचप्रमाणे कलावंतहि भरमसाट मोबदला घेणार नाहीत यासंबंधी काही उपाय योजना करावी

(४) नाट्यस्पर्धांतून पारितोषिके मिळविणाऱ्या आणि इतरहि यशस्वी-पण सादर झालेल्या हौशी नाट्यसंस्थाची नाटक सर्वत्र जातील अशी योजना करावी

(५) मराठी नाटकाची वर्णनात्मक संदर्भ-सूचि तयार करावी

(६) नाट्यविषयक वाड्मयाचे प्रकाशन करावे

(७) रंगभूमिविषयक सर्व प्रकारच्या नव्या-जुन्या साहित्याचा संग्रह करावा

(८) सहयोगी प्रयत्नान (अनेकाच्या सहकार्याने) चागली नाटक करावीत

(९) वार्धक्यामुळे किंवा पगुतेमुळे असमर्थ बनलेल्या व्यावसायिक नटाच्या आर्थिक स्वास्थ्यासाठी एखादा स्थायी स्वरूपाचा निधि उभारावा

(१०) नाट्यव्यावसायिकाना प्रवास, परवाने, नाट्यगृहे इ बाबतीत ज्या अडचणी येतात त्या दूर कराव्यात इ इ इ

## परिषदेच्या अपेक्षा

वर उल्लेखिलेल्या आणि आणखीहि कित्येक उल्लेख करता येण्याजोग्या अपेक्षा मराठी रंगभूमि पुनरपि वैभवाला चढावी अशी प्रामाणिक इच्छा धरणाऱ्या व्यक्तींनी जाहीर व खासगीरीत्या बोलून दाखविलेल्या आहेत. त्यांतील बहुतेक सर्वच नाट्यकलेच्या दृष्टीनें उपयुक्त आहेत आणि त्यांची परिपूर्ति करण्याचे काम आपणाला लाभावें अशी परिषदेचीहि उत्कट इच्छा आहे. परंतु परिदेच्या या जगन्नाथाच्या रथाला हौशी व व्यावसायिक नट, नाटककार, नाट्यसमीक्षक, नाट्य मर्मज्ञ, वृत्तपत्रें, शासनसंस्था आणि सर्व-साधारण रसिक या सर्वांचे हात लागले पाहिजेत. या सर्वांच्याकडून चालू घडीला ज्या प्रकारचें सहकार्य मिळत आहे त्याची स्थिति काय आहे ?

वार्षिक ३ रुपये वर्गणी देणाऱ्या व्यक्तिसभासदांची आणि संलग्न संस्थांची यादी पाहिली म्हणजे नाट्यक्षेत्रांत नित्य किंवा नैमित्तिक कार्य करणाऱ्या निरनिराळ्या संस्था परिषदेच्या बाहेरच असल्याचें दिसून येतें. नाट्य मंडळांनी वार्षिक एका खेळाचें उत्पन्न द्यावें ही पूर्वीच्या भारत नाट्यसमाजाची विनंती ज्याप्रमाणे पूर्वीच्या अदूरदर्शी नाट्यसेवकांनी मानली नाही त्याचप्रमाणें प्रत्येक खेळामागें एक रुपया परिषदेला देण्याची मागणीहि आज कोणतीहि नाट्यसंस्था मनावर घेत नाही. इतकेंच नव्हे तर नाट्यस्पर्धेबाबत सरकारकडे एकमुखानें काही निवेदन करावें तर तेथेंहि परिषदेच्या कार्यांत अडथळे उत्पन्न केले जातात.[१]

नाट्य-क्षेत्रांतील विद्वानांच्या सहकार्याची तऱ्हाहि अशीच नमुनेदार आहे. श्री. के. नारायण काळे यांनी सुचवलेली व नटश्रेष्ठ केशवराव दात्यांनी उचलून धरलेली विमा परिषदेची योजना अमलांत आणण्याचा परिषदेनें संकल्प केला व सुमारें ४५ नाट्यसेवकांना खंडाळा येथें १९ मे १९५७ ला उपस्थित राहण्याची विनंती केली. त्या विनंतीप्रमाणें त्या दिवशी खंडाळा येथें तीन निमंत्रित उपस्थित होते ! प्रयोगक्षम नाटकांची सूचि करतानाहि याच अनुभवाचा पुन प्रत्यय आला. जाहीर विनंतीकडे कोणीच लक्ष देत नाही.

---

१ मराठी नाट्य परिषदेच्या प्रत्यक्ष कार्याचा अनुभव — श्री. गो. म. वाल्वे,
मौज, दि. २९ नोव्हें. १९५८

म्हणून सुमारें ३० जणाच्याकडे व्यक्तिश पत्रें पाठवण्यात आली परतु एक दोघाचा अपवाद सोडल्यास इतराना या पत्राची पाच देण्याइतकेंहि महत्त्व वाटलें नाही [1] सूचि तयार करण्यासबधी जी समिति नियुक्त केली होती त्या समितीतील काहीं सभासदांना सूचीसबधी एका अक्षरानेंसुद्धा कधी विचारणा केली नाही पुणें येथील कै आळतेकराचा षष्ट्यब्दिपूर्तिसमारभ, मालापूर येथील ३९ व नाट्यसमेलन इ अनेक प्रसगींहि परिषदच्या कार्यकर्त्यांना अशाच स्वरूपाचे कटु अनुभव आले [1]

## परिषदेचा आधार व निर्धार

तथापि अशा प्रकारचे नको ते अनुभव येऊनहि परिषदेचे कार्य स्थगित झालेलं नाही कारण या सार्वजनिक काळचा ढगालाच काही निष्ठावनाची रुपेरी कडाहि आहे याचाहि आशादायक अनुभव परिषदेला आलेला आहे सरकारची एके काळची जड यत्रणा आता परिषदच्या विनतीप्रमाणे अनुकूल दिशेनें हलू लागली आहे श्री भालचद्र पेंढारकर, श्री आत्माराम भेंडे, इ नव्या दमाचे कलावत परिषदेच्या कार्याचं महत्त्व जाणून तिची आर्थिक बाजू सावरून धरीत आहेत श्री वि स खाडेकर, श्री केशवराव दाते, श्री वसन्त शान्ताराम देसाई, प्रा बनहट्टी याच्यासारख्या ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध मडळीच मार्गदर्शन आणि शुभाशीर्वाद परिषदेला लाभत आहेत त्याच्याच आधारावर परिषदेकडून अपेक्षिलेली काही कार्यें परिषदेनें पूर्ण केली आहेत व काही हातीं घेतली आहेत सर्वांचं योग्य ते सहकार्य मिळाले तर सवच अपेक्षित कार्यें सफल झाल्याचे समाधान परिषदला लाभेल हें सहकार्य मिळणे अगदी सुलभ नाही याची परिषदेला चागली जाणीव आहे आतापर्यंतचा परिषदच्या कार्याचा गाडा रेटण्याच काम नाट्यक्षेत्रापासून ज्याना प्रत्यक्ष लाभ कोणताच नाही अशा नाट्यप्रेमी व्यक्तींनी केलें याचा इतिहास पूर्वी आलेलाच आहे परतु पूर्वीची नाट्यसेवक मडळी सुनिश्चित नव्हती किंवा त्यानी नाट्यव्यवसायाची दूरवर विचारान आखणी केली नाही यासारख्या सबबीवर त्याच्या हातून झालेली मध्यवर्ती सघटनेची हलगर्जी क्षम्य समजली गेली परतु आता

1. मराठी नाट्य परिषदेच्या प्रत्यक्ष कार्याचा अनुभव — श्री गो म वाटवे
मौज दि २० जुलै, १९५८

हौशी आणि व्यावसायिक नाट्यसंस्थांतून अनेक पदवीधर तरुण-तरुणी मोठ्या उत्साहानं भाग घेत आहेत दिग्दर्शक आणि समीक्षक हेहि चांगले पाश्चात्य-विद्याविभूषित आहेत या परिस्थितीत त्यांच्याकडून अधिक सहकार्याची आणि सवची अपेक्षा केली तर ती अयोग्य ठरणार नाही अशिक्षित कलावंत स्वत च्या अशिक्षितपणाच्या न्यूनगंडामुळें एखाद्या व्यक्तीचं वर्चस्व मान्य करण्यास फारसे ओढेवेढे घेत नाही, संस्थेच्या चालकाच्या नियंत्रणाखाली बिनातक्रार रंगभूमीसहि तो तयार होऊ शकतो परंतु सुविद्य म्हणवणारे कलावंत आणि दिग्दर्शक साध्या-साध्या गोष्टींतहि 'आत्मतत्त्वाचा अहंकार' थोडासा बाजूला ठेवू शकत नाहीत परिषदेच्या आणि मराठी रंगभूमीच्या हिताकडे लक्ष देऊन वैयक्तिक स्वरूपाच्या किरकोळ मतभेदांना मुरड घालणें अद्यापिहि काही नाट्यतज्ञ अशा महाभागांना जमत नाही ही स्थिति पालटली आणि परिषदेच्या कार्याविषयी निष्ठा बाळगून निरलसपणे आणि निरपेक्षतेन काम करण्यास तयार असलेले नव नव कार्यकर्ते सतत पुढे येत राहिले तर परिषदेच्या उज्ज्वल भविष्यकाळाविषयी संदेह उत्पन्न होणार नाही

---

# परिशिष्ट १

## तिसऱ्या नाट्यसंमेलनात मंजूर झालेली (पुणे १९०७)

### भारत नाट्य समाजाची घटना

(१) संस्थेचें नाव — 'भारत नाट्य समाज'

(२) उद्देश — नाट्यकलेची सुधारणा करणे व नाटकधंद्यातील अडचणी दूर करून त्यालाहि चांगले वळण लावणें

(३) सभासद — (१) संस्था सभासद — ज्या नाटक मंडळ्या दरसाल आपल्या एका खेळाचे उत्पन्न या संस्थेस देतील त्या या संस्थेच्या कायम सभासद समजाव्या

(२) आश्रयदाते — संस्थेस एकदम १०० रुपये किंवा अधिक रक्कम देणाऱ्यास या संस्थेचे आश्रयदाते समजावें

(३) व्यक्ति-सभासद — सालिना ३ रु. वर्गणी देणारे, या संस्थेच्या उत्कर्षासाठी मदत म्हणून देणारे या संस्थेचे (व्यक्ति) सभासद समजावें

(४) **नियामक मंडळ** — ( I ) वरील ( ३।१ ) कलमात सांगितलेले कायम सभासद व त्यांनीच आपल्या सस्थेइतके निवडून घेतलेले व ( II ) ( ३।२ ) या कलमात सांगितलेले सभासद हे सर्व मिळून सस्थेचे नियामक मंडळ ( डायरेक्टर बार्ड ) समजावे

(५) **नियामक मंडळाची रचना**—१ अध्यक्ष, १ उपाध्यक्ष, १ खजिनदार, १ मुख्य चिटणीस व १ मदत चिटणीस १ नाटयसग्रहालयाचा व्यवस्थापक, १ दरसाल ज्या मंडळीकडे समेलनाची व्यवस्था ठरली असल तिच्यातर्फे एक सभासद, त्या व्यवस्थचा चिटणीस, अशी कार्यकारी माणसे असावीत

(६) **सग्रहालय**—या सस्थेच्या निसबत असलेल नाटयविषयक सग्रहाल्य कायमचे पुणे येथे ठवावे

(७) **बक्षिसयोजना**—दरसाल समलनाचे वेळी जी मंडळी मुद्दाम तयार करून एक उत्तम नाटकप्रयोग करून दाखवील तिला मंडळीच्या नावे सा सस्थकडून एक सुवर्णपदक द्यावे तसच नेमलल्या विषयावर जो उमेदवार नट आपले अभिनयकौशल्य व वेषकुशलता दाखवील त्यासहि एक सुवर्णपदक सस्थेकडून द्यावे

(८) **सर्चासवर्चा**—चिटणीसाच्या स्वन्वर्चासाठी व सग्रहाचे व्यवस्थेसाठी दरसाल थोडी थोडी रक्कम मजूर करावी चिटणीसान वर्षातून काही दिवस सर्व नाटक मंडळयाकडे फिरून यावे .

# परिशिष्ट २

[ बेळगांव येथें झालेल्या ३८ व्या संमेलनांत सम्मत झालेली व ३९ आणि ४० व्या संमेलनांत झालेल्या दुरुस्त्या समाविष्ट केलेली ]

## नाटच-परिषदेची घटना

(१) नांव — या संघटनेचें नांव ' मराठी नाटच-परिषद् ' असें राहील.

(२) उद्देश — मराठी नाटचवाङ्मय व नाटचकला आणि रंगभूमि यांच्या प्रगतीच्या दृष्टीनें आवश्यक असें सर्व तऱ्हेचें कार्य सतत करीत राहणें.

(३) साधनें — वरील उद्देश साध्य होण्यासाठीं पुढील व इतर योग्य साधनांचा उपयोग करणें.

अ — दरसाल परिषदेचीं प्रादेशिक व अखिल भारतीय स्वरूपाचीं नाटचसंमेलनें भरविणें व भरविण्यास प्रोत्साहन देणें.

आ — कला किंवा व्यवसाय म्हणून स्वतंत्र रीतीनें कार्य करणाऱ्या नाटच-संस्था परिषदेशीं संलग्न करून घेणें.

इ — म. ना. परिषदेचें कार्य जास्तीत जास्त व्यापक होण्याच्या दृष्टीनें ठिकठिकाणीं शाखा काढणें.

ई — अन्य भाषाच्या नाट्यसंस्थाशी व नाट्यविषयक चळवळीशी सहकार्य करणे

उ — नाट्यशास्त्र व नाट्यतंत्र आणि नाट्यकला व रंगभूमि, या व इतर अशाच नाट्यविषयावरील ग्रंथनिर्मितीस व प्रसिद्धीस प्रोत्साहन देणे व साहाय्य करणे

ऊ — नाट्याम वाहिलेले नियतकालिक काढणे, चालविणे अथवा त्या कार्यास उत्तेजन देणे

ए — नाट्यकलेचे शिक्षण देणारी संस्था स्थापणे व चालविणे अगर तशी संस्था परिषदेशी जोडण्याचा प्रयत्न करणे

ऐ — नाट्यकलेच्या अभ्यासास विश्वविद्यालयीन शिक्षणात योग्य स्थान प्राप्त करून देण्याचा प्रयत्न करणे

ओ — परिषदेने स्वतंत्र रंगमंदिर व नाट्यवस्तुसंग्रहालय उभारण्याचा प्रयत्न करणे

(४) वर्षगणना — परिषदेचे वर्ष १ जानवारी ते ३१ डिसेंबर असे राहील

(५) कचेरी — मराठी नाट्य परिषदेची कचेरी परिषदेस स्थायी स्वरूप प्राप्त होईपर्यंत, कार्याध्यक्षाच्या सोयीच्या ठिकाणी राहील

(६) सभासद — मराठी नाट्य परिषदेचे सभासद पुढील प्रकारचे असतील —

व्यक्ति-सभासद होतां येईल. अशा सभासदास वार्षिक वर्गणी रु ३/– आगाऊ एकरकमी द्यावी लागेल.

आ — म. ना. परिषदेस रु. ५०/– देणगी देणाऱ्या व्यक्तीस कार्यकारी मंडळाच्या मजुरीनें तहहयात सभासद समजण्यांत येईल.

इ — रु. १००/– किंवा अधिक देणगी देणाऱ्या व्यक्तीस, कार्यकारी मंडळाच्या मजुरीनें, आश्रयदाते समजण्यात येईल.

(३) सन्मान्य सभासद :—

मराठी रंगभूमीच्या सेवेंत निष्ठापूर्वक जीवन व्यतीत करणाऱ्या एखाद्या व्यक्तीची कार्यकारी मंडळाच्या शिफारशीने सर्वसाधारण सभेकडून बहुमानानें सन्मान्य सभासद म्हणून केली जाईल. ही निवड तहहयात राहील. अशा सन्मान्य सभासदांची कमाल संख्या एका वेळी दहाहून अधिक असणार नाही.

उ — कोणत्याहि वर्गाचा सभासद होऊं इच्छिणाऱ्या प्रत्येक संस्थेनें वा व्यक्तीनें कार्यकारी मंडळानें तयार केलेल्या नमुन्यानुसार अर्ज करावा. कार्यकारी मंडळाकडून अथवा कार्यकारी मंडळानें अधिकार दिलेल्या पदाधिकाऱ्याकडून तो अर्ज मंजूर करण्यांत आल्याबद्दल अर्जदारास कळविले जाईल. अर्ज मंजूर झाल्यापासून ती संस्था अगर व्यक्ति म. ना. परिषदेची सभासद समजली जाईल मात्र अशा सन्हेनें सतत सहा महिने सभासद म्हणून राहिल्याशिवाय सभासदास मताधिकार राहणार नाही. तसेच ज्या सभासदाकडे परिषदेच्या सभासद-वर्गणीची वा अन्य बाकी येणें असेल अशा कोणाहि सदस्याला अध्यक्षपदासाठी नाव सुचविण्याचा, अध्यक्षीय निवडणुकीत मत देण्याचा, परिषदेची सर्व-साधारण सभा अगर खुलें अधिवेशन यांच्या चर्चेत भाग घेण्याचा, अथवा तेथें मतदान करण्याचा किंवा कार्यकारी-मंडळात निवडून येण्याचा वा राहण्याचा अधिकार राहणार नाही.

त्याचे सभासदत्व स्थगित समजले जाईल सभासदत्व रद्द झाल्यापासून दोन वर्षेपर्यंत त्या व्यक्तीचा अगर संस्थेचा अर्ज पुन्हा विचारात घेतला जाणार नाही

ए — परिषदेच्या सर्व सभाना हजर राहण्याचा, सभेतील चर्चेत भाग घेण्याचा, मत देण्याचा आणि कार्यकारी मंडळात निवडून येण्याचा सर्व सभासदास हक्क राहील

(७) **कार्यकारी मंडळ —**

अ — मराठी नाट्य परिषदेचे कार्यकारी मंडळ एकवीस सभासदाचे असावे

१ *अध्यक्ष (पदसिद्ध सभासद)*
५ उपाध्यक्ष
१ कार्याध्यक्ष
१ कार्योपाध्यक्ष
३ चिटणीस
१ खजिनदार
९ साधारण सभासद
२१ एकूण सभासद

आ — म. ना परिषदेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष हेच पुढील अधिवेशनापर्यंत म ना परिषदेचे अध्यक्ष राहतील

इ — कार्यकारी मंडळातील सोळा सभासदाची निवड सर्वसाधारण सभेकडून गुप्त मतदानपद्धतीने, दर वेळी तीन वर्षांसाठी केली जावी त्यापैकी निदान दहा सभासद सलग्न संस्थाचे प्रतिनिधि असावेत या सोळा सदास्यानी आपल्या पहिल्या बैठकीत १ कार्याध्यक्ष १ कार्योपाध्यक्ष, १ खजिनदार व ३ चिटणीस याची निवड करावी अध्यक्षानी कार्यकारी मंडळाच्या साहाय्याने ५ उपाध्यक्ष तीन वर्षांकरिता स्वीकृत करावेत

ई — संस्था-सभासदाच्या प्रतिनिधीतून निवडावयाच्या सभासदापैकी किमान एक तरी ग्रामीण विभागातील असावा

उ — चिटणीस व मजिनदार हे शक्यतो परिषदेची कचेरी असेल तेथीलच असावेत.

ए — कार्यकारी मंडळांतील एखादी जागा कांही अपरिहार्य कारणानें रिकामी राहिली किंवा मध्येंच रिकामी झाली तर कार्यकारी मंडळानें स्वीकृत करून ती जागा भरावी.

(७) कार्यकारी मंडळाची सभा —

अ — चिटणिसानीं दर चार महिन्यांतून एकदा तरी कार्यकारी मंडळाची सभा बोलाविली पाहिजे.

आ — कार्यकारी मंडळाच्या किमान पाच सभासदांच्या सह्यांनिशी विशेष *कारणास्तव सभेची मागणी करण्यात आली तर चिटणिसानीं तशा* सभेच्या मागणीचा अर्ज आल्यापासून एक महिन्याच्या आत कार्यकारी मंडळाची सभा बोलाविली पाहिजे.

इ — कार्यकारी मंडळाच्या सभेची सूचना सभेच्या सात दिवस आधी सदस्यांना पोंचली पाहिजे.

ई — *कार्यकारी मंडळाची तांतडीची सभा कमी दिवसाच्या सूचनेने* चिटणिसांस बोलाविता येईल. मात्र तशी तातडीची सभा घेण्याविषयीं चिटणिसास कार्याध्यक्षानी लेखी सूचना दिलेली असली पाहिजे.

उ — कार्याध्यक्षांच्या गैरहजेरीत कार्योपाध्यक्षानी त्यांचें काम करावें. कार्योपाध्यक्षाच्या गैरहजेरीत कार्यकारी मंडळाच्या उपस्थित सभासदां-*पैकी कोणास तरी सभाचालक म्हणून निवडलें जावें.*

ऊ — कार्यकारी मंडळाची गणसंख्या पाच सदस्यांची राहील. गणसंख्येच्या अभावी तहकूब होऊन पुन्हा भरणाऱ्या सभेस गणसंख्येची जरुरी राहणार नाहीं

ए —कार्यकारी मंडळाच्या सभेंतील निर्णय उपस्थित सदस्यांच्या बहुमतानें घेतले जातील. मताची विभागणी सारखी झाल्यास सभाचालकास जादा मत देण्याचा अधिकार राहील.

ऐ —कार्यकारी मंडळाच्या प्रत्येक सभेचें वृत्त (Proceedings) चिटणिसानीं मिनिट-बुकांत दाखल करून ठेवलें पाहिजे.

ओ —कोणीहि सभासद कोणतहि कारण न कळविता आळीन तीन सभास अनुपस्थित राहिला तर त्याचे कार्यकारिणीचे सभासदत्व रद्द होईल.

९ कार्यकारी मंडळाचे काम

अ —परिषदेचे उद्देश साध्य करण्याकरिता प्रयत्न करणे व जरूर ते उपाय अमलात आणणे

आ —परिषदेच्या कार्याकरिता द्रव्य निधि जमा करणें, व त्याचा अंदाजपत्रकाबरहुकूम विनियोग करणे

इ —परिषदेकरिता सभासद-नोंदणी करणे व परिषदेचे दप्तर सांभाळणे.

ई —अधिवेशनात झालेल्या निर्णयाची तसेच सर्वसाधारण सभेच्या निर्णयाची अमलबजावणी करणे

उ —वार्षिक अंदाजपत्रक, वार्षिक जमाखर्च व वार्षिक अहवाल तयार करणे व सर्वसाधारण सभेकडून संमत करून घेणे पुढें साधारण सभेकडून मंजूर केलेला अहवाल चिटणिसाकरवी अधिवेशनात सादर करणे, जरूर त्या ग्रँट्स् मंजूर करणे

ऊ —मराठी नाट्य परिषदेच्या उद्देशाची अमलबजावणी करण्याच्या दृष्टीने पोटनियम तयार करणे मात्र ते पोटनियम पुढें येणाऱ्या सर्वसाधारण सभेपुढें मांडून त्यांना मंजुरी घेणे

## ११ वार्षिक अधिवेशन

अ —म ना परिषदेचे मराठी नाट्य-संमेलन हे वार्षिक अधिवेशन म्हणून भरविले जावे

आ —संस्था-सभासदाचे प्रतिनिधि, म ना परिषदेचे सर्व प्रकारचे सभासद, आणि निमत्रक सस्थेचे रीतसर नादलेले स्वागत सभासद यानाच खुल्या अधिवेशनात मताधिकार राहील

इ —म ना समेलनास निमत्रण देऊ इच्छिणाऱ्या सलग्न सस्थेनें, पुढील वर्षाच्या अधिवेशनासाठी द्यावयाचे निमत्रण, चालू अधिवेशनाच्या अगोदर म ना परिषदेच्या कचेरीकडे पाठविले पाहिजे अधिवेशन भरविणाऱ्या सस्थेनें आपल्या गावी म ना परिषदेचे किमान २५ व्यक्ति-सदस्य तरी असावेत अशी खबरदारी घ्यावी

ई —याप्रमाणे आलेल्या सव निमत्रणाचा विचार वार्षिक समेच्या बैठकीत होऊन ज्या ठिकाणचे निमत्रण बहुमताने स्वीकारले जाईल तेथें वार्षिक साधारण सभा आणि म ना संमेलन याची पुढील अधिवेशनें भरतील.

उ —पुढील अधिवेशनाचे निमत्रण कोणत्याच सस्थेकडून दिले गेल नाही तर पुढील अधिवेशनाचे स्थळ कार्यकारी मडळानें नियोजित केल पाहिजे

ऊ —अधिवेशन भरविणाऱ्या सस्थेने कार्यकारी मडळाच्या सल्ल्यानुसार चालाव

ए —अधिवेशन भरविणाऱ्या सस्थन केलेल्या सर्व प्रकारच्या कायक्रमाच्या उत्पन्नातील सव खर्च वजा जाता उरलेल्या रकमेचा एक-चतुर्थांश हिस्सा म ना परिषदेला देणगी म्हणून दिला पाहिज

ऐ —अधिवेशनाचा वृत्तान्त छापून प्रसिद्ध करण्याची जबाबदारी अधिवेशनाला निमत्रण देणाऱ्या सस्थवर राहील हा वृत्तान्त पुढील अधिवेशन भरण्याच्या आत प्रकाशित केला जावा

ओ —वार्षिक अधिवेशनाच्या समयेत केल्या जाणाऱ्या नाट्यप्रयोगाप्रसगी होणारे नाट्यप्रयोग, म ना परिषदेशी सलग्न असणाऱ्या व्यावसायिक वा हौशी नाट्य सस्थांचेच असावेत

## १२ विषयनियामक समिति

अ — कार्यकारी मडळ स्वागत मडळाचे पदाधिकारी, सवसाधारण सभचे उपस्थित असलेले सभासद, स्वागत मडळान निवडून दिलेले आपल्या एकूण सख्यच्या एक-दशाश इतक सभासद, निमत्रक सस्थच्या कार्यकारी मडळाचे सव सभासद, आणि अधिवेशनास उपस्थित असलेल्या प्रतिनिधीच्या दहामार्गे एक किंवा किमान दहा प्रतिनिधीचा समावेश विषयनियामक समितीत होईल

आ — विषयनियामक समितीची सभा नूतन नियुक्त अधिवेशनाच्या अध्यक्षाच्या अध्यक्षतेखाली चालेल

इ — विषयनियामक समितीपुढे आयत्या वेळी आलेला ठराव अध्यक्षाना आयत्या वेळी स्वीकारता यईल

ई — विषयनियामक समितीपुढे न आलेला ठराव खुल्या अधिवेशनात यऊ शकणार नाही

ए — विषयनियामक समितीत नामजूर झालेला ठराव मताधिकार असलेल्या पचवीस सभासदाच्या सह्याना अध्यक्षापुढे पाठविण्यात आल्यास अध्यक्षानी तो ठराव अधिवेशनात माडला पाहिज अशा ठरावासहि मताधिकारी व्यक्तीस आयत्या वेळी उपसूचना सुचविता यतील

ऐ — विषयनियामक समितीत गणसख्या सदस्याच्या एक चतुर्थांश सख्यइतकी राहील

इ — म. ना. परिषदेचा सभागद नसलेल्या कोणाहि व्यक्तीचें नांव अध्यक्षपदासाठी सुचवितां येणार नाहीं.

१४. निधि

*म. ना. परिषदेच्या निधींत पुढील गोष्टींचा समावेश राहील.*

*अ — संलग्न-संस्थांची प्रवेश-फी व वार्षिक वर्गणी, तहह्यात समासद व आश्रयदाते यांची देणगी, सभासदांची वर्गणी.*

आ — देणग्या व ग्रँट्स्.

इ — इतर प्रकारें म. ना. परिषदेच्या नावावर जमविलेला निधि.

ई — म. ना. परिषदेचा निधि म. ना. परिषदेच्या नांवावर कार्यकारी मंडळाच्या निर्णयाप्रमाणे एखाद्या अधिकृत बँकेंत ठेवण्यांत यावा. म. ना. परिषदेच्या चेकवर खजिनदार आणि कार्याध्यक्ष अशा उभयतांच्या सह्या असल्या पाहिजेत.

उ — चिटणिसाना शभर रुपयापर्यंत अनामत म्हणून जवळ ठेवण्याचा अधिकार आहे.

ऊ — म. ना. परिषदेच्या निधीचा विनियोग म. ना. परिषदेच्या "उद्देश" साधनेसाठीच केला पाहिजे.

ए — कार्यकारी-मंडळाच्या वार्षिक सर्वसाधारण सभेच्या वेळी कार्यकारी मंडळाचे सभासद नसलेल्या सभासदांतून ऑडिटर निवडावेत व त्या ऑडिटराकरवी आपले जमाखर्च तपासून घेण्याची तजवीज करावी.

१५. दुरुस्ती

प्रस्तुतच्या घटनेत दुरुस्ती करावयाची झाल्यास तशी दुरुस्तीची लेखी सूचना चिटणिसाकडे अधिवेशनाच्या दोन महिने अगोदर पाठविली पाहिजे. वार्षिक सर्वसाधारण सभेंत उपस्थित सदस्यांच्या दोन-तृतीयांश इतक्या बहुमतानें सूचना समत केली गेली म्हणजे त्याप्रमाणें घटनेंत दुरुस्ती केली जावी.

## परिषद् शाखांच्या कार्यासंबंधी नियम

(१) महाराष्ट्रातील व बृहन्महाराष्ट्रातील भिन्न भिन्न प्रादेशिक विभागात, अगर प्रमुख स्थळी नाट्यविषयक जागृतीचे काम करण्यासाठी, मराठी नाट्य परिषदेने शाखा स्थापन करण्याचा प्रयत्न करावा या शाखा जिल्हानिहाय असाव्यात

(२) ज्या प्रादेशिक विभागात अगर शहरात शाखा स्थापन करावयाची असेल त्या प्रादेशिक विभागात अगर प्रमुख स्थळी म ना परिषदेचे जे सभासद झाले असतील त्यांनी आपल्यातून शाखेची निवड करावी व नावानिशी कार्यकारी मंडळास कळवावी शाखेच्या पदाधिकारी सभासदांची संख्या कार्यकारी मंडळाच्या संमतीने अगोदर निश्चित करावी

(५) शाखेने आपले कार्य म. ना. परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या सल्ल्यानें करावें. कार्यकारी मंडळानें कांहीं विशिष्ट कामें तिजकडे सोंपविल्यास तींहि करावींत. परिषदेचें कार्य आणि उद्देश यास अनुरूप असे कोणत्याहि स्वरूपाचे कार्य, उदाहरणार्थ नाट्यप्रयोग, नाट्यचर्चा, शाळा–कॉलेजांतून नाट्यशिक्षण देण्याची व्यवस्था इत्यादि कामें शाखा–परिषदेस आपल्या अधिकारात करितां येतील.

(६) शाखा परिषद् स्थापन करण्यास व ती चालू ठेवण्यास म. ना. परिषदेचे किमान पचवीस तरी सभासद असणे आवश्यक आहे.

# परिशिष्ट ३

## आजवरचीं नाटयसंमेलनें

| क्रमांक | स्थल व काल | संस्था | अध्यक्ष |
|---|---|---|---|
| १. | मुंबई १९०५ | राजापूरकर ना. मं. | ग. श्री. खापर्डे |
| २. | नाशिक १९०६ | पाटणकर सं. ना. मं. | न. चिं. केळकर |
| ३. | पुणे १९०७ | किर्लोस्कर नं. मं. | कृ. प्र. खाडिलकर |
| ४. | नाशिक १९०८ | नाटयकलाप्रवर्तक सं. ना. म | नी. वि. छत्रे |
| ५. | पुणें १९०९ | सोशल क्लब | ग. कृ. गर्दे |
| ६. | पुणें १९१० | महाराष्ट्र ना. मं. | चिं. गं. भानू |

| क्रमांक | स्थल व काल | संस्था | अध्यक्ष |
|---|---|---|---|
| २२ | पुणे १९२७ | आनंद स ना म | श्री नी चाफेकर |
| २३ | मुंबई १९२८ | रंगबोधेच्छु समाज | सौ गिरिजाबाई केळकर |
| २४ | पुणे १९२९ | बालमोहन स ना म | बालगंधर्व (नारायण श्रीपाद राजहंस) |
| २५ | मुंबई १९३० | बालमोहन स ना म | अ ह गद्रे |
| २६ | मुंबई १९३३ | आनंद स ना म | ना रा बामणगावकर |
| २७ | पुणे १९३५ | माशल क्लब | गा स टेंबे |
| २८ | पुणे १९३६ | बालमोहन स ना म व सोशल क्लब | द्य प जोशी |
| २९ | पुणे १९३८ | अभिनव नाट्य मंडळ व सोशल क्लब | भा वि वरेरकर |
| ३० | नागपूर १९३९ | अभिनव नाट्य मंदिर | त्र्य मो कारखानीस |
| ३१ | नाशिक १९४० | महाराष्ट्र नाट्य मंदिर | ग गो बोडस |
| ३२ | मुंबई १९४१ | मुंबई मराठी साहित्य संघ | प्र के अत्रे |
| ३३ | सांगली १९४३ | स्थानिक नाट्य समिति | ना वि. कुलकर्णी |
| ३४ | जळगाव १९४४ | स्थानिक नाट्य समिति | मा ना जोशी |
| ३५ | नगर १९४६ | नाट्योत्तेजक मंडळ | चिं ग कोल्हटकर |
| ३६ | कोल्हापूर १९४९ | करवीर नाट्य मंडळ | चिं ग कोल्हटकर |

| क्रमांक | स्थल व काल | संस्था | अध्यक्ष |
|---|---|---|---|
| ३७ | पुणे १९५४ | सादाल क्लब | न ग कमतनूरकर |
| ३८ | बेळगाव १९५६ | कलोपासक मडळ | प्र के अत्रे |
| ३९ | सोलापूर १९५७ | अभिनय साधना मदिर | पाश्वनाथ आळतेकर |
| ४० | सातारा १९५८ | अभिनव नाट्य मडळ | वि स खाडेकर |
| ४१ | हैदराबाद १९५९ | कला मडळ व स्थानिक नाट्यसंस्था | गोपाळ गोविंद उर्फ नानासाहेब फाटक |
| ४२ | बडोदे १९६० | बराडा अमॅच्युअर्स ड्रॅमॅटिक क्लब | व दा. देसाई |

# परिशिष्ट ४

## आजवरच्या संमेलनांतून वाचलेले निबंध

| संमेलन क्रमांक | निबंध-विषय | लेखक |
|---|---|---|
| १ | १ हल्लीची नाटके व नाटक मंडळ्या | श्री. आ. वि. कुलकर्णी |
| | २ नाटक मंडळयांच्या सध्याच्या अवनत स्थितीची कारणे व त्यावर उपाय | श्री. नी. स. भांगले |
| २ | १ संगीत ( मंडळ्यांतील ) मुलाचे आवाज | डॉ. डी. के. कुटे |
| | २ नाटकाच्या गद्य-पद्य स्वरूपाविषयी (विचार) | श्री. द. अ. केसकर |
| ५ | १ ऐतिहासिक नाटके | श्री. वा. गो. आपटे |
| | २ नाट्यसमेलनें | श्री. गो. ना. जोशी |
| ६ | १ मराठी नाटकें आणि नाटक मंडळ्या | श्री. व. ह. पंडित |
| | २ संगीताचा नाट्यकलेशी संबंध | पं. विष्णुबुवा पलुस्कर |
| | ३ सु-स्वर आणि त्याचे संरक्षण | डॉ. भाजेकर |
| | ४ नाटकांतील देखावे | श्री.मा.गो. कानिटकर |

| संमेलन क्रमांक | निबंध-विषय | लेखक |
|---|---|---|
| | ५ नाट्यकलेचें खरें महत्त्व व तिचे विपरीत परिणाम होण्याची कारणें | 'क्ष' |
| ७ | १ नाटकपात्रांची भाषा | रा. सा. ओक |
| ८ | १ नाटकाचें महत्त्व व कार्य | श्री. व. ह. पंडित |
| | २ नाट्यपात्रें आणि त्यांचे अभिनय | सौ. मथुराबाई द्रविड |
| ९ | १ नाट्यकलेचें संवर्धन करणाऱ्या विलायतें-तील नाट्यसंस्था | श्री. शं. बा. मुजुमदार |
| | २ महाराष्ट्र भाषेंत शोकपर्यवसायी संगीत नाटकें का नाहींत? | श्री. वि. गो. शेटये |
| | ३ नाट्यशास्त्र | श्री. ना. के. बेहरे |
| | ४ इंग्रजी पद्धतीवर बसविलेलें नोटेशन | श्री. खंडकर |
| | ५ नट व नाट्य | श्री. व. ह. पंडित |
| | ६ सामाजिक नाटकें व नैतिक दृष्ट्या परिणाम | श्री. रा. गो. दडवते |
| | ७ नवी व जुनी नाटकें | डॉ. वि.मो. चिपळूणकर |
| | ८ नाट्यरचना | श्री. ह. ना. आपटे |
| १२ | १ नटांचें आरोग्य व त्यांची दिनचर्या | डॉ. काळोखे |
| १५ | १ गडकरीकृत 'प्रेमसंन्यास' | श्री. कोनकर |
| १७ | १ नाटकापासून प्रेक्षकावर होणारा परिणाम | श्री. त्र्य. व. पेंढारकर |
| | २ महाराष्ट्र रंगभूमि व चित्रकार | श्री. पु. श्री. काळे |
| | ३ नाटक मंडळीतल्या फाटाफुटीचीं कारणें | श्री. द. वि. भागवत |
| १८ | १ ... ... ... ... ... ... | डॉ.सौ इंदुमती नाईक |
| १९ | १ 'नाट्यविषयक विचार' | श्री.एस्.जी.तळवलकर |
| | २ करमणुकीवरील कर | श्री. गो. रा. बाळ |
| २७ | १ नाट्यसंस्था सुरक्षित व कार्यक्षम करण्याचे उपाय | श्री. मळेकर |
| | २ सिनेमामुळेंच नाट्यसंस्थांचा ऱ्हास झाला काय? | |

| समेलन क्रमाक | | निबध विषय | लेखक |
|---|---|---|---|
| ३० | १ | गक्सपिअर आणि मराठी नाटच | श्री श्री म गोडबोले |
| | २ | मूकनायक परीक्षण | श्री द रा गोमकाळ |
| | ३ | नाटचविषयक एक वक्तव्य | श्री वि ल चिपळूणकर |
| | ४ | कोल्हटकराच्या पदातील काव्यसौंदय | |
| ३१ | १ | वोरुपट व रगभूमि | श्री राम गोगटे |
| ३९ | १ | रगभूमीच्या उत्कर्षाची पचवार्षिक योजना | श्री बाबुराव पेंढारकर |
| ४० | १ | मराठी रगभूमि आणि सगीत | मा कृष्णराव |

# परिशिष्ट ५

## संमेलनातर्फे झालेल्या निबंध स्पर्धा

| संमेलन क्रमांक | निबंध विषय |
| --- | --- |
| ३ | १ गद्य नाटक यशस्वी होण्यासाठी काय करावं ? |
| | २ कोल्हटकरांच्या चार नाटकांतील सौंदर्यस्थळें |
| ६ | १ नाटकांतील मुलांची कर्तव्यें |
| ८ | १ आमच्यांतील सुशिक्षित समाजाचे नाट्यकलेविषयीं कर्तव्य कोणते व समाज ते कितपत पाळीत आहे ? |
| | २ नाटकधंद्यापासून त्यांतील लोकांस काय फायदे करून घेता येतात ? |

| संमेलन-क्रमांक | निबंधविषय |
| --- | --- |
| | ३ मराठीतील कोणत्या नाटकाचा उत्कृष्ट चित्रपट होऊ शकेल ? |
| (परिषदेच्या वतीने) | १ खाडिलकरांचे नाट्यगुण |
| १९५९ | २ खाडिलकरांची सर्वश्रेष्ठ नाटके |

# परिशिष्ट ६

## संमेलनांतील लेखी परीक्षेचे नमुने

### 'मृच्छकटिक' नाटकाची प्रश्नपत्रिका

अ — नाटकाच्या वस्तूसंबंधीं :—

१. पहिल्या अंकाच्या प्रारंभापासून शेवटल्या अंकाच्या परिसमाप्ति-पर्यंत वर्णन केलेलें कथानक किती दिवसांत घडलेलें असावें हें सप्रमाण सांगा.

२. अकालदुर्दिन कोणत्या ऋतूत झालें व अमुकच ऋतु होता असें म्हणण्यासारखें नियामक काय आहे ?

३. या नाटकात कवीने व्यवहारांतील कोणकोणत्या प्रसंगाचें चित्र दाखवण्याचा प्रयत्न केला आहे ?

आणि अकालदुर्दिनात ती जाते त्यावेळेस कोणत्या रगाचे घ्यावे हे कारणासह सागा

इ — अभिनयासबधी —

१ दासी असे समजून वसतसेनेच्या अगावर चारुदत्त शेला टाकतो त्या वेळेस वसतसेनेने काय अभिनय करावा ते लिहा व कर्णपूरकाने पुन्हा तोच शेला आणून दिला त्या वेळेस काय अभिनय करावा ते लिहा

२. न्यायसभेतील पात्ररचना कशी असावी ?

ई — रसासबधी —

१ या नाटकात मुख्य रस कोणते आहेत व त्याचे पोषण कसे केले आहे ते लिहा

३ काव्यालकार निर्वाहासबधी —

१ या नाटकातील नायिका वेश्याच का केली ? व तसे केल्याने गुणदोष कोणते उत्पन्न झाले ?

२ या नाटकाची प्रस्तावना आणि पुढील कथानक याची सगति कशी ती दाखवा

३ शकार पात्राच्या स्वभावाचे व गुणाचे वर्णन करा

२

## ' शारदा ' नाटकाची प्रश्नपत्रिका

१ शारदा नाटकाचा विषय काय ? नाटकाचे सविधानक विषयाला पोषक आहे किंवा नाही ? लेखकाचा नाटक लिहिण्याचा उद्देश सफल झाला किंवा नाही ? झाला असल्यास कोणत्या कारणानी ? नसल्यास का नाही ते लिहा

४. शारदा नाटककर्त्यांचे 'नाटककार व कवि' या दृष्टीने गुणदोष-विवेचन उदाहरणासह करा.

५ (अ) हिरण्यगर्भांची भूमिका नाटकरचनेत अवश्य आहे काय? नसल्यास का?

(ब) शारदा नाटकांतील कोणत्याहि पदाचे ताल सांगून त्यांतील कोणत्याहि पदाच्या दोन ओळींचे नोटेशन द्या

६ कोदंड, भद्रेश्वर किंवा शारदा यांपैकी कोणा एका पात्राचें स्वभाव-वर्णन गुणदोषासह उदाहरणें देऊन करा

७ या नाटकांतील उत्तम गद्य व पद्य भाग देऊन पद्यांतील रम्य कल्पना, प्रसाद, उदात्तपणा, शब्दलालित्य व अलंकार सांगा

८ (अ) या नाटकांतील कोणत्याहि कठिण प्रसंगाचा अभिनय (शारदा किंवा कोदंड) याचें यथायोग्य वर्णन करा व प्रस्तुत नाटकाच्या प्रयोगांत तो किंतपत साधतो हें सांगा उत्तर कोणा व्यक्तीस अनुसरून नसावें

(ब) नाटकांतील कोणत्याहि उत्तम प्रवेशाची किंवा पात्राची नाट्य-रचना कशी करावी तें सांगा

९ नाटकांतील प्रधान रस व नाटकाचा होणारा काल कारणासह द्या

# परिशिष्ट ७

## मराठी नाट्य-परिषदेशीं सलग्न असलेल्या सस्था

(अ) सस्था सदस्य

१ अरुणोदय नाट्य मगात मडळी C/o श्री लक्ष्मीकात शामराव गोराखडी-कर, मु पोस्ट सेवली ता जालना (जि औरगाबाद)

२ श्री चिटणीस, सरस्वतीभुवन शिक्षण सस्था औरगाबाद

३ श्री रा म जोशी चिटणीस, बरोडा अमॅच्युअर ड्रमटिक क्लब, बडोदें

४ महाराष्ट्र सगीत नाट्य मडळ न्यू कपिश्वर राड, घ न ४०/१० वळगाव

८. श्री. भाऊराजे जहागिरदार, चिटणीस, विमल नाट्य समाज, व्यंकटेश-भुवन, काचीगुडा, हैद्राबाद (आंध्र प्रदेश)
९. श्री. सरलाकुमार वि. विटकर, चिटणीस, मित्रमंघ, व ८-१६१ सुनालदास वाडा, इसामिया बाजार, हैद्राबाद (आंध्र प्रदेश)
१०. श्री. जगन्नाथ यशवंत जाधव, चिटणीस, स्नेहमंडळ, १९४ ममनेकर वाडा, सुलतानबझार, हैद्राबाद (आंध्र प्रदेश)
११. श्री. चिटणीस, कलामंडळ, सुलतानबझार, हैद्राबाद, (आंध्र प्रदेश)
१२. श्री. ग. ना. आंबेकर, चिटणीस, नाट्यसंघ, "प्रियदर्शन", वजिराबाद, नांदेड.
१३. सरस्वतीमंदिर नट संघ, ८२ शुक्रवार पेठ, पुणें २.
१४. श्री. पु. रा. वझे, मंत्री, महाराष्ट्रीय कलोपासक, ६३२/अ शनिवार पेठ, पुणें २.
१५. श्री. अध्यक्ष, भरत नाट्यसंशोधन मंडळ, पेरु गेटाजवळ, ३१२ सदाशिव पेठ, पुणें २.
१६. श्री. अध्यक्ष, प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन, ८५९/१०० डेक्कन [illegible]

२४ श्री कार्यवाह, मुबई मराठी साहित्य सघ, (नाट्यशाखा), १६ थोरभाट लेन, मुबई ४
२५ श्री कार्यवाह, " नाट्यसस्था ", विल्सन हायस्कूल, मुबई ४
२६ श्री चिटणीस, इडियन नॅशनल थिएटर, (मराठी विभाग) २ रा मजला, आगाखान बिल्डिंग, ९ दलाल स्ट्रीट, मुबई १
२७ श्री चिटणीस, फ्रेन्डस् सर्कल, कल्याण, C/o श्री ज बापट, भारताचार्य वैद्य चौक, कल्याण
२८ श्री चिटणीस, नाट्यकलोपासक मडळ, शातारामनिवास, गोखले रोड, (उत्तर), शिवाजी पार्क, दादर, मुबई २८
२९ श्री व्यवस्थापक, ललितकलादर्श नाटक मडळी, ४ ए, कपूर महाल मरीन ड्राइव्ह, मुबई १
३० श्री चिटणीस, रगमदिर प्रा लि, राजकमल कलामदिर, मुबई १२
३१ श्री चिटणीस, कलोपासना मडळ, C/o श्री लि भी नाईक, समादेवी रस्ता, बेळगाव
३२ श्री चिटणीस, महाराष्ट्र कामगार कल्याण मडळ, जाबोरी मैदान, वरळी, मुबई १८
३३ श्री चिटणीस, कल्चरल आर्टिस्ट्स्, शिवकुटी, २०४/१० खार, १०वा रस्ता, मुबई २१
३४ श्री चिटणीस, नाट्यकलामदिर, विठ्ठलभाई पटेल रोड, काँग्रेस हाऊससमोर, मुबई ४
३५ श्री चिटणीस, लोकसेवा मडळ, C/o श्री रगनाथ कुलकर्णी, साईसदन, रामनगर, डोंबिवली (जि ठाणे)
३६ श्री चिटणीस, राजहस कलासेवा मडळ, सीताराम भुवन, ब्राह्मणवाडी लेन, पाईप रोड, कुर्ला मुबई ३७
३७ श्री चिटणीस सयुक्त महाराष्ट्र कलावत, (नाट्य शाखा) C/o श्री एच् क पालव नारायण आश्रम, लालबाग मुबई १२
३८ श्री चिटणीस विदर्भ साहित्य सघ (नाट्य समिति) उत्तर अबाझरी रस्ता, नागपूर
३९ श्री चिटणीस, रजन कलामदिर, C/o वि सा सघ, नागपूर

४० श्री चिटणीस, लोकहितवादी मडळ पेठे विद्यालय नासिक
४१ श्री चिटणीस करवीर नाटच मडळ, कोल्हापूर
४२ श्री चिटणीस, 'वल्लायतन' मुदडा बिल्डिंग, महात्मा गाधी रस्ता नासिक
४३ श्री चिटणीस ठाणे मराठी नाटधमध C/o समित्र कार्यालय ठाणे
४४ श्री ग नी पडित, चिटणीस विकास मडळ ३३५ नवी पेठ जळगाव
४५ श्री चिटणीस मराठी साहित्य मडळ अमळनेर (जिल्हा जळगाव)
४६ श्री चिटणीस, अखिल महाराष्ट्र नाटच विद्यामदिर समिति, हरभट रस्ता सागली

(ब) म ना परिषद् शाखा

१ मराठी नाटच परिषद (दिल्ली शाखा) ५८ पडारा रोड नवी दिल्ली
२ मराठा नाटच परिषद्, (मुबई शाखा), १६ बारभाई लेन मुबई ४
३ मराठी नाटच परिषद (पुणे शाखा) C/o भरत नाटचसशोधन मदिर ३१२ सदाशिव पेठ पुणे २
४ मराठी नाटच परिषद, (सोलापूर शाखा) १०५ अ रेल्वे लाइन सोलापूर
५ मराठी नाटच परिषद (अमरावती शाखा) C/o प्रा म पा पाजणकर, रुक्मिणीनिवास राजनगर अमरावती

# परिशिष्ट ८

## मराठीतील निवडक नाट्यग्रंथांची सूचि

मराठी नाट्यविषयक ग्रंथाची ही सूचि इतिहास, चरित्र-आत्मचरित्र, टीका, शास्त्र व संकीर्ण अशा पाच विभागात दिलेली आहे यातील सर्वच ग्रंथ आज उपलब्ध असतील असे नाही. नाट्यविषयक ग्रंथाची एकत्रित केलेली सूचि एवढेंच याचे महत्त्व आहे सदरहू सूचीच्या बाबतीत सूचिकार दाते, श्री पा रा ढमढेरे, महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय व पुणे विद्यापीठाचे जयकर ग्रंथालय याचे ग्रंथपाल वगैरेंची आम्हास मदत झाली ह्याबद्दल आम्ही आभारी आहों.

मराठीतील पहिले नाटक 'प्रसन्न राघव' हे असून श्री शिवरामशास्त्री पाळदे यानी इ स १८५९ साली ते लिहिले तेव्हापासून आजपर्यंत मराठीत सुमारें १५०० नाटकें लिहिली गेलेली आहेत दर वर्षी प्रसिद्ध होणाऱ्या मराठी वाङमयात नाटकाचे प्रमाण भरघोस असते ही मराठीभाषिकास अभिमान वाटण्याजोगी गोष्ट आहे — प्रकाशक

## ( अ ) मराठी नाट्याचा इतिहास

| | | |
|---|---|---|
| १ | नाट्यकथामृत | अ वा वरव १९०७ |
| २ | नाट्यवोध | अ वा वरवे १९२२ |
| ३ | नाट्य व रगभूमि | श्री ना वनहट्टी |
| ४ | नाट्यसहिता | मा कृ शिंदे |
| ५ | भारतीय नाटकशास्त्र व नाट्यकला आणि पौरस्त्य व पाश्चात्य रगभूमि | पावगी |
| ६ | मखमालीचा पडदा | व शा दसाइ |
| ७ | मराठी नाट्यकथा | वि द साठ |
| ८ | मराठी नाट्यकला व नाट्यवाङ्मय | ग र दडवते |
| ९ | मराठी नाट्यसृष्टि—पौराणिक नाटक | वि पा दाडकर |
| १० | मराठी नाट्यसृष्टि—सामाजिक नाटके | वि पा दाडकर |
| ११ | मराठीचा नाट्यससार | वि स खाडकर |
| १२ | मराठी रगभूमीचा इतिहास | श्री ना वनहट्टी |
| १३ | , | य ग लले |
| १४ | मराठी रगभूमीच कथानक | म वा फडके |
| १५ | माझ्या काही नाट्यस्मृति | पु गो काणकर |
| १६ | मराठी नाट्यपरिषद—इतिहास व काय | वरवे व कानड |

## ( ब ) मराठी नाट्य—चरित्रें व आत्मचरित्रें

| | |
|---|---|
| २६ मास्टर दीनानाथ स्मृतिदर्शन | लता मंगेशकर |
| २७ माझा जीवनविहार | गो स टेंबे |
| २८ माझा नाटकी ससार भाग १–४ | भा वि. वरेरकर |
| २९ माझा नाट्याभ्यास | श ना सहस्रबुद्धे |
| ३० माझी भूमिका | गणपतराव बोडस |
| ३१ माझ्या काही नाट्यस्मृति | पु गो काणेकर |

## ( क ) मराठी नाट्य—टीकाग्रंथ

| | |
|---|---|
| ३२ रागरग | व शा देसाई |
| ३३ ललितवलेच्या सहवासात | पु श्री. काळे |
| ३४ करुण नाटकातील काही नायक | शि गो भावे |
| ३५ कालिदासाची नाटके | र. प कंगले |
| ३६ किर्लोस्कर देवल, गडकरी | ना सी फडके |
| ३७ कीचकवधसमीक्षा | — |
| ३८ कुलीन स्त्रिया व रगभूमि | श बा मुजुमदार |
| ३९ कुलीन स्त्रिया व रगभूमि | मा व्य मगसुळीकर |
| ४० केळकराची सहा नाटके | वि पा दाडेकर |
| ४१ खाडिलकराची नाट्यसृष्टि | वा ह् धारपुरे |
| ४२ खाडिलकराच्या नाट्यकृति | ना सी फडके |
| ४३ गडकऱ्याचा विनोद | शि गो भावे |
| ४४ झकार | ना सी फडके |
| ४५ टाकीचे घाव | ना सी. फडके |
| ४६ नाटककार कोल्हटकर | ना वा पराडकर |
| ४७ नाटककार गडकरी | रा श वाळिंबे |
| ४८ नाटकापासून समाजाला फायदे | गो म देवस्थळी |
| ४९ नाटक शास्त्र आणि तत्र | मा कृ शिंदे |
| ५० नाटकविषयक व्यापक विचार | गो वा बापट |
| ५१ नाट्यचर्चा | ना वा गोडबोले |
| ५२ नाट्यपरामर्श | र कृ फडके |

## (इ) मराठी नाट्य — शास्त्र